महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# महाभारत.

२. सभापर्व.



किंमत १२ आणे.

THE

# MAHÂBHÂRATA

OF

# MOROPANTA.

[E GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)

## 2. SABHÂPARVA.



*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

VÂMAN DÂJÎ OKA.



evised and enlarged with copious notes, Introduction &c.

BY

DÂMODAR KESHAVA OKA, B. A.

PRINCIPAL, NORMAL SCHOOL, AMARAOTI,

AND

MEMBER OF THE COURT OF THE NAGPUR UNIVERSITY.

Fourth Edition.

PUBLISHED

BY

PÂNDURANG JÂWAJÎ,

PROPRIETOR OF THE "NIRṆAYA SÂGAR" PRESS,

BOMBAY.

1930.

*Price* 12 *Annas.*

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# महाभारत.

## २. सभापर्व.

हें

(कै॰ वा॰) वामन दाजी ओक

यांनीं अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन शुद्ध केलें,

तें

दामोदर केशव ओक, बी. ए.
प्रिन्सिपाल, नॉर्मल स्कूल, उमरावती,
व
नागपुर विश्वविद्यालयाच्या कोर्टाचे मेंबर,

शोधून, विपुल टीपा देऊन व उपोद्घात वगैरे जोडून तयार केलें

मुंबईंत 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक पांडुरंग जावजी
यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

आवृत्ति चौथी.

सन १९३०.

किंमत १२ आणे.

कै० वा० वामन दाजी ओक,

महाराष्ट्र 'काव्यसंग्रहा'चे संपादक व रायपुर येथील हायस्कूलाचे हेडमास्तर.



जन्म-इ. स. १८४५. मृत्यु-इ. स. १८९७.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

१. हें पर्व प्रथम सुमारें १५।१६ वर्षांपूर्वी आमचे पितृव्य व गुरु ती० कै० वामनरावजी ओक यांनीं टीपा देऊन तयार केलें, व तें 'काव्यसंग्रह' मासिक पुस्तकांत थोडथोडें छापून प्रसिद्ध झालें. त्या वेळीं त्याच्या हजार प्रती काढिलेल्या होत्या. त्या संपण्यास इतकीं वर्षे लागलीं, यावरून मराठी काव्यांच्या संग्राह्य व उपयुक्त पुस्तकांस किती थोडा आश्रय मिळतो, याची स्पष्ट कल्पना वाचकांस सहज करितां येईल. हें पर्व अलाहाबाद युनिव्हर्सिटीनें म्याट्रिक्युलेशन परीक्षेस मराठी भाषा घेऊन बसणाऱ्या विद्यार्थ्यांच्या अभ्यासासाठीं नेमिलें नसतें, तर ही आवृत्ति काढण्याचें धैर्य 'निर्णयसागर' छापखान्याचे मालकांस खात्रीनें झालें नसतें. पण ही दुसरी आवृत्ति काढण्याची सुसंधी अलाहाबाद युनिव्हर्सिटीच्या कृपेनें आह्मांस लाभली, याबद्दल आह्मी तिचे अत्यंत कृतज्ञतापूर्वक आभार मानितों.

२. ह्या आवृत्तींत मूळ ग्रंथाच्या स्पष्टीकरणार्थ कठीण पद्यांचा अर्थ दिला असून, पूर्वीपेक्षां अर्थद्योतक टीपा ज्यास्त दिल्या आहेत; व मुख्य मुख्य अलंकारांचा नामनिर्देश करून, त्यांचें थोडक्यांत विवेचनही केलें आहे. ह्याखेरीज पुराणेतिहासविषयक कथासंदर्भ, समानार्थक उतारे, पंतांचें संक्षिप्त चरित्र, त्यांच्या काव्यांतील गुणदोष वगैरे विद्यार्थ्यांस आवश्यक अशी आणखी बरीच माहिती टीपांत व उपोद्घातांत दिली आहे. ह्या सर्व साहित्याचा उपयोग विद्यार्थ्यांस व इतर वाचकांस थोडाबहुत झाल्यास, आमच्या श्रमाचें सार्थक्य झालें असें होईल.

३. ही आवृत्ति तयार करण्याचे कामीं आमचे विद्वान् मित्र रा. रा. बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए. ( मुरूड–जंजिरा ) यांनीं दुर्बोध पद्यांचा अर्थ, अलंकारांची परीक्षा इत्यादि महत्वाच्या कामीं आम्हांस अमूल्य सहाय्य केलें. तसेंच रा. रा. मोरो गणेश लोंढे (तळें) व रा. रा. रामराव गोपाळ गुजर ( भंडारा ) ह्या अनुभविक व मार्मिक शिक्षकांनीं अनेक उपयुक्त सूचना केल्या. पुणें येथील 'शालापत्रका'चे जुलैचे अंकांत ह्या पर्वांतील कांहीं आर्यांच्या अर्थासंबंधानें चर्चा, त्या पुस्तकाचे संपादकांनीं केली आहे. तिचाही आम्ही उपयोग करून घेतला आहे. यास्तव आम्ही ह्या सर्व मंडळीचे फार आभारी आहों.

४. प्रथमावृत्तींत क्वचित् चुकून राहिलेले अपपाठ व हस्तदोष ह्या आवृत्तींत आम्हीं यथामति शुद्ध केले आहेत. तथापि अजूनही कोठें कांहीं दोष राहिले असल्यास, त्यांबद्दल जबाबदार आम्ही आहों. अशीं दोषस्थळें कोणास आढळल्यास, त्यांनीं तीं आम्हांस कृपा करून अवश्य कळवावीं. म्हणजे त्यांचा विचार पुढील आवृत्तीचे वेळीं करण्यास बरें पडेल.

सीताबर्डी, नागपुर,
डिसेंबर १९०९.

दा. के. ओक.

# चौथ्या आवृत्तीची प्रस्तावना.

तिसरी आवृत्ति डिसेंबर १९१२ मध्यें प्रसिद्ध झाली. त्यानंतर सतरा वर्षांनीं ही आवृत्ति काढण्याचा सुप्रसंग येत आहे. नागपुर येथील विश्वविद्यालयानें ह्या पर्वाची योजना आपल्या परीक्षांच्या अभ्यासक्रमांत केल्यामुळें, ह्या पर्वाची ही आवृत्ति श्री. रा. पांडुरंग जावजी, जे. पी. छापण्यास तयार झाले. ह्या पर्वास परीक्षेचा पाठिंबा नसता, तर ही आवृत्ति इतक्यांत खात्रीनें निघाली नसती.

तिसरी आवृत्ति बहुतेक तयार झाल्यानंतर पंतवंशज रा. रा. रामकृष्ण दत्तात्रय पराडकर (पुणें) यांनीं खुद्द पंतांच्या हातच्या पोथीवरून छापलेलें आर्याभारत प्रसिद्ध झालें. त्यामुळें त्या वेळीं त्या ग्रंथाचा आम्हांस विशेषसा उपयोग करून घेतां आला नव्हता. परंतु आतां त्याचा आम्ही पूर्ण उपयोग करून घेतला आहे. पंतांच्या पोथींतील पाठ मूळांत देऊन, इतरत्र आढळलेले पाठभेद त्या त्या ठिकाणीं टीपांत दिले आहेत. पंतांनीं क्वचित् टीपाही दिलेल्या आहेत, त्याही आम्ही दिल्या आहेत, व त्यांच्यापुढें '–पंत' असें लिहून, त्यांचा निर्देश केला आहे. पूर्वी प्रसिद्ध झालेल्या पंतांच्या आर्याभारताच्या प्रती बहुतेक शुद्ध होत्या. परंतु पंतांच्या लेखनपद्धतीचे विशेष ज्यांस पहावयाचे असतील, त्यांस रा० पराडकर यांनीं प्रसिद्ध केलेली प्रत उपयोगीं पडण्यासारखी आहे.

पंतलिखित प्रतींत शब्द तोडलेले नसावे, असें रा० पराडकर यांनीं पंतांच्या हस्ताक्षराचें जें छायाचित्र दिलें आहे, त्यावरून दिसतें. परंतु निरनिराळ्या संपादकांनीं पदच्छेद निरनिराळ्या प्रकारें केला असतां अर्थ कसा बदलतो, हें पाहणें मोठें मनोरंजक आहे. अशा स्थळांचा निर्देश आम्ही त्या त्या ठिकाणीं टीपांत केला आहे. अमुकच पदच्छेद पंतांस संमत होता, असें आज कोणासही म्हणतां येणार नाहीं.

पूर्वीपेक्षां अर्थबोधक टीपा व कल्पनासादृश्यदर्शक उतारे ह्या आवृत्तींत ज्यास्त दिले आहेत. ही आवृत्ति विशेषतः विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं तयार केलेली आहे आणि ह्मणून टीपाही जरा सढळ हातानें दिल्या आहेत.

ही आवृत्ति तयार करण्याचे कामीं रा. रा. नामदेव श्रीधर मुळे, श्रीभानुदासमहाराज यांच्या ओवीबद्ध चरित्राचे कर्ते, (उमरावती) यांच्या चौकस बुद्धीचा व मार्मिक दृष्टीचा आम्हांस फार उपयोग झाला. तसेंच रा० पराडकर यांची प्रतही आह्मांस मार्गदर्शक झाली. याबद्दल आह्मी त्यांचे फार आभारी आहों.

ही अल्प सेवा पूर्वीप्रमाणेंच विद्यार्थ्यांस व इतर रसिक वाचकांस आवडेल, अशी आशा आहे. ती त्या जगन्नियंत्याच्या कृपेनें सफल होवो.

नॉर्मल स्कूल, उमरावती.
जानेवारी १९३०.

दा. के. ओक.

# उपोद्घात.

'श्रुतिसम मत्कृति भारत न कळे अज्ञानगर्त नव्यास' ।
यास्तव मयूरकपटें अवतरला भुवि सुकीर्तन व्यास. ॥

चिंतामणि–गोपीचंदाख्यान.

महाभारत हा महर्षि व्यासप्रणीत ग्रंथ मूळ संस्कृत भाषेंत असून, त्यांतील अगाध ज्ञानाचा लाभ संस्कृत भाषा न जाणणाऱ्या लोकांस व्हावा, ह्या उदात्त हेतूनें आमच्या महाराष्ट्रकवींपैकीं सुमारें वीस कवींनीं आपलें काव्यसर्वस्व वेंचून, महाभारतावर निरनिराळे मराठी पेहेराव चढविले आहेत. त्यांपैकीं मोरोपंतांचें आर्याछंदोबद्ध भारत हें एक होय. पंतांनीं हें अगदीं मूळास धरून, पण फार संक्षिप्त रचिलें आहे. मूळ महाभारताची ग्रंथसंख्या एक लक्ष आहे. पण आर्याभारताची ग्रंथसंख्या फक्त १७१३३ आहे. ह्या संबंधानें पंतांनीं ह्मटलें आहेः—

व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी ।
आर्यावृत्तें रचितों, स्वल्पांतचि आणितों कथा सारी. ॥ (आदिपर्व–अ० ११९).

हें आर्याभारत रचण्यांत पंतांचा हेतु आपला उद्धार व्हावा, असा होताः—

हरि ज्यांचा कैवारी, त्या पांडुसुतांसि वंदितों भावें ।
वाटे चरित्र त्यांचें कांहीं आपण तरावया गावें. ॥ (आदिपर्व–अ० ११८).

हा पंतांचा हेतु पूर्णपणें सफळ झाला आहे, यांत कांहीं शंका नाहीं. इतकेंच नाहीं, तर ह्या आर्याभारताच्या वाचनानें व परिशीलनानें आणखी पुष्कळ भाविक वाचकांचाही उद्धार झाला असावा. पंतांनीं आर्याभारत रचून महाराष्ट्रवाङ्मयांत अमूल्य भर टाकिली, व भाविक वाचकांस स्वोद्धाराचा एक मार्ग खुला करून दिला. हे त्यांचे महाराष्ट्रीयांवर फार मोठे उपकार झाले आहेत.

**पंतांचें संक्षिप्त इतिवृत्त.**

मोरोपंतांचे पूर्वज रत्नागिरी जिल्ह्यांत सौंदळ ह्या गांवीं राहात असत. त्यांचेकडे समुद्रावरील व जमिनीवरील जकात वसूल करण्याचें काम असे. परंतु कांहीं कारणामुळें पंतांचे वडील रामचंद्रपंत हे कोंकण सोडून घांटावर आले, व कोल्हापुर दरबाराकडून मुजुमदारीच्या कामावर पन्हाळगडीं त्यांची नेमणूक झाली. याच ठिकाणीं पंतांचा जन्म इ. स. १७२९ (शके १६५१) मध्यें झाला. तेथेंच ते लहानाचे मोठे झाले. पुढें केशव पाध्ये व गणेश पाध्ये ह्या विद्वान् गुरूंजवळ ते विद्या शिकले. पंतांसारखा तैलबुद्धि शिष्य व पाध्यांसारखे मन लावून शिकविणारे गुरु यांची गांठ पडल्यामुळें पंतांचा विद्याभ्यास चांगल्या रीतीनें व अगदीं थोड्या

अवधींत फार उत्तम झाला. पंतांनीं संस्कृत काव्यें, नाटकें व व्याकरण यांचें अध्ययन केलें. अलंकारशास्त्र व छंदःशास्त्र यांत ते पारंगत झाले. न्याय व वेदांत या ग्रंथांचेंही त्यांनीं थोडेंबहुत परिशीलन केलें. परंतु पंतांचे वडील रामचंद्रपंत यांचे हातून कांहीं अक्षम्य अपराध घडल्यामुळें त्यांस कोल्हापुरकरांचा आश्रय सोडून, बारामती येथील लक्षाधीश सावकार व सरदार बाबूजी नाईक जोशी यांचे आश्रयास जाऊन राहावें लागलें. यामुळें पुढें पंतांसही पाध्यांसारख्या सद्गुरूंचे पाय सोडून बारामतीस जावें लागलें. तेथें नाइकांनीं पंतांस आपल्या पदरीं दरसाल ५०० रुपये वेतन देऊन पुराण सांगावयास ठेविलें. पंत अखेरपर्यंत तेथेंच होते. मध्यंतरीं श्री० बाजीराव पेशवे (दुसरे) व श्रीमती देवी अहल्याबाई होळकर, यांनीं पंतांस ज्यास्त वेतन घेऊन, आपल्या पदरीं राहण्याविषयीं विनंति केली होती. परंतु पंतांच्या अंगच्या निःसीम स्वामिनिष्ठा व निर्लोभता या दोन प्रशंसनीय गुणांमुळें ते बारामतीकरांचा आश्रय सोडून गेले नाहींत. पंतांचा कवितासमुद्र फार अगाध आहे, व त्याचें आलोडन करणें सामान्य जनसमूहाचे आवांक्याबाहेरचें काम आहे. पंतांनीं महाभारत (१८ पर्वें), कृष्णविजय, मंत्रभागवत, विविधवृत्तात्मक १०८ रामायणें (ह्यांपैकीं ७५ प्रसिद्ध आहेत), हरिवंश, हे समग्र ग्रंथ व विष्णुपुराण, मार्कंडेयपुराण, देवीभागवत, सप्तशती इत्यादि पुराणांतील फुटकळ व 'सन्मणिमाला' वगैरे संतवर्णनपर व 'केकावलि' वगैरे ईशस्तवनपर अनेक स्वतन्त्र प्रकरणें रचिलीं आहेत. पंतांनीं एक लक्ष ग्रंथ रचिला, अशी प्रसिद्धी आहे. परंतु आजपर्यंत सुमारें साठ हजार ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे. ह्याशिवायही सुमारें दहा हजार ग्रंथ उपलब्ध झालेला आहे.

पंत मराठी कवि म्हणून जरी प्रसिद्ध आहेत, तरी त्यांनीं संस्कृतांतही बरीच काव्य-रचना केली आहे. पंतांनीं 'संस्कृत मंत्ररामायण' व 'मुक्तामाला' वगैरे आणखी पुष्कळ लहान लहान प्रकरणें रचिलीं आहेत. ही त्यांची काव्यकृति उच्च दर्जाची असून, तीवरून पंतांचें गीर्वाणभाषेवरील प्रभुत्व दिसून येतें.

पंत हे खरे भगवद्भक्त व सच्छील ब्राह्मण होते. स्नानसंध्या, देवदेवतार्चन, अतिथि व अभ्यागत यांचा आदरसत्कार, यजमानाबरोबर स्वारींत फिरणें व इतर प्रापंचिक अडचणी, इतकीं तंत्रें सांभाळून ते काव्यरचना करीत असत. ते दररोज १००।१५० आर्या सहज रचीत. त्यांनीं हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व तीर्थें पाहिलीं व यात्रा केल्या. पंतांसारख्या सज्जन, सच्छील व विद्याव्यासंगी सत्कवीच्या भक्तांचें व स्नेह्यांचें मंडळ फार मोठें होतें, यांत कांहीं नवल नाहीं. पंतांचा स्वभाव फार प्रेमळ व सरळ असल्यामुळें कोणाचा त्यांच्याशीं एकदां संबंध जडला, तर तो आजन्म टिकत असे. पंतांच्या आर्यांचें कौतुक करणारे रसिक महाराष्ट्रभर कितीतरी होते, पण ते सर्व सामान्य स्थितींतील गृहस्थ होते. पंतांनीं थोरामोठ्यांच्या प्रसादाची अपेक्षाही कधीं केली नाहीं. पंतांनीं वैद्यकाचा अभ्यास चांगला केला होता, व ते कधीं कधीं औषधयोजनाही करीत असत. पंतांच्या काव्यांत वैद्यकासंबंधीं दृष्टांत मधून मधून आढळतात. पंतांनीं वैद्यकावर आर्या रचिल्या आहेत, असें ह्मणतात. पण त्या अद्याप प्रसिद्ध नाहींत. पंतांनीं अशा रीतीनें आपल्या आयुष्याचा सद्व्यय

केला, व 'प्रपंच आणि परमार्थ' साधून इ. स. १७९४ त ( हनुमंतजयंति, शके १७१६ ) ह्मणजे आपल्या वयाच्या ६५ वे वर्षीं परलोकीं प्रयाण केलें. पंतांच्या आईचें नांव लक्ष्मीबाई व पत्नीचें रमाबाई असें होतें. रामकृष्ण, रघुनाथ व काशीनाथ हे तीन मुलगे, व सईबाई व साळूबाई ह्या दोन मुली, मिळून पंतांस एकंदर पांच अपत्यें होतीं. पंतांचे वंशज पंढरपुरास आहेत व त्यांच्यापाशीं पंतांचा ग्रंथसंग्रह आहे. पंतांनीं आपले स्वतःचे ग्रंथ स्वहस्तानें लिहून ठेविले आहेत. तसेंच पंत अनेक विषयांवरील संस्कृत व मराठी ग्रंथ परिश्रमपूर्वक संपादन करून व स्वतः लिहून घेऊन संग्रहीं ठेवीत असत. ह्या सर्व पोथ्या पंतांनीं भराभर लिहून घेतलेल्या आहेत, तरी त्या सर्व सुवाच्य व शुद्ध आहेत.

**पंतांच्या कवितेंतील गुणावगुण.**

पंतांच्या पूर्वींच्या कवींनीं प्रायः ओंवीसारख्या सोप्या वृत्तांत व आबालवृद्धांस समजेल अशा सोप्या भाषेंत काव्यरचना केल्यामुळें, त्यांचे ग्रंथ फार लोकप्रिय आहेत. परंतु पंतांच्या कवितेंत संस्कृत शब्दांचा भरणा व लांबलांब समास असल्यामुळें, सामान्य वाचक प्रथमदर्शनींच घाबरून जातो. परंतु त्यास एकदां का पंतांच्या काव्याची गोडी कळली, ह्मणजे मग मात्र पंतांच्या काव्यरसाचें आकंठ पान करण्याची त्याची इच्छा दुणावते. पंतांनीं आपल्या कवितावधूस अनेक शब्दालंकार व अर्थालंकार यांनीं भूषविलें आहे. तथापि अर्थहानि यत्किंचितही झालेली नाहीं. पंतांची शब्दयोजना व वर्णनाची हातोटी फार खुबीदार असते. मराठी भाषा व नवरस जणूं काय पंतांपुढें हात जोडून उभेच आहेत, असें वाटतें. तसेंच पंतांचें काव्य ह्मणजे चालत्या बोलत्या चित्रांचें प्रदर्शनच आहे. मनुष्यस्वभावाचें यथायोग्य वर्णन पंत फारच मार्मिकपणें करितात. निरनिराळ्या पात्रांस शोभतील अशींच भाषणें पंतांनीं त्यांच्याकडून वदविलीं आहेत. आपल्या भाषणांत येणाऱ्या 'म्हणीं'चा पंतांनीं उपयोग केला आहे, यामुळें थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ येऊन, भाषा मोठी मोहक झाली आहे. आणखी, पंतांनीं निरनिराळ्या क्रियांचे सूचक शब्दसमुदाय–ज्यांस अनुकरणवाचकशब्द असें ह्मणतात–त्यांचा यथोचित उपयोग केल्यामुळें 'अर्थ व ध्वनि' यांची सांगड जुळून भाषेस भारदस्तपणा आला आहे. शिवाय, पंतांच्या काव्यांत ठिकठिकाणीं नीतितत्वांचा बोध करणारीं सुभाषितरत्नें चमकत असल्यामुळें त्यांच्या काव्याची प्रभा फारच फांकली आहे. भाषाशुद्धि हा पंतांच्या काव्यांतील विशेष आहे. पंतांच्या पूर्वींच्या कवींनीं भाषाशुद्धीकडे फारसें लक्ष्य दिलेलें नाहीं. पण पंतांनीं मराठी भाषेस संस्कृताच्या वळणावर नेऊन, तिच्यामध्यें नवीन जोम उत्पन्न केला आहे. पंतांच्या भाषेंत परकीय ह्मणजे मुसलमानी अंमलामुळें प्रचारांत आलेले आरबी व फारसी शब्द आढळत नाहींत, असें नाहीं, परंतु ते फारच विरळा आहेत. सारांश, पंतांनीं आपल्या काव्यमंदिराची उभारणी इतकी काळजीपूर्वक केली आहे, कीं काव्यशिल्पकुशलाचे अंगीं अवश्य असणाऱ्या सहृदयता, मार्मिकपणा, कल्पकपणा इत्यादि गुणांची साक्ष पटते. पंतांनीं आपल्या कवितासुंदरीस इतकी नटविली आहे, तथापि तींत मुळींच दोष नाहींत, असें नाहीं. ह्या जगांत निर्दोष व निरामय असें कांहींच नाहीं. प्रत्येक वस्तुमात्राचे ठिकाणीं दोष असणें, स्वाभाविकच

आहे. ह्या नैसर्गिक नियमास अनुसरून व्याकरणच्युति, यमक साधण्यासाठीं शब्दांची ओढाताण व नीरस उपमा, अपरिचित व ग्राम्य शब्दांचा उपयोग, संधिनियमांचें उल्लंघन वगैरे दोष क्वचित् आढळतात. पण 'सिंधूंत बिंदू' ह्या न्यायानें त्यांचें प्रमाण फारच थोडें व हिशेबांत न धरण्यासारखें आहे.

पंतांची कविता त्यांच्या हयातींतच फार लोकप्रिय होऊन तिचा हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतील मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांमध्यें प्रसार झाला होता. ह्यासंबंधानें पंतांचे व्याही 'धर्मसिंधु'कर्ते बाबा पाध्ये यांनीं—

ज्या उपजतांचि गेल्या काशी-रामेश्वरा नमायाला ।
आर्या, त्यां प्रौढपणीं जगतीतल हें पुरे न मायाला. ॥

असे जे उद्गार काढिले, ते पुष्कळ अंशीं खरे आहेत. पंतांच्या कवितेचा प्रसार विशेषतः रामजोशी ( लावणीकार ) यांच्यामुळें झाला. त्यांनीं पंतांच्या कवितांचा उपयोग आपल्या कीर्तनांत करावयास सुरुवात केल्यामुळें, पुष्कळ हरिदास व कीर्तनकार हेही पंतांच्या कवितेच्या द्वारें रंगदेवतेस प्रसन्न करून घेऊन, श्रोतृसमाजास पंतकाव्याच्या माधुरींत तल्लीन करून सोडीत असत.

पंतांच्या काव्यासंबंधीं त्या काळीं लोकांमध्यें केवढा आदर वाटत असे, हें ह्या पर्वाच्या एका हस्तलिखित प्रतीच्या शेवटीं लेखकानें जीं दोन स्वकृत पद्यें दिलीं आहेत, त्यांवरून दिसून येतें. (पृष्ठ ९५ पहा). तसेंच पंतांच्या काव्योदधींत यथेच्छ अवगाहन करून त्यांतील रम्य कल्पना, मधुर व खुबीदार शब्दयोजना इत्यादि रत्नें हस्तगत करून घेणारेही कांहीं कवि आढळतात. विदर्भदेशीय संतकवि श्रीदयाळनाथमहाराज (इ० स० १७८८–१८३६) यांनीं आपल्या पद्यरूपी कोंदणांत पंतकाव्योदधींतील अमूल्य रत्नें किती कौशल्यानें बसविलीं आहेत, हें पाहण्यासारखें आहे. ह्यासंबंधानें दयाळनाथकृत 'द्रौपदीचा धांवा' ह्या पर्वाच्या पांचव्या अध्यायाशीं वाचकांनीं जरूर ताडून पाहावा.

**आर्याभारत.**

पंतांनीं आपलें आर्याभारत केव्हां रचिलें, हें नक्की समजत नाहीं. परंतु पंतांच्या काव्यांतील कांहीं पद्यें व त्यांचा उपलब्ध असलेला पत्रव्यवहार, यांवरून असें दिसतें कीं, पंतांनीं आपलें भारत इ० स० १७७२ ( शके १६९४ ) चे सुमारास सुरू करून इ० स० १७८२ ( शके १७०४ ) चे सुमारास पुरें केलें असावें. कारण असें मोठें काम आंगावर घेऊन, पुरें पाडण्यास कवित्वस्फूर्तीचा चांगलाच विकास व्हावयास पाहिजे. तो पंतांच्या प्रौढवयांत म्हणजे वयाची चाळिशी उलटल्यानंतर झाला असला पाहिजे, हें उघड आहे. शिवाय पंतांनीं मराठी भाषा 'करतलामलकवत्' केल्याशिवाय व त्यांची काव्यरचनाशक्ति पूर्णत्वास पोहोंचल्याखेरीज हें 'आर्याभारत' रचिलें नसावें, असें म्हणण्यास अनेक अंतस्थ प्रमाणेंही आहेत. पंतांस महाभारतावर ग्रंथरचना करण्याविषयीं प्रोत्साहन त्यांचे गुरू पाध्येद्वय देत असत. हें आर्याभारत 'भक्तमयूरकरें श्रीगुरूनें लिहिविलें' [ सभापर्व–अध्याय ७।९२ ] असे मोघम उद्गार पंतांनीं आर्याभारतांत ठिकठिकाणीं काढिले आहेत. परंतु पाध्यांच्या चरणकृपेनेंच

आपण आर्याभारत रचिलें, असें पंतांनीं स्वर्गारोहणपर्वाचे अखेरीस, केशव व गणेश पाध्ये या गुरूंचा स्पष्ट नामनिर्देश करून सांगितलें आहे. ( स्वर्गारोहणपर्व–अध्याय २।३४ ). यावरून पंत आपल्या गुरूंविषयीं किती पूज्यभाव व आदर बाळगीत असत, हें दिसून येतें.

**सभापर्व.** संस्कृत भारताचीं *अठरा पर्वे आहेत. त्याप्रमाणेंच पंतांनींही आपलें 'आर्याभारत' अठरा पर्वांत विभागिलें आहे. त्यांपैकीं 'सभापर्व' हें दुसरें होय. ह्यांत इंद्र, वरुण, यम, कुबेर व ब्रह्मदेव यांच्या सभांचें वर्णन असून मयसभेचें व त्या सभेंत दुर्योधनादि कौरवांच्या झालेल्या मानहानीचें वर्णन आहे. शिवाय कौरवसभेंत घडलेल्या द्रौपदीवस्त्रहरण–प्रसंगाचेंही सविस्तर वर्णन आहे. यामुळेंच या पर्वास 'सभापर्व' असें अन्वर्थक नांव दिलेलें आहे. हें पर्व जरी सर्व आर्याभारताच्या मानानें अगदीं लहानसें आहे, तरी तें फार लोकप्रिय आहे. ह्याच्या प्रती खेड्यापाड्यांतून सुद्धां आढळतात. 'देवी ह्मणे अनार्या' ही आर्या ( अ० ५।७ ) तर अगदीं आबालवृद्धांच्या तोंडीं कित्येक वर्षांपासून आहे. पंतांच्या सरस रसवतीचे मासले ह्या पर्वांत ठिकठिकाणीं आढळतात. ( अ० ३, ५, ६, ७; पहा. ) पण त्यांतही द्रौपदीला सभेंत नग्न करावयास नीच दुःशासन प्रवृत्त झाला, तेव्हां तिनें केलेला श्रीकृष्णाचा धांवा ( अ० ५।६९–७९ ) अप्रतिम आहे. ह्या आर्या इतक्या मोहक व कारुण्यमय आहेत, कीं त्या वाचून एकाद्या पाषाणहृदयाला देखील गहिंवर येईल. एकंदरींत ह्या पर्वांत सर्वच प्रसंग मोठे बहारीचे आहेत, व ते पंतांच्या 'बह्वर्थ जनमनोहर स्वल्पाक्षर मधुर सत्य' वर्णनाची प्रचीती पटवितात. पंतांनीं इंद्रवरुणादि देवसभांच्या वर्णनाचा अत्यंत संक्षेप केला आहे. परंतु पांडवांचें चरित्र वर्णन करावयाचें हाच पंतांचा मुख्य हेतु असल्यामुळें, त्यांनीं पांडवचरित्रविषयक वर्णनास उगाच फांटा देऊन रसहानि केली नाहीं. पंतांच्या मनांतून पळवाट काढावयाची असली, तरी योग्य कारण सांगितल्यावांचून ते तसें करीत नाहींत ( अ० १।३३, २।३४ पहा ). पंतांच्या कल्पनेची भरारी फार उंच व वर्णनशैली अगदीं अस्खलित असल्यामुळें वाचक आपलें देहभान विसरून काव्यरसाचा आस्वाद घेण्यांत अगदीं गुंग होतो. वर 'काव्यगुणावगुण' ह्या सदरांत वर्णन केलेले बहुतेक सर्व गुण ह्या पर्वांत आढळतात. 'पाण्यापरिस पातळ करणें;' 'नाकांत काड्या घालणें' 'रेंच उतरणें,' 'नागवा कोल्हा भेटणें,' 'कर चोळणें' वगैरे लोकोक्ति व 'खदखद,' 'फरफरां,' 'डरडरां,' 'खळखळां' वगैरे अनुकरणवाचक शब्द यांची योग्य स्थळीं योजना केल्यामुळें त्या त्या ठिकाणचीं वर्णनें चित्तवेधक झालीं आहेत. पापभीरु विदुर, धर्मनिष्ठ व शांतवृत्ति धर्मराज, कपटपटु शकुनि, मुत्सद्दी भीष्म, तामसी भीम, धोरणी अर्जुन, अविचारी दुर्योधन, पतिव्रता द्रौपदी, दूरदर्शी गांधारी वगैरे पात्रांचीं शब्दचित्रें अत्यंत चेतोहर आहेत. गांधारीचा दुर्योधनासंबंधीं 'नव्हे सदश्व गाढव हा' ( अ०

---

* अठरा पर्वांचीं नांवें—आदिपर्व, सभापर्व, वनपर्व, विराटपर्व, उद्योगपर्व, भीष्मपर्व, द्रोणपर्व, कर्णपर्व, शल्यपर्व, गदापर्व, स्त्रीपर्व, शांतिपर्व, अनुशासनपर्व, अश्वमेधपर्व, आश्रमवासिकपर्व, मौसलपर्व, महाप्रस्थानिकपर्व, व स्वर्गारोहणपर्व.

६।८४ ) व अदितीच्या तोंडचा 'या मेल्याचें समूळ तळपट हो' ( अ० ५।८७ ) हे उद्गार स्त्रीस्वभावास साजेसे नाहींत, असें कोण ह्मणेल? ह्या पर्वास पंतांनीं अनेक अलंकारांनीं भूषविलें आहे. ह्यांपैकीं अर्थालंकारांचा उल्लेख आह्मी ठिकठिकाणीं केलाच आहे. काव्यामध्यें शब्दालंकारांस विशेष महत्व दिल्यानें अर्थहानि व रसहानि होण्याची भीति असते. ह्यामुळें ते रसिकजनांस फारसे संमत नाहींत. तथापि पंतांनीं त्यांचा अनादर न करितां, योग्य ठिकाणीं त्यांची योजना केली आहे. (अ० १।६०;४।२९,४१,४४,५७; ६।११,८८; अ० ७।८).

हें पर्व अनेक कारणांनीं फार महत्त्वाचें आहे. भारती युद्धास कारणीभूत झालेलें द्यूत व द्रौपदीवस्त्रहरण यांत वर्णिलेलें आहे. कौरवांच्या सुदैवानें द्यूतक्रीडा व वस्त्रहरण ह्या दोन गोष्टी—विशेषतः वस्त्रहरण—त्यांचे हातून घडलें नसतें, तर पुढें झालेलें कौरवपांडवांचें घनघोर युद्ध, त्यांत झालेला कल्पनातीत रक्तपात, दुष्ट कौरवांचा व तत्पक्षपाती वीरांचा नाश वगैरे संतापजनक व उद्वेगकारक प्रसंग टळले असते. पण 'भवितव्यता बलीयसी' हेंच खरें! ह्याखेरीज हें पर्व ह्मणजे एक अमूल्य नीतितत्वांचें भांडारच आहे. संकटसमयीं देखील स्त्रियांनीं आपला परमेश्वर जो पति, त्याचे इच्छेनुरूप वागणें, कनिष्ठ बंधूंनीं ज्येष्ठ बंधूस पित्यासमान मानून त्याचे आज्ञेंत राहणें, सज्जनांनीं आपलें सत्व ढळूं न देणें, सेवकांनीं स्वामिनिष्ठ राहणें, इत्यादि व्यवहारांतील नियमांस अनुसरून वागण्याविषयीं वस्तुपाठ ह्या पर्वांत आहेत. त्यांचें मनन करून, त्याप्रमाणें वागल्यास सर्वांचें कल्याण होईल, यांत कांहीं शंका नाहीं. तसेंच द्यूतक्रीडाव्यसनापासून काय परिणाम होतो, हें सुद्धां ह्या पर्वाचे वाचनानें कळून येतें. हें घोर व्यसन पांडवांच्या वेळेपासूनच आपल्याकडे प्रचारांत आलें आहे, असें नाहीं. पृथ्वीवरील अत्यंत जुनाट मानलेला जो ऋग्वेद, त्यांतही या भयंकर व्यसनाच्या दुष्ट परिणामांचें उत्तम वर्णन आढळतें. ह्यावरून ह्या व्यसनाचा अंमल अगदीं प्राचीन काळापासून आमच्यावर किती बसला आहे, हें स्पष्ट होतें. एकदां मनुष्य ह्या व्यसनाच्या कचाट्यांत सांपडला, ह्मणजे त्याची व त्याच्या कुटुंबांतील माणसांची कशी दुर्दशा होते, हें पांडवांच्या चरित्रावरून दिसून येतें. सध्यांच्या काळीं देखील, सरकारी कायद्यांस न जुमानतां, ह्या अधोगतीस नेणाऱ्या व्यसनाच्या फंदांत पडल्यामुळें चांगले सुसंपन्न गृहस्थ धुळीस मिळाल्याचीं उदाहरणें वारंवार दृष्टीस पडतात. पंतांनीं ह्या व्यसनासंबंधीं 'अक्षग्रह घातभ्रमकर, नसे असा धुतरा' ( अ० ६।१०० ) असे उद्गार काढिले आहेत, व 'जे व्यसन टाकणारे बुध हा ऐकोत अक्षमहिमा ते' ( अ० ४।६९ ) असें ह्मणून मोठ्या मार्मिकपणानें ह्या व्यसनापासून परावृत्त होण्याविषयीं वाचकांस विनविलें आहे. ह्मणून हें पर्व वाचून जुगार खेळणाऱ्यांपैकीं एकाद्याचें मन जरी ह्या व्यसनापासून परावृत्त झालें, तरी पंतांच्या आत्म्यास स्वर्गांत खात्रीनें आनंद होईल. ह्यासंबंधानें पंतांनीं सांगितलेली महत्वाची गोष्ट ( अध्याय ३–४२ )

**'न मृषा, द्यूताप्रति अतितर खर, म्हणति, न असीप्रति, ह्यातें.'।**

ही प्रत्येक वाचकानें आपल्या हृत्पटलावर कोरून ठेवण्यासारखी आहे.

ापलें भारत 'गीति'वृत्तांत रचिलें आहे. परंतु पंत 'गीती'लाच 'आर्या' ह्मणतात. गीति व आर्या हीं दोन्ही मात्रागणवृत्तें असून त्यांच्या रचनेंत-ही बरेंच साम्य असतें. यामुळें कदाचित् पंत गीतिवृत्ताला मराठींत आर्यावृत्त ह्मणत असावे. आर्यावृत्ताचा ( गीतीचा ) गौरव पंतांनीं आ-पल्या काव्यांत जागोजाग केला असून, आपण हें वृत्त मराठींत आणलें दर्पोक्ति काढिली आहे व ती ह्या 'आर्या'पतीस निःसंशय शोभते. ह्या ह्मणजे ा प्रथम व तृतीय चरणांत बारा, व दुसऱ्या व चवथ्या चरणांत अठरा मात्रा :—

ठकासि कवि न शापिति ॥ देतें जड कनक काय हो गाळी ॥
ठी जो त्यासि मधुर ॥ इक्षु तसा त्याहि अदय जो गाळी. ॥

(अध्याय ७. ३१).

र्या' वृत्ताच्या प्रथम व तृतीय पादांत बारा, दुसऱ्यांत अठरा व चौथ्यांत असतात. 'गीति' व 'आर्या' यांत भेद इतकाच कीं, गीतीच्या प्रत्येक तीस मात्रा असतात; आर्येच्या प्रथमार्धांत तीस व द्वितीयार्धांत सत्तावीस ा. ह्मणजे ह्या दोन्ही वृत्तांचे पहिले तीन चरण सारखेच असून, फक्त 'आर्ये'-ारणांत 'गीती'च्या चौथ्या चरणांतील मात्रांपेक्षां तीन मात्रा कमी असतात.

हुतेक कविता 'गीति' वृत्तांत आहे. श्लोक, आर्या, आर्यागीति, साकी वगैरे ोडी आहे. पंतांनीं कांहीं पदें व आरत्या देखील रचिल्या आहेत.

दा० के० ओक.

# अनुक्रमणिका.

# परिशिष्टें.



# शुद्धिपत्र.

| पृष्ठांक | पद्य किंवा टीप | अशुद्ध | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ६ | ३६ | पारिर्जातकीं | पारिर्जातकीं |
| १८ | टी० २२ | यांची ईक्षास | यांची ईक्षा |
| २० | २० | विसंबिति | विसंबति |
| ,, | २२ | सीतेतें, | सीतेतें. |
| २३ | टी० ३ | उत्तम अशा | उत्तम यश. |
| २६ | ६ | न हो, | न हो. |
| ४० | ४५ | नागा ? | नागा ?' |
| ४५ | टी० ४ | angeeic | angelic |
| ६७ | ११६ | मी कृष्णा | भी कृष्णा |
| ,, | टी० १० | मौनान्न न | मौनान्न स |
| ,, | ,, | न अरण्य° | नारण्य° |
| ७९ | टी० १८ | कढईमध्यें | कढईमध्यें; ( पक्षीं ) ब्रह्मांडकटाहांत. |

# मोरोपंतकृत महाभारत.



## २. सभापर्व.

(गीतिवृत्त.)

### अध्याय[1] पहिला.

पां[2]चाळीपतिस[3] म्हणे मय[4], 'कांहीं सांग आपुली सेवा[5].' ।
पार्थ म्हणे, 'सख्य असो, अथवा हें[6] मांग यादवा[7] देवा.' ॥ १
श्री[8]पति त्यासि[9] म्हणे, 'तूं शिल्पचमत्कारकोटिजनक[10] मया ! ।
निर्मुनि दे रुचिर सभास्थाना[11] निर्दोषरत्नकनक-मया[12].' ॥ २
आज्ञा करुनि असि प्रभु[13] भेटवुनी[14] सबहुमान धर्मातें ।
स्वपुरीस[15] जाय; मग करि भगवदुदित[16] दैत्य[17] विश्वकर्मा[18] तें. ॥ ३

---

१ ह्या अध्यायांत पंतांनीं मूळांतील पहिल्या पंचवीस अध्यायांतील कथानकाचा सारांश ग्रथित केला आहे. मुक्तेश्वरांनीं हा सर्व कथाभाग स्वकृत सभापर्वाच्या पहिल्या सात अध्यायांत म्हणजे सुमारें एक हजार ओंव्यांत सविस्तर वर्णिला आहे. २ ह्या पर्वाच्या प्रथम पद्यांत जें प्रथमाक्षर 'पां' आहे, तें 'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति' ह्या अष्टादशाक्षरी संस्कृत मंत्राचें द्वितीय अक्षर आहे. 'सभापर्व' हें दुसरें पर्व, व 'पां' हें वरील मंत्राचें दुसरें अक्षर होय. पंतकृत महाभारताच्या प्रत्येक पर्वाच्या पहिल्या पद्याचें पहिलें अक्षर घेतलें असतां पूर्वोक्त मंत्र निष्पन्न होतो. अशा खुबीनें सर्व पर्वांचा आरंभ करून त्या सर्व पर्वांची एक माला गुंफून टाकल्यासारखें पंतांनीं केलें आहे. गुरुशिष्यपरंपरेमध्यें गुरु जेव्हां आपल्या शिष्यांना मंत्रोपदेश करितात, तेव्हां ते 'ॐनमो भगवते वासुदेवाय', 'ॐ नमः शिवाय', 'श्रीराम जय राम जय जय राम' वगैरे मंत्रांचा उपयोग करितात, हें सर्वांना माहीतच आहे. परंतु 'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति' हा मंत्र गुरुशिष्यसंप्रदायापैकीं नसून, तो पंतांनीं बनविलेला आहे असें दिसतें, व तो महाभारतांतील कथानकाच्या सारांशाला अनुसरून होईल, असाच आहे. ३ पांचाळी(द्रौपदी)+पतिस=अर्जुनास. ४ मयासुर, दानवांचा कारागीर (विश्वकर्मा). ५ चाकरी, कामगिरी. ६ जें कोणतें काम करावयाचें तें. ७ कृष्णाला. ८ श्री (लक्ष्मी)+पति=कृष्ण, माधव. ९ मयासुराला. १० कलाकौशल्याचे कोट्यवधि अद्भुत प्रकार निर्माण करणारा. ११ सुंदर सभागृहाला. १२ निर्मल रत्नें आणि सुवर्ण ह्यांनीं युक्त अशा. 'मय' ह्या प्रत्ययाचा अर्थ 'विशिष्ट,' 'युक्त,' 'परिपूर्ण' असा आहे. १३ कृष्ण. १४ कृष्णानें धर्मापाशीं मयासुराला नेऊन, भेटवून. १५ आपल्या नगरीस, द्वारकेंत. १६ श्रीकृष्णानें सांगितलेलें (काम.) १७ 'स्वपुरीं जाय, मग करी भगवदुदित कार्य विश्वकर्मा तें' असाही पाठ आहे. १८ शिल्पपंडित. मयासुर हा असुरांचा शिल्पी, आणि विश्वकर्मा हा देवांचा शिल्पी होय. पण पंतांनीं येथें देवशिल्प्याचें 'विश्वकर्मा' हें नांव विशेषण करून मयासुराला लाविलें आहे. विश्व (सर्व जगत्) कर्म (कृतीनें साध्य) ज्यास तो विश्वकर्मा.

देवांनीं हि करावा [1]ज्याच्या [2]स्वेष्टार्थ नवस भाल्यातें, ।
[3]अनृणत्वार्थ **मयासुर** निर्मुनि दे दिव्य नव सभा [4]त्यातें. ॥ ४
स्थळ तें जळ, जळ तें स्थळ भासे, जीमाजि [5]रत्न-सारस-भा ।
भुलवि भ्रमरां अमरांस हि, ती [6]चित्रा चि [7]रत्नसार सभा. ॥ ५
**भी**माला [8]आणुनि दे [9]**वृ**षपर्व्याच्या [10]गदोत्तम-गदेतें, ।
म्हणति रिपु जिचें दर्शन आधीं भय, [11]मृत्युचें हि मग देतें. ॥ ६
दे [12]**दे**वदत्तशंख [13]स्वत्रात्या **अर्जु**नास दास **मय**, ।
घे मागोनि असें कीं, 'मज भेटीला असो सदा [14]समय.' ॥ ७
त्या **म**यसभेंत शोभे **धर्म**, [15]सुधर्मासमेंत [16]**वा**सवसा; ।
[17]बुधे [18]अन्योन्य म्हणति, 'कां जातां ? या; हा चि [19]नाकवास, [20]वसा.' ॥ ८
[21]अर्थिजनासह धाउनि [22]गुणें, दे साधूंसि **धर्म** सहवास, ।
[23]कमळाकर [24]मधुपातें जेंवि [25]प्रेषूनि वायुसह [26]वास. ॥ ९
नव नव नवल कराया न [27]धरी लेश हि [28]ईची च आळस [29]भा, ।
राजर्षि महर्षि सकळ [30]येथें [31]शून्या चि भूमिपाळसभा. ॥ १०

---

१ ज्या अर्जुनाच्या. २ आपल्या कल्याणाकरितां. ३ खांडववनदाहप्रसंगीं अर्जुनानें मयासुराचें संरक्षण केलें, त्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां. [मोरोपंतकृत आदिपर्व-अध्याय २७ पहा]. ४ त्या अर्जुनातें. ५ रत्नखचित कमलांची प्रभा. ६ चित्रविचित्र. ७ रत्नमयी, रत्नखचित. ८ कैलासपर्वताच्या उत्तरेस मैनाकपर्वतावर बिंदुसरोवरीं वृषपर्वानामक दानवानें ठेविलेली गदा मयासुरानें भीमाला आणून दिली. ९ असुरांचा अधिपति. १० गदेमध्यें श्रेष्ठ जी गदा तीतें. ११ त्या गदोत्तमगदेचें दर्शन आधीं भय देतें, मृत्यूचें [दर्शन] मग [भय] देतें. प्रत्यक्ष मृत्यूपेक्षांही ती गदा भयंकर होती, असा भाव. 'मृत्युतेंहि' असाही पाठ आहे. १२ हा महाशंख वरुणाचा होता. १३ आपल्या रक्षणकर्त्यास. १४ उचित काळ, योग्य संधी. मला कधीं भेटण्याची इच्छा झाली असतां, 'ही भेटण्याची वेळ नव्हे', किंवा 'सध्यां भेट घेण्यास वेळ नाहीं' असें आपण कधीं म्हणूं नये–असा भाव. १५ देवसभेंत. १६ इंद्रासारखा. १७ पंडित, ज्ञाते. १८ एकमेकांस. १९ स्वर्गवास. २० रहा. २१ याचकांबरोबर. २२ सद्गुण, कीर्ति. ही गीति रचितांना पंतांच्या मनांत पुढील सुभाषित श्लोक घोळत होता, असें वाटतें:–'गुणाः कुर्वन्ति दूतत्वं दूरेऽपि वसतां सतां । केतकीगंधमाघ्राय स्वयमायान्ति षट्पदाः ॥' २३ कमलांची खाण (सरोवर), किंवा कमलांचा समुदाय. २४ भ्रमरांतें. २५ धाडून. ज्याप्रमाणें वाऱ्यामुळें पसरलेल्या सुगंधाच्या योगानें भ्रमर मोहित होऊन कमलांनीं युक्त अशा सरोवराच्या ठिकाणीं राहावयास जातात, त्याप्रमाणें याचकांच्या तोंडून कीर्ति ऐकून साधुजन धर्मराजाच्या सहवासांत राहावयास जात–असा स्पष्टार्थ. २६ सुवास, सुगंध. २७ 'धरो' असा अन्य पाठ आहे. २८ या मयसभेची. २९ कांति, शोभा. ३० या सभेंत अनेक राजर्षि आणि महर्षि होते. देवल, असित, शुक, जैमिनि इत्यादि वेदवेदांगपारग महर्षि आणि भुंजकेतु, उग्रसेन, दुर्मुख इत्यादि राजर्षि होते. ३१ 'न्यूनाचि' असें पाठांतर आढळतें.

नित्य नवे चि महोत्सवकोटींचे त्या सभेंत भर [1]भरती. ।
[2]विस्तर कशास ? परि हरिदासगृहींची [3]उदंड [4]भरभर ती. ॥ ११
तेथें [5]ज्ञानविशारद [6]शारदशशिगौर [7]गौरवार्ह [8]कवी ।
[9]दुस्तरभवाब्धिपारद नारद येउनि [10]मुनीतिला शिकवी. ॥ १२
[11]तच्चरण प्रक्षाळुनि, जें चिंतिति [12]परे महर्षि, तें पाणी ।
सेवूनि, जोडिले [13]कुरुकुलतिलकें [14]परम-हर्षितें [15]पाणी. ॥ १३
तो मुनि धर्मासि म्हणे, '[16]वात्सल्य करी पिता परम [17]तोकीं, ।
तैसें [18]भवान् स्वराष्ट्रीं करुनि, निवारूनि ताप, रमतो [19]कीं ? ॥ १४
जे [20]राजधर्म [21]सुरतरुसख [22]मखसे [23]सुखद [24]उद्धवद नाकीं ।
त्यांसि जपोनि, [25]गुरूंच्या देसी यश परमशुद्ध वदना कीं ? ॥ १५
वर्तत आले जैसें [26]पूरुकुलज साधु भीष्मपर्यंत ।
वर्तसि तसें चि कीं ? तूं करिसी कीं [27]सद्यशोर्थ [28]अर्यंत ? ॥ १६
नाम खरें केलें कीं ? सुखद जसा मेघ [29]कोटिकेकींतें ।
[30]सुयशा तसा कवींतें, सद्यश कवणा नको ? टिके कीं [31]तें ?' ॥ १७
धर्म म्हणे, 'गुरुराया ! बहु काय वदों तुम्हांपुढें देवा ! ।
तुमचा प्रसाद इच्छुनि करितों [32]सत्रास दास मीं सेवा. ॥ १८

---

१ उत्कर्ष पावती. २ एकादी कथा विस्तारानें वर्णन करण्याजोगी असली, तरी कांहीं निमित्त योजून तिचा विस्तार करावयाचा नाहीं, असा पंतांचा परिपाठ आहे, त्याचें हें एक उदाहरण होय. ३ विपुल, पुष्कळ. ४ भरभराट, समृद्धि, चढती कळा. ५ सर्वशास्त्रनिपुण. ६ शरदृतूंतील चंद्रासारखा स्वच्छ आहे गौरवर्ण ज्याचा. ७ सत्कारास योग्य. ८ सुज्ञ, पंडित. ९ तरून जाण्यास कठीण अशा संसारसमुद्राचे पैलतीरास नेणारा. १० ही नारदनीति मूळसभापर्वाच्या पांचव्या अध्यायांत आहे. नारदानें प्रश्नरूपानें धर्मास ही राजनीति सांगितली असून, प्रत्येक प्रश्न 'कच्चित्' (कीं ? काय ?) या शब्दानें केला आहे, म्हणून हिला 'कच्चित्प्रश्न' असें नांव पडलें आहे. ही नारदनीति मुक्तेश्वरांनीं स्वकृत सभापर्वाच्या तिसऱ्या अध्यायांत सविस्तर वर्णिली आहे. संस्कृतभाषानभिज्ञ वाचकांनीं तो अध्याय अवश्य वाचावा, अशी सूचना आहे. ११ त्या नारदाचे चरण. १२ श्रेष्ठ. १३ कुरुवंशांतील श्रेष्ठ अशा धर्मराजानें. १४ अत्यानंदयुक्त अशा (धर्मानें). १५ हात. १६ प्रीति. १७ अपत्याचे ठायीं (बालकीं). १८ आपण. 'भवान्' तृतीय पुरुष आहे म्हणून 'रमतो' असें क्रियापद आहे. १९ मूळांत 'कीं' बद्दल 'कच्चित्' शब्दाचा प्रयोग केला आहे. २० राजगुण–कार्योपदेशकौशल, प्रागल्भ्य, मेधावित्व, नीतिशास्त्रज्ञत्व, झालेल्या आणि होणाऱ्या गोष्टींचें ज्ञान, इत्यादि राजगुण. २१ कल्पवृक्षाचे मित्र. २२ यज्ञसे. २३ सुख देणारे. २४ 'उत्सवद' असा पाठभेद. २५ वडील माणसांच्या. २६ पुरुवंशज. २७ चांगल्या यशाकरितां. २८ अरि+अंत=शत्रूंचा नाश. २९ कोट्यवधि मयूरांना. ३० सुकीर्तिमान असा. (धर्माचें विशेषण). ३१ सुयश. ३२ सभय, काळजीपूर्वक. 'दरस् त्रासो भीतिर् भीः साध्वसं भयम्' इत्यमरः.

युष्मत्पद[1] राज्यपद, प्रभुजी! करितों जपोनि परिचरण[2]।
मी तों अशक्त मंद चि, तुमचे श्रितकल्पवृक्ष[3] परि चरण.' ॥ १९
यापरि वदोनि हितमितवर्णा[4] कर्णामृता[5] खऱ्या वचना ।
मुनिस म्हणे धर्म, 'तुम्ही विश्वाची सर्व जाणतां रचना. ॥ २०
मयकृत सभा जसी हे, ऐसी कीं ईपरीस जरि बरवी ।
कोठें असेल, सांगा; सत्य जगच्चक्षु[6] तूं, असा न रवी[7].' ॥ २१
हांसोनि म्हणे नारद, 'भूवरि तों हे चि दिव्यरुचि[8], राजा!।
ऐक, सभा तुज कथितों देवांच्या ईपरीस रुचिरा[9] ज्या. ॥ २२
शक्रसभा[10] सार्धशतकयोजनदीर्घा[11], तसीच विस्तीर्णा ।
शतयोजनें, तदाश्रित[12] जनता[13] ती सर्वदुःखनिस्तीर्णा[14]. ॥ २३
वाल्मीकिमुनि पराशर दुर्वासा याज्ञवल्क्य मूर्तमख[15] ।
तेथें शुक्र बृहस्पति जलद हरिश्चंद्र, सर्व वायुसख[16]. ॥ २४
तीमाजि अप्सराजन[17] नाचे, गंधर्ववृंद[18] आलापी[19], ।
या सु-रसा[20] सुर-सा[21] जन[22] सुकृती[22] आतृप्ति[23] तेथें[24] आला[24] पी. ॥ २५

१ आपले चरण. या गीत्यर्धांत 'काव्यलिंग' अलंकार आहे. २ सेवा. ३ आश्रितांस कल्पतरूसारखे. परि तुमचे चरण श्रितकल्पवृक्ष होत–असा अन्वय. येथें 'विरुद्धगुणन्यास' नामक अलंकार आहे. 'परस्परविरुद्ध गुणांचे दोन पदार्थ एकत्र आणून त्यांची जेथें तुलना केलेली असते, तेथें विरुद्धगुणन्यासनामक अलंकार होतो' (अलंकार-चंद्रिका). ४ हितकर अशीं परिमित अक्षरें ज्याच्या ठायीं अशा. ('वचना' या शब्दाचें विशेषण). ५ कानास अमृतासारख्या, कर्णमधुर. ६ 'जगच्चक्षु' असें सूर्यास म्हणतात, परंतु तूंच जगच्चक्षु सत्य, सूर्य नव्हे. कारण तूं भ्रमण करून सर्व विश्व पाहणारा आहेस. येथें 'व्यतिरेक' अलंकार आहे. ७ सूर्य हा भगवंताचा नेत्र आहे व ह्या सूर्यरूप नेत्रानें भगवंत सर्व स्थूलसूक्ष्म, स्थावरजंगम पदार्थांकडे पाहतो, अशी समजूत आहे. 'चन्द्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्यो अजायत' (म्हणजे, भगवंताच्या अंतःकरणापासून चंद्र झाला, व सूर्य हा त्याच्या डोळ्यांपासून झाला)–हें पुरुषसूक्तांतील वचन सर्वांच्या परिचयाचेंच आहे. ८ अत्यंत शोभायमान. रुचि=कांति, शोभा. 'रुचिः कान्त्यर्चिषोर्भासि स्त्रियां शोभास्पृहार्थयोः' इति वैजयन्ती. ९ सुंदरा. १० इंद्राची सभा. सभापर्व अध्याय ७ यांत इंद्रसभेचें वर्णन आहे. ११ अर्धसहवर्तमान शतक, दीडशें योजनें लांब अशी. योजन=चार कोस. १२ त्या सभेचा आश्रय करून असलेली. १३ जनसमूह. १४ सर्व दुःखांतून पार पडलेली, आधिव्याधिरहित. १५ मूर्तिमंत यज्ञ. १६ वायु आहे मित्र (सखा) ज्यांचा ते पावक (अग्नि). हे एकंदर सत्तावीस आहेत, म्हणून 'सर्व' असें म्हटलें आहे. त्यांचीं नावें:– अंगिरा, दक्षिण, गार्हपत्य, आहवनीय, निर्मंथ्य, वैद्युत, शूर, संवर्त, लौकिक, जाठर, विषग, क्रव्याद्, क्षेमवान्, वैष्णव, दस्युमान्, बलद, शांत, पुष्ट, विभावसु, ज्योतिष्मान्, भद्र, भरत, स्विष्टकृत, वसुमान्, ऋतु, सोम आणि पितृमान्. १७ अप्सरांचा समुदाय. १८ वृंद=समुदाय. १९ आलापाची जोड करी. २० उत्तम रसाला. २१ देवाप्रमाणें. २२ भाग्यशाली, पुण्यवान्. २३ तृप्ति होईपर्यंत. २४ तेथें (त्या सभेंत) आला (आलेला) जन (मनुष्य).

कोट्यब्द[1] तपश्चर्या करितां [2]तनु रात्रिदिवस भागावी, ।
क्षणमात्र ती पहावी असि सुखदा फार, किति सभा गावी ? ॥ २६
धर्मा ! [3]यमधर्मसभा [4]शतयोजनविस्तृता असी मोटी, ।
राजर्षिब्रह्मर्षि[5]प्रवरांच्या जींत नांदती कोटी; ॥ २७
जींत ययाति नहुष नळ शिबि जनक भरत [6]मदालसातनय ।
मुचकुंद दाशरथि नृग निमि शंतनु पांडु कुशिक वैन्य गय. ॥ २८
[7]वरुणसभा हि असी च [8]प्रन्हादप्रमुख [9]दितिदनुज राजे ।
तेथें वासुक्यादिक वसति अहि [10]ख्यात कुरुकुळवरा ! जे. ॥ २९
गंगा यमुना [11]विदिशा इत्यादि नद्या उपासिती वरुणा, ।
त्यांवरि वरुणसभेची वत्सांवरि [12]सुरभिची जसी करुणा. ॥ ३०
धर्मा ! जी [13]धनदसभा, ती ही [14]शतयोजनायता रम्या, ।
[15]शम्यानंदकरी [16]शिवपदपूता [17]तज्जनेतरागम्या. ॥ ३१
[18]शिवसखसभेंत निरुपम सुख; सुर मुनि सिद्ध [19]मूर्त नग वसती, ।
तेथें चि ते पहावे, जे जे [20]अन्यत्र संत न [21]गवसती. ॥ ३२
सुख-गीतनृत्य तेथें, मजला ही तो चि एक थारा हो ! ।
[22]स्मरला [23]स्मरहर, [24]भरला कंठ, न वदवे चि ते कथा, [25]राहो. ॥ ३३
जो हा भगवान् तेजोमंडलरूपी जगास [26]भासविता ।
कथिता झाला [27]पूर्वी [28]मद्गुरुची मज अगा ! सभा [29]सविता. ॥ ३४

---

१ कोटि वर्षें. २ देह. ३ यमाची सभा. हिचें वर्णन मूळ सभापर्वाच्या ८ व्या अध्यायांत आहे. ४ शंभर योजनें विस्तीर्णा. ५ प्रवर=श्रेष्ठ, अत्युत्तम. ६ अलर्क. ७ वरुणसभेचें वर्णन सभापर्वाच्या ९ व्या अध्यायांत आहे. ८ प्रन्हाद आहे मुख्य ज्यांमध्यें असे. ९ दितिज(दैत्य) व दनुज (दानव). १० प्रख्यात, नामांकित. अहि=सर्प. ११ विदिशा-माळव्यांतील एक नदी. १२ कामधेनूची. १३ कुबेर-सभा. सभापर्व अध्याय १० यांत हिचें वर्णन आहे. १४ शंभर योजनें लांब. १५ साधूंस आनंद करणारी. शमी=शांत, क्रोधरहित. १६ शिवपदानें पवित्र अशी. १७ तत्+जन+इतर+अगम्या=त्या कुबेराच्या लोकांवांचून इतरांना अगम्य, अप्रवेश्य (प्रवेश करण्यास कठीण अशी). १८ शिवाचा मित्र जो कुबेर त्याच्या सभेंत. १९ मूर्तिमंत पर्वत (हिमवान्, पारियात्र, विन्ध्य, कैलास इत्यादि पर्वत.) (अध्याय १० श्लोक ३१-३३). २० इतर ठिकाणीं. २१ सांपडती. २२ येथें ईश्वराचें आपल्या भक्त-जनांवरील प्रेम अत्युत्कर्षानें सुचविलें आहे, म्हणून हा **प्रेय** (प्रेयः) किंवा **भाव** अलंकार होय. जेथें प्रीति, भक्ति इत्यादि भावांचा उत्कर्ष वर्णिला असतो, तेथें हा अलंकार होतो. २३ शंकर (मदनाला हरण-भस्म-करणारा). २४ गळा दाटला, मी सद्गदित झालों. २५ हें पंतांच्या विस्तरभीरुत्वाचें दुसरें उदाहरण. (मागें गीति ११ पहा). २६ प्रकाशित करणारा. २७ कृतयुगांत. २८ माझ्या पित्याची (ब्रह्मदेवाची). २९ सूर्य.

तद्दर्शनकामुक[1] मी पुसता झालों उपाय तपनातें[2]; ।
वदला रवि कीं, 'तप कर, जप[3]-नातें किति? समर्थ तप-नातें.' ॥ ३५
केलें तप[4] तपनोदित[5] दशशतवर्षें[6] हिमाचळीं, मग मीं ।
झालों कृतकृत्य[7], तपीं बहु शक्ति, न पारिजातकीं[8] अगमीं. ॥ ३६
ब्रह्मसभा चि गुरु[9] सभा, तन्न्यूना[10] वर्णिल्या सुरसभा ज्या; ।
देव्युत्थ[11] शाकभाज्या[12] किंवा हे[13] शाक, या सुरस भाज्या? ॥ ३७
प्रभुमूर्ति सभा झाली पुरवाया काम दास-भावाचे[14], ।
याहुनि न वर्णवे बहु माझ्या ती कामदा[15] सभा वाचे. ॥ ३८
जें जें असे त्रिलोकीं जंगम[16] कीं स्थाणु[17] सर्व तें व्यक्त[18] ।
म्यां[19] पाहिलें, नृपा! हरिमूर्तीत जसें चि पाहतो भक्त. ॥ ३९

---

१ त्या ब्रह्मदेवाच्या सभेस पाहाण्यास उत्सुक. २ सूर्यातें. ३ ब्रह्मनामाचा जप हें नातें किती? तप हेंच नातें समर्थ, एवढ्याकरितां तप कर. ४ ब्रह्मव्रत. ५ सूर्यानें सांगितलेलें. ६ एक हजार वर्षें. ७ कृतार्थ. ८ पारिजातकनामक कल्पवृक्षाचे ठायीं. ९ मोठी. १० तीहून कमी. ११ शाकंभरी देवी (पार्वती) पासून झालेल्या. एकदां देवांनीं आदिमायेजवळ वैरिशमनार्थ वर मागितला. तेव्हां देवीनें देवशत्रुदमनार्थ वेळोवेळीं अवतार घेण्याचें कबूल करून, आपल्या निरनिराळ्या अवतारांचें वर्णनही केलें. या अवतारांपैकीं 'शाकंभरी' हा एक होय. ह्या अवतारांत देवीनें सर्व प्राणिमात्राच्या पोषणार्थ आपल्या शरीरापासून शाकभाज्या उत्पन्न करण्याचें वचन दिलें होतें. (सप्तशती, अध्याय ११ पाहा). ह्या देवीच्या कुळधर्माला साठ निरनिराळ्या भाज्या करण्याचा प्रघात आहे. १२ 'शाकभाज्या' ह्या शब्दांतील द्विरुक्ति बाजारहाट, लांकुडफाटें, लढाईभिडाई इत्यादि शब्दांच्या नमुन्याची आहे. १३ ब्रह्मसभा. देव्युत्थ शाकभाज्या सुरस किंवा हे शाक [व] या भाज्या [सुरस]?–असा अन्वय. सर्व भाज्या शाकंभरी देवीनें उत्पन्न केलेल्या असल्यामुळें त्या मनुष्यांनीं लाविलेल्या भाज्यांपेक्षां सुरस असणारच. त्याप्रमाणें ब्रह्मदेव हा सर्व सृष्टीचा निर्माणकर्ता असल्यामुळें त्याची सभा इतर सभांपेक्षां श्रेष्ठ असावयाचीच–असा इत्यर्थ. ह्या गीत्यर्धाचा पुढील-प्रमाणें अर्थ कोणी कोणी करितातः–किंवा (पंत पूर्वार्धांत सांगितलेली गोष्टच पुन्हा दृष्टांतरूपानें सांगतात) शाकभाज्या देव्युत्थ (सर्व शाकभाज्या देवीपासूनच उत्पन्न झाल्या आहेत) [परंतु] हे (ब्रह्मसभा) शाक (फळभाजीप्रमाणें, अर्थात श्रेष्ठ) [व] या (इतर सभा) सुरस भाज्या (पालेभाज्यांप्रमाणें, अर्थात कमी प्रतीच्या) [आहेत]. देशावर फळभाजीस 'शाक' व पालेभाजीस 'भाजी' असें म्हणण्याचा प्रघात आहे. पालेभाजीपेक्षां फळभाजी चांगली, हें उघडच आहे. १४ भक्ताच्या मनांतील हेतू. भाव=मनोवृत्ति, अंतरंग, मनोगत. येथें आदर्शप्रतींत 'दासबंधूचे' अशी टीप आहे, पण ती आम्हांस बरोबर वाटत नाहीं. कारण, 'दासाच्या भावाचे' असें ह्मणण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं. 'दासाचे' असें सरळ म्हटलें असतें तरी चालण्यासारखें होतें. शिवाय तो अर्थ घेतल्यानें संस्कृत (दास) व मराठी (भाऊ) शब्दांचा समास करावा लागतो. १५ इच्छित देणारी. १६ जाग्यावरून हालणारें. १७ स्थावर, न हालणारें. १८ स्पष्ट. १९ अध्याय ११ श्लोक ५३.

कथिल्या, विलोकिल्या ज्या, त्याचि सभा तूज पांच वीरा ! या; ।
येथें तुझी हि अधिका, जसि त्या चौघींत पांचवी राया !' ॥ ४०
धर्म म्हणे, 'गुरुराया ! पुरवीं माझी दुजी हि ही आळ[2], ।
त्वां यमधर्मसभेंत चि कथिले कीं प्रायशः[3] क्षमापाळ[4]. ॥ ४१
वरुणसभेंत दितिदनुज सरिदब्धिव्याल[5] वर्णिले लक्ष; ।
धनपति[6]सभेंत गुह्यक[7] राक्षस गंधर्व अप्सरा[8] त्र्यक्ष[9]. ॥ ४२
ब्रह्मसभेंत महर्षि श्रुतिशास्त्रें मूर्तदैवतें सर्व ।
शक्रादि लोकपालक कथिले, मुनि वालखिल्य[10] हरि[11] शर्व[12]. ॥ ४३
इंद्रसभेंत सकळ सुर गंधर्व वराप्सरा पर[13]-महर्षी. ।
त्यांत हरिश्चंद्र नृपति एक चि सुरनाथसा[14] परम[15]-हर्षी. ॥ ४४
पुण्य हरिश्चंद्राचें काय? प्रिय ज्यास्तव त्रिदश[16]पतिला, ।
हें सांगोनि, स्वामी ! या शिष्याच्या प्रमोद[17] द्या मतिला.' ॥ ४५
देवर्षि म्हणे, "नृप तो सम्राट्[18] प्रभु राजसूयमखकर्ता[19], ।
इतर करंद[20], परदमिता[21] एक हरिश्चंद्र सर्वभूभर्ता[22]. ॥ ४६
सत्कार हरिश्चंद्रीं पाहुनि तव तात पांडु वदला हें ।
कीं, 'सांग सुतासि मुने ! जेणें तैसें चि मी हि पद लाहें[23].' ॥ ४७
सुरपतिसभेंत भोगू सौख्य तव पिता, महासवें[24] साधो[25] ।
हें[26]; नांदसील तूं ही सपितृप्रपितामहासवें[27], साधो ! ॥ ४८

---

१ 'माझीहि ही दुजी आळ' असाही पाठ आहे. २ आवड. ३ बहुधा. ४ राजे. ५ नद्या, समुद्र आणि सर्प. ६ कुबेराच्या सभेंत. ७ कुबेराचा खजिनदार. ८ सभापर्व–अध्याय १२ श्लोक ४. ९ त्र्यंबक (महादेव). १० अंगुष्ठमात्रप्रमाण असा साठ हजार ऋषींचा समुदाय. हे ऋषी पार्वतीलावण्यानें मोहित झालेल्या ब्रह्मदेवाच्या वीर्यापासून उत्पन्न झाले–अशी कथा आहे, (पंतकृत आदिपर्व, अध्याय ४ गीति ११९–१३३ पहा). ११ विष्णु. १२ शंकर. १३ श्रेष्ठमुनि. १४ इंद्रासारखा. १५ मोठा आनंदी. १६ इंद्राला. १७ आनंद. १८ सार्वभौम. 'सम्राट्' शब्दाची व्याख्याः–'येनेष्टं राजसूयेन मंडलस्येश्वरश्च यः । शास्ति यश्चाज्ञया राज्ञः स सम्राडिति शब्द्यते ॥' म्हणजे–ज्यानें राजसूय यज्ञ केला, जो द्वादश राजमंडलांचा प्रभु व जो सर्व राजांस आपल्या आज्ञेंत ठेवितो, त्याला 'सम्राट्' म्हणावें. १९ राजसूययज्ञ करणारा. (राजानें अभिषेकद्वारा करावयाचा जो यज्ञ तो, अथवा राजा म्हणजे लतात्मक सोम, त्याचें सवन म्ह० कंडन करतात ज्यांत तो यज्ञ). २० करभार देणारे. २१ शत्रूंचें दमन करणारा. २२ सर्व पृथ्वीचा पति. २३ मिळवीन, प्राप्त करून घेईन. २४ महायज्ञानें. २५ संपादन करो. २६ हरिश्चंद्रासारखें पद प्राप्त होणें, इंद्राला प्रिय असणें हें. २७ बाप, आजा, पणजा यांसह वर्तमान.

हा राजसूयमहिमा, परि याची सिद्धि दुर्घट स्पष्ट, ।
बहु[1]विघ्न क्षत्र[2]क्षय, कर्ता बहु मग हि पावतो कष्ट." ॥ ४९
सांगोनि असें गेला[3] मुनि[4], कृष्ण[5] पहावयासि तेथूनी; ।
कीं सुज्ञ हि न असे जे, घेती भरवुनि निजास्य[6] ते थूनीं[7]. ॥ ५०
धर्म म्हणे, 'कष्ट घडो, हो जें होणें असेल, परि तात ।
व्हावा पूर्ण[8]मनोरथ, सत्पुत्र गुरूक्त[9] सर्व करितात.'[10] ॥ ५१
पुसतां ऋत्विग्[11], बंधु, व्यास, सचिव, आप्त म्हणति, 'देवा[12]! हूं. ।
ईश[13] गुरूक्त[14]करांस व्यसननदीं[15] सर्वथा न दे वाहूं.' ॥ ५२
धर्म म्हणे, 'सिद्धि भजे यन्मंत्रा[16], जेंवि वासवा[17] रंभा[18], ।
त्या स्वसख्या[19] प्रथम पुसों मंत्र, मग करूं शिवीं[20] सवारंभा[21].' ॥ ५३
करुनि विचार असा, पटु[22] दूत द्रुत[23] धाडिला मुरारिकडे[24], ।
ज्याच्या चरणस्मरणें अत्यघटित[25] सर्वकार्यसिद्धि घडे. ॥ ५४
तो इंद्रसेन[26]नामा दूत नव्हे, शुद्ध[27] भाव रायाचा[28], ।

---

१ ज्यांत पुष्कळ विघ्नें आहेत असा. २ क्षत्रियांचा नाश होतो असा (राजसूय यज्ञ). ३ दाशार्हनगरीप्रत गेला. (दाशार्हांची–कृष्णाची–नगरी द्वारका). ४ नारद. ५ नारदासमान भक्त–पंत. कीं (कारण) जे सुज्ञहि (सकलज्ञ असूनहि) असे (नारदासारखे) [विवेकी] न (नसतात) ते निजास्य (आपलें तोंड) थूनीं (थुंकीनें) भरवुनि घेती (लोकांत आपली छीथू करून घेतात)–असा अन्वयार्थ. आपल्याला जरी सर्व गोष्टी माहीत असल्या, तरी त्यांपैकीं किती, कोठें व कशा रीतीनें बोलावयाच्या, याचें नारदाप्रमाणें धोरण सांभाळलें पाहिजे. नाहीं तर आपल्या अविचारामुळें अकालीं भलती गोष्ट आपण बोललों, तर लोक आपल्या तोंडावर थुंकल्याखेरीज राहणार नाहींत–हा भावार्थ. सारांश–रायसूययज्ञ करण्याविषयीं सूचना त्या कालाला सर्वस्वी योग्य अशा धर्मराजाला करण्यांत नारदांनीं आपला शहाणपणाच दाखविला. अशक्य कार्य हातांत घेण्याविषयीं नारदांनीं आणखी कोणास सांगितलें असतें, तर त्यांची त्यांनीं छीथू केली असती. ६ आपलें मुख. ७ थुंकीनें. ८ ज्याचे हेतु सफळ झाले असा. ९ गुरूनें (बापानें) सांगितलेलें. येथें 'काव्यलिंग' नामक अलंकार आहे. १० हा चरण सुभाषितरूप आहे. ११ कुलगुरु, कुलाचार्य. १२ हे धर्मराजा. १३ विचारसादृश्य:–पितुर्हि वचनं कुर्वन्न कश्चिन्नाम हीयते । (वाल्मीकिरामायण–अयोध्याकांड, सर्ग २१।३७) अर्थ:–पितृवाक्याचें पालन करणारा कोणीही हानि पावत नाहीं. १४ गुरूचे (वडिल) माणसांचे सांगण्याप्रमाणें करणाऱ्यांस. १५ व्यसनरूप नदांत. गुरूच्या सांगण्याप्रमाणें आचरण करणारा संकटांत पडत नाहीं, त्याचें कार्य ईशकृपेनें निर्विघ्नपणें पार पडतें–असा भावार्थ. हें अर्ध सुभाषितरूप आहे. येथें आदर्शप्रतींत 'ईशगुरूक्तकरांस व्यसननदी' असा पाठ होता, व ईशगुरूक्तकरांस=समर्थ जो गुरु त्याचें भाषण करणाऱ्यांस–अशी टीपही होती. पण आम्हीं स्वीकारलेला पाठ सरस दिसतो. १६ ज्याच्या मसलतीस. १७ इंद्राला. १८ अप्सरोविशेष. १९ आपल्या मित्रास, कृष्णास. २० मंगलप्रद. २१ यज्ञारंभा. (सव=यज्ञ). २२ कुशल. २३ सत्वर. २४ कृष्णाकडे. २५ घडण्यास अत्यंत कठीण अशी. २६ त्या धर्माचा सारथी. येथें 'अपन्हुति' अलंकार आहे. २७ निर्मल प्रेमभाव. 'साच भाव रायाचा' असाही पाठ आहे. २८ धर्माचा.

कीं [१]तद्भक्तिवधूचा हार [२]श्रीवल्लभा [३]वरायाचा. ॥ ५५
[४]मधुपास जसा [५]पद्माप्रति आणी, बळ करूं न दे [६]वास, ।
घेउनि आला धर्माप्रति अत्युत्सुक करून [७]देवास. ॥ ५६
त्या [८]संकल्पबिभीषणरामातें [९]सन्मनोभिरामातें ।
धर्म कथी [१०]पितृवाचिकजनितोत्कटराजसूयकामातें. ॥ ५७
कृष्ण म्हणे, '[११]कुरुराया! धन्य म्हणतसे [१२]सदेव शक्र तुला, ।
तूं न करिसील बापा! स्वगुणांहीं कोणत्या [१३]वश [१४]क्रतुला? ॥ ५८
परि एक जरासंध प्रबळ क्षितिपाळ काळ आजि तसा, ।
तो चि पळालों [१५]त्रासें, ज्या आम्हां बहु तुम्ही [१६]संभाजितसा. ॥ ५९
करिति जतन वतन, [१७]पतनें मत न भल्याला, तथापि तें वरिती; ।
त्यजिली स्वराजधानी मथुरा [१८]अमरावती च भूवरि ती. ॥ ६०
[१९]हर आर्जवूनि तेणें राजे [२०]षडशीति कोंडिले असती, ।
हरणार [२१]असु हरुनि [२२]वसु [२३]तदसिलता, न [२४]गणिका तसी [२५]अ-सती.॥ ६१
[२६]मूर्धाभिषिक्त राजे पशुसे षडशीति बद्ध आहेत, ।
[२७]पशुपतिपुढें वधावे शत, ऐसा त्या [२८]कुबुद्धिचा हेत. ॥ ६२
त्यां [२९]राजांलो मुक्त न करितां, त्या न वधितां जरासंधा, ।
साम्राज्य राजसूयें कैंचें? इतरां [३०]सुदुस्तरा संधा.' ॥ ६३

---

१ त्या धर्मांची कृष्णाविषयीं जी भक्ति हीच वधू तिचा. हा रूपकालंकार आहे. २ लक्ष्मीनाथास. ३ वरण्याचे हेतूनें पाठविलेला. ४ भ्रमराला. ५ कमळाकडे. ६ सुगंध. (वास) भ्रमराचें बळ चालूं न देतां (त्याच्या इच्छेनुरूप वाटेल तिकडे त्यास जाऊं न देतां) त्यास कमळाकडे आणितो, त्याप्रमाणें. ७ कृष्णाला. ८ संकल्पस्वरूप बिभीषणाच्या रामास. येथें रूपकालंकार आहे. ९ सज्जनांच्या मनाला आनंद देणाऱ्यातें. १० पितृ+वाचिक+जनित+उत्कट+राजसूय+कामातें=पित्याच्या निरोपानें उत्पन्न झालेली प्रबळ अशी राजसूययज्ञाची इच्छा तीतें. ११ धर्मराजा. १२ देवांसह. 'सदैव' असाही पाठ आहे. १३ स्वाधीन. १४ यज्ञाला. १५ भयामुळें. तोच्चि=तोच, मी(कृष्ण). 'त्याच्चि पळालों त्रासें' असाही पाठ आहे. १६ पूजित आहां. (सभाजन=पूजन). १७ पतन भल्याला मत (मान्य) नाहीं; पण तें (पतन सुद्धां) वरून वतन रक्षितात. १८ इंद्राची राजधानी. मथुरा ही भूमीवरील अमरावतीच होय-असा भाव. १९ शंकराची आराधना करून. २० शायशीं. २१ प्राण. २२ धन. २३ त्या जरासंधाची असिलता (तरवार). लता अथवा वल्ली हें पद भ्रू, विद्युत, भुज, खड्ग, चाप या शब्दांशीं अथवा अशा अर्थांच्या शब्दांशीं अन्वित होऊन त्याचा अर्थ सौंदर्य, सौकुमार्य, सूक्ष्मता, तनुता असा होतो. जसें-भुजलता, भुजवल्ली, चापलता, धनुष्यवल्ली, विद्युल्लता, भ्रूलता इत्यादि. २४ वेश्या. २५ जारिणी. गणिका फक्त द्रव्यच हरण करिते परंतु जरासंध त्या राजांचे प्राण व त्यांचें धन हीं दोन्ही हरण करणार-हा भावार्थ. येथें व्यतिरेकनामक अलंकार आहे. जेथें उपमान आणि उपमेय यांतून एकाचें आधिक्य किंवा न्यूनत्व वर्णिलें असतें, तेथें हा अलंकार होतो. २६ पट्टाभिषिक्त, ज्यांच्या मस्तकावर राज्यपदारोहणसमयीं अभिषेक झाला आहे असे. २७ शंकरापुढें. २८ दुष्ट जरासंधाचा. २९ 'त्वां राजांला' असें पाठांतर. ३० पार पाडण्यास फार कठिण अशी प्रतिज्ञा.

धर्म म्हणे, 'अघटित तूं म्हणसि, तरि घडेल काय अन्यास? ।
तरि राजसूय राहो, आज्ञा दे ध्यावयास संन्यास.' ॥ ६४
भीम म्हणे, 'देवा! कां माझ्या अवमानितोसि बाहूंतें? ।
वर्णिसि मन मानेसें, चाल जरासंधतेजें[1] पाहूं तें. ॥ ६५
अथवा, हे किति त्याला? जो तूं निजबाहुचा अनादरिता, ।
[2]यच्छ्रितधनुचा न हरुनि रिपुयश फिरला कधीं न नाद रिता.' ॥ ६६
कृष्ण म्हणे, 'गा! भीमा! मतिबैळ[3] बळ हेंचि मान्य सु-कवीतें, ।
भुजबळ[4] तें एखादे समयीं तत्काळ ओंठ सुकवीतें[5].' ॥ ६७
जिष्णु म्हणे, 'परि एक चि हें आम्हां त्वत्पदानुगीं[6] ठावें[7] ।
सर्वत्र तूं यशस्वी, त्वद्दासें यश सुखें चि गींठावें[8]. ॥ ६८
दुर्घट[9] अरिपरिभव-सव अजित[10] यशस्वींद्र[11] तूं परि सहाय, ।
म्हणवील काय लोहांकरवीं[12] हि कधींतरी परिस 'हाय'[13]? ॥ ६९
देशिल यश मद्धनुतें[14], अभिमानी तूं, वृकोदरगदेतें; ।
अयशें सिंहासनग[15] न वपु[16], हर्ष यशें वृकोदरग[17] दे तें[18].' ॥ ७०

---

१ तेज=पराक्रम. २ अन्वयार्थः–अथवा, यच्छ्रितधनुचा(ज्या तुझ्या आश्रितांच्या–अर्जुनादि दासांच्या धनुष्याचा) नाद रिपुयश न हरुनि रिता कधीं न फिरला (नेहमीं रिपुयश हरून यशस्वी होत्साताच फिरला)[परंतु असें असूनही] जो तूं निजबाहुचा अनादरिता (आपल्या स्वतःच्या बाहूंनाही या जरासंधापुढें कमजोर समजतोस, तुझ्या केवळ दासांच्या धनुष्टंकारांत इतकें बळ असतां, जो तूं स्वतःच्या बाहूंचें बळ कमी लेखितोस), त्याला (त्या तुला) हे (माझे–भीमाचे–बाहु) किती?–त्याच्यापुढें भीमाच्या बाहूंचें महत्व किती? तूं स्वतः अनंतप्रभावशाली असूनही जर स्वतःस दुर्बल समजतोस, तर मग तूं मला दुर्बळ मानिलेंस यांत आश्चर्य कसलें? सारांश ज्याला स्वतांच्या बाहुबळाचा भरंवसा वाटत नाहीं, त्याला दुसऱ्याच्या पराक्रमाचें महत्व न वाटलें तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. ३ बुद्धिबळ. 'बुद्धिर्यस्य बलं तस्य' ह्या उक्तीचें हें सुरेख रूपांतर आहे. इंग्रजींतही 'Pen is mightier than sword' अशी ह्मण आहे. (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय २।५२ पहा). ४ बाहुबळ, शारीरसामर्थ्य. ५ शुष्क करितें. ६ तुझ्या सेवकांस. ७ 'हें आम्हां त्वदनुगांसि गा ठावें' असाही पाठ आहे. ८ मिळवावें. ९ 'दुर्घट अरिपरिभव अजि' असाही पाठ आहे. १० अजिंक्य (न जिंकलेला असा). 'अजित' व 'यशस्वींद्र' हीं विशेषणें पंतांनीं फारच खुबीनें व साभिप्राय योजिलीं आहेत, म्हणून येथें **'परिकर'** नामक अलंकार समजावा. ह्या विशेषणांच्या योगानें श्रीकृष्णसाहाय्यामुळें राजसूययज्ञ सिद्धीस जाणार, असें पंतांनीं ध्वनित केलें आहे. ११ यशस्वी जनांत श्रेष्ठ. १२ लोखंडाकडून. १३ **'हाय! हाय!'** असें. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १४ माझ्या धनुष्याला. १५ सिंहासनस्थ. १६ शरीर. सिंहासनग वपु अयशें हर्ष न देतें, पण वृकोदरग(वपु) यशें(हर्ष देतें)–असा अन्वय. १७ लांडग्याच्या उदरांत गेलेलें (वपु). १८ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ह्या गीतींत **'दृष्टान्त'** नामक अलंकार आहे.

धर्म पुसे, प्रभु सांगे, [1]मगधवरोत्पत्ति ती असी परिसा:—।
“होता बृहद्रथनृपति सद्गुणसंपन्न, विक्रमी [2]हरिसा. ॥ ७१
[3]अनपत्यत्वसुदु:खित तो वरदा चंडकौशिका ऋषितें ।
सुखवी करूनि सेवा [5]चित्तें [4]सुतदर्शनामृतीं तृषितें. ॥ ७२
‘माग वर’ असें म्हणतां, [6]सुतवर मागे नृपाळ तो नमुनी; ।
[7]आम्रतरुतळीं होता ध्यानस्थ क्षण [8]तपोनिधान मुनी. ॥ ७३
तों [9]अंकीं आम्राचें एक सरस फळ गळोनि उतरे, तें ।
देउनि म्हणे मुनि, ‘असो [10]येणें, जरि तुज न होय सुत रेतें. ॥ ७४
पावेल पुत्ररूपें हें फळ [11]परिणाम, दे [12]स्वजायेतें. ।
जा, निश्चयें नराकृति होउन, सुख यश गृहीं तुज्या [13]येतें.’ ॥ ७५
बुडतां जें चिंतेच्या झालें अद्भुत [14]अलाबु ओघीं तें. ।
देता झाला राजा स्वकरें समभाग करुनि [15]दोघींतें. ॥ ७६
[16]अंतर्वत्नी पत्नी झाल्या, व्याल्या सुपुत्र[17]फळशकलें ।
त्यजिलीं हि दूर, परि [18]मुनिवच भंगाया न दैवबळ शकलें. ॥ ७७
रात्रौ शकलें त्यजिलीं [19]अश्रुंसह [20]चतुष्पथांत दायांनीं; ।
तों राक्षसी जरा ये, काय करावें [21]नृपा! तदा [22]यांनीं? ॥ ७८
न्यावीं, खावीं, व्हावीं [23]सुवहें शकलें म्हणोनि ती जोडी. ।
तों तीं जडलीं, धर्मा! मुनिवचनीं शक्ति काय हे थोडी? ॥ ७९
आला न सत्प्रसादीं कोणाला ही कधीं हि तोटा हो! ।
झाला कुमार अद्भुतरूप, [24]करी तत्क्षणींच तो टाहो. ॥ ८०

१ जरासंधाची जन्मकथा. २ इंद्रासारखा. ३ अपुत्रत्वानें फार दु:ख पावलेला. येथें ‘सु’चा अर्थ ‘अतिशय’ असा समजावा. ‘सु’चा अर्थ ‘चांगला’ असा जरी आहे, तरी त्याचा उपयोग बऱ्यावाईट गोष्टींचा अतिरेक दाखविण्याकरितांही करितात. ४ पुत्रदर्शनरूप अमृताविषयीं. ५ उत्कंठित मनानें. ६ ‘पुत्र होवो’ असा वर; किंवा पुत्रश्रेष्ठ, उत्तम पुत्र. ७ आम्रवृक्षाखालीं. ‘अमृततरुतळीं होता’ असाही पाठ आहे. ८ तपोराशि. ९ मांडीवर, उत्संगावर (जवळ). १० या फळानें. ११ रूपांतर, आकारांत फेर. १२ आपल्या पत्नीला. १३ येणारच, आलेंच म्हणून समज. १४ भोंपळा. १५ या दोघी बायका काशीराजाच्या जुळ्या कन्या होत्या. १६ गर्भवती. १७ उत्तम पुत्ररूप फळाचे तुकडे. १८ मुनिवचन खोटें करण्यास. १९ येथें ‘सहोक्ति’नामक अलंकार आहे. जेथें चमत्कार वाटण्याजोगा सहभाव वर्णिलेला असतो, तेथें सहोक्त्यलंकार होतो. हा अलंकार ‘सह’ अथवा त्या अर्थाचा दुसरा शब्द योजिल्यानें होतो. ‘रात्रीं शकलें त्यजिलीं’ असें पाठांतर. २० चवाठ्यावर. २१ धर्मराजा! २२ दायांनीं. २३ नेण्यास सोपीं. २४ आक्रोश करी, रडे.

[1]बर्हिवनीं [2]घनरवसा गेला अंतःपुरांत तो टाहो ।
होय सुकाळ सुखांचा, पडला होता [3]मुहूर्त तोटा हो! ॥ ८१

मागोनि घे सुतातें नृप पसरुनि राक्षसीपुढें पदर, ।
विप्रप्रसाद निर्भय, नाहीं तरि गज हि [4]तन्मुखीं [5]बदर. ॥ ८२

नाम '[6]जरासंध' असें याकरितां, उपजला असा राया ! ।
कथिल्या [7]तद्वीर्यकथा म्यां साच, नव्हेत गा ! [8]अ-सारा या. ॥ ८३

बहु काय वदों ? [9]कन्यापतिकंसविनाश ऐकतां मागें ।
फेरे [10]एकोनशत स्वभुजबळें निजगदेसि दे रागें. ॥ ८४

[11]एकोन योजनें [11]शत टाकी [12]मधुरापुरींत, [13]अशनीची ।
[14]शक्ति किति ? दृष्टिहि तसी बहुधा उग्रा असेल न शनीची.[15] ॥ ८५

परि भीमार्जुन मज दे, जातों, येतों करोनि कार्यातें, ।
परमोदार वृकोदरभुज यश देतील शीघ्र आर्यातें." ॥ ८६

"[16]कुंत्याशी धर्माज्ञा घेउनि वेषें च [17]विप्रतां राया ! ।
सत्वर तिघे निघाले [18]मगधपतिस ते कवि [19]प्रताराया. ॥ ८७

[20]गोष्ठीं [21]हरिसे, नगरीं शिरले मारावया मगधराजा ।
प्रथम 'असो [22]पत्यंतर,' '[23]हननाश नसो' म्हणे मग [24]धरा ज्या. ॥ ८८

---

१ मोराच्या वसतिस्थानांत. २ मेघशब्दसा. ३ थोडा वेळ. ४ त्या जरेच्या मुखीं. ५ बोर. ६ जरा-नामक राक्षसीनें दोन शकलें सांधिलीं म्हणून 'जरासंध' असें नांव पडलें. (सभापर्व–अ० १८ श्लोक ११). ७ त्या जरासंधाच्या पराक्रमाच्या गोष्टी. (मागें गीति ५८–६२ पहा). ८ सारहीन, निःसत्व, खोट्या. ९ जरासंधजामात कंस याचा विनाश. (जरासंधाच्या दोन कन्या अस्ति व प्राप्ति ह्या कंसाला दिल्या होत्या). १० नव्याण्णव. ११ एकोन (एक उणा) शत (शंभर)=नव्याण्णव. १२ मथुरेंत जेथें गदा पडली त्या स्थलास 'गदावसान' असें नांव आहे. (अ० २० श्लो० २५.) हल्लीं वसत असलेल्या मथुरा नामक शहराच्या ठिकाणीं पूर्वीं अरण्य होतें. तेथें मधु नांवाच्या राक्षसानें नगर वसवून त्याला मधुरा हें नांव दिलें. पुढें मधु मेल्यावर त्याचा पुत्र लवणासुर राज्य करीत असतां, त्याला मारून शत्रुघ्न राज्य करूं लागला. शत्रुघ्नाला 'तुझी सेना शूर होईल' असा देवांचा वर असल्यामुळें त्या देशाला शूर-सेन असें नांव पडलें व मधुपुरी ही राजधानी झाली. मधुपुरीचेंच पुढें मधुरा होऊन, हल्लीं तिला मथुरा असें म्हणतात. १३ वज्राची. १४ जरासंधाच्या गदेपुढें वज्राची शक्ति किती वर्णावी? जरासंधाच्या गदेची शक्ति अवर्णनीय होती–हा इत्यर्थ. १५ शनीच्या उग्र दृष्टीचा उल्लेख पंतकृत द्रोणपर्वांत (अध्याय १६ गीति ३६) व कर्णपर्वांत (अध्याय ४७ गीति ७७) आढळतो. १६ कुंतीचे आशीर्वाद. १७ ब्राह्मणपणा. १८ जरासंधास. १९ ठकवाया. २० गोष्ठ्यांत. २१ सिंहासारखे. २२ दुसरा पति (राजा). पृथ्वी त्या कृष्णार्जुनांस प्रथम म्हणाली कीं, जरासंध मरून मला दुसरा पति प्राप्त होवो. नंतर ती म्हणाली कीं, तो दुसरा पति हननाश (घात करण्याची ज्यास इच्छा आहे असा, दुष्ट) नसावा–असा भावार्थ. २३ वध करण्याची इच्छा ज्याला असा. २४ पृथ्वी.

चढले [1]गिरिव्रजाच्या [2]प्राकाराधारगिरिशिरीं हरिसे. ।
[3]ज्यांसि [4]सकृत् ताडुनियां ध्वनिलो जन [5]एकमासवरि परिसे, ॥ ८९
[6]वृषरूप दैत्य मारुनि, तच्चमें [7]साधु मढविले होते. ।
[8]अद्भुत तीन असे जे दुंदुभि, ताडोनि फोडिले हो ! ते. ॥ ९०
भंगिति भुजप्रहारें [9]शृंगातें, म्हणति जन '[10]मनूरा' ज्या; ।
शिरले पुरीं [11]अमार्गें माराया [12]आम्रफळजनू राजा. ॥ ९१
[13]राजगृहांत हि शिरले, पाहुनि मगधेंद्र ही म्हणे, 'यावें.' ।
मानुनि वेषें [14]स्नातक [15]भूसुर पूजावया उठे भावें. ॥ ९२
कृष्ण म्हणे, 'राया ! हे दोघे मौनव्रती [16]अदीन मुनी ।
वदतिल, सारुनि नियम, [17]प्रहरद्वय रात्रिचें [18]अतिक्रमुनी.' ॥ ९३
[19]स्थापुनि [19]अग्निगृहीं, मग त्या काळीं तो हुताग्नि [20]वर्चाया ।
काळांसि विप्र मानुनि, [21]आला, झाला हि सिद्ध [22]अर्चाया. ॥ ९४
'कुशलं [23]स्वस्त्यस्तु' असें वदले ते[24] प्रथम, बसविले भूपें, ।
पुसिलें कीं, 'वेषें तों विप्र तुम्ही, अन्य भासतां [25]रूपें. ॥ ९५

१ स्थलविशेष. फल्गूच्या पूर्वेस एक कोसावर जक्तिबन (यष्टिवन) नांवाचें अरण्य आहे. त्याच्या नैर्ऋत्येस दोन मैलांवर कुशागारपूर नांवाचें जुनें शहर होतें. हेंच गांव फार प्राचीनकाळीं गिरिव्रज नांवानें मोडत असून, तें मगधदेशाचा राजा जरासंध याच्या राजधानीचें शहर होतें. ज्या जाग्यावर प्राचीन कुशागारपूर किंवा गिरिव्रज होतें, त्या जाग्याभोंवतालीं पर्वतांचें वर्तुळ खरोखरच आहे, व गिरिव्रज याचा अर्थ-पर्वतांचा समुदाय-असा असल्यामुळें, या पर्वतांच्या कड्यामुळेंच या शहराला गिरिव्रज हें नांव पडलें असावें. (भरतस्थलादर्श). २ तटबंदीसारखे जे सभोंवतींचे डोंगर त्यांचे शिखरावर. प्राकार=तट, कोट, कुंपण. ३ ज्या नौबतींस. ४ एकवार. ५ ज्यांचा ध्वनि (नाद) एक मासपर्यंत राहत असे. ६ बैलाचें रूप ज्यानें घेतलें आहे असा. ७ चांगले. ८ भेरी, नौबती. 'दुंदुभि' हें नाम संस्कृतांत पुल्लिंगी आहे. ९ शृंगासारखा उंच असा इमारतीवरील स्तंभ. १० मनोरा. (ज्या शृंगातें जन 'मनोरा' म्हणती त्यास). गोपुर-पंत. ११ आडरस्त्यानें. १२ आम्रफलापासून (जनु) जन्म ज्याचें त्या जरासंधाला. (मागें गीति ७४-७५ पहा). १३ 'राजगृहीं ते शिरले' असाही पाठ आहे. १४ सोडमुंज झालेले ब्रह्मचारी. १५ भूदेव, ब्राह्मण. १६ अत्यंत दीन, अनुकंपार्ह. 'अ' हा उपसर्ग निषेध, अभाव व आधिक्य दर्शवितो. येथें ह्या उपसर्गाचे योगानें आधिक्याचा बोध होतो. जसें-अघोर कर्म, अचपळ मूल इत्यादि. १७ मध्यरात्रीचा समय. १८ घालवून, संपल्यावर. १९ यज्ञागारीं. होमशाळेंत त्या विप्रांस ठेऊन जरासंध स्वगृहीं आला. २० तेजवान् करावयास, प्रज्वलित करावयास. वर्च म्हणजे तेज. २१ राजगृहास आला. २२ (त्या विप्रांची) पूजा करण्यास. २३ कल्याण असो. दुसरा अर्थः-(हे राजा) अत्यंत (सु) अविनाशी (अस्ति) असें जें (मोक्षपद) तें तुला निर्विघ्नपणें (कुशलं) असो (अस्तु). भगवान श्रीकृष्णाच्या सान्निध्यांत मरणाराला मोक्षपदप्राप्ति अवश्य होते; ह्या समजुतीस अनुसरून हें वर्णन आहे. २४ विप्रवेषी पांडव. २५ रूप=आकृति, आकार, स्वरूप. ह्या तिघांच्या दंडांवर ज्येच्या (धनुष्याच्या दोरीच्या) खुणा होत्या, त्या पाहतांच हे ब्राह्मण नसावेत, असें जरासंधानें ताडिलें.

आलां पुरीं अमार्गें[1] कां ? केला श्रृंगेदुंदुभिध्वंस[2] ? ।
ब्राह्मण तों मन्नगरीं[3] न क्षोभे, जेंवि मानसीं[4] हंस. ॥ ९६
पूजन हि घेत नाहीं कां ? हो ! या भूमिदेवदासाचें[5] ।
कोण तुम्ही ? क्षत्रिय कीं ब्राह्मण ? राजापुढें वदा साचें.' ॥ ९७
शौरि[6] म्हणे, 'रिपुसदनीं अद्वारें[7] शिरति बुध[8], अगा ! राया ! ।
द्वारें चि सुहृत्सदनीं[9], आलों तैसे[10] चि कीं अंगारा[11] या. ॥ ९८
घेऊं नये चि अरिकृतपूजा[12], व्रत आमुचें[13] असें आहे.' ।
ऐसें श्रवण करुनि, नृप, वैर कसें काय, हें मनीं पाहे. ॥ ९९
हासोनि नृप, म्हणे, 'हो ! विप्रांचा शत्रु मी नव्हें व्यक्त[14]. ।
सक्त[15] ब्राह्मणभजनीं[16] आहें, त्यांचा चि सत्य हा भक्त.' ॥ १००
कृष्ण म्हणे, 'अस्मद्रिपु[17] ते मोडिति सेतुलों[18] नरवरा[19] ! जे; ।
कां कोंडिले[20] पशु-तसे ? बहु रडति करोनि दीनें[21] रवें राजे. ॥ १०१
यज्ञ[22] करावा मारुनि पशुसे नृप, काय हें बरें कर्म ? ।
येणें प्रसन्न शंकर ? रे राजा ! हा अधर्म कीं धर्म ? ॥ १०२
ऐसें कोणीं हि कधीं केलें नाहीं च कर्म हें मागें, ।
तूं काय ? भस्म येणें देवांसह होइजेल हेमागें[23]. ॥ १०३

---

१ आडमार्गानें. २ मनोरा व दुंदुभि यांचा नाश. ३ माझ्या नगरांत. ४ मानससरोवरीं. ५ विप्रांच्या (भूमिदेवांच्या) सेवकाचें (=माझें). ६ कृष्ण. (सभापर्व–अ० २१ श्लो० ४९). ७ द्वाराशिवाय अयोग्य अशा इतर मार्गानें. (यावरून वैरभाव दर्शविला). ८ चतुर पुरुष, ज्ञाते. (सभापर्व–अ० २१ श्लो० ५३-५४). ९ मित्राच्या घरीं. १० त्या नियमानुसार, शत्रू म्हणून. 'मार्गें जाइजे मित्रसदना । अमार्गें येइजे शत्रुस्थाना । नीतिधर्में नरमंडना ! । वर्तणूक आमुची. ॥' (मुक्तेश्वरकृत सभापर्व, अध्याय ६।१२६). ११ घरास. हें पंतांच्या ठरींव यमकांपैकीं एक आहे. (आदिपर्व, अध्याय ३८।२९; सभापर्व, अध्याय ४।१२). १२ शत्रूनें केलेली पूजा (सत्कार). १३ जे कार्यवंत (आमच्यासारखे) असतात त्यांचें व्रत (नियम) असें कीं, शत्रूनें केलेल्या सत्काराचा स्वीकार करूं नये. १४ स्पष्ट, खरोखर. १५ तत्पर. १६ विप्रांच्या सेवेंत. १७ आमचे वैरी. १८ धर्मसेतूंला, धर्मांच्या नियमांना. १९ हे राजा. २० कारागृहांत ठेविले. २१ (दुःखानें व्याकुळ झाल्यामुळें) दीनवाणा शब्द. २२ रुद्रयज्ञ. २३ सुवर्णाचलानें, मेरुपर्वतानें सुद्धां. मेरुपर्वत व देव देखील भस्म होतील, मग तुझी कथा काय ?–असें वर्णन असल्यामुळें येथें '**काव्यार्थापत्ति**'—नामक अलंकार झाला आहे. जेथें कैमुतिकन्यायानें अर्थसिद्धि होते, तेथें हा अलंकार होतो. ह्यास '**अर्थापत्ति**' असेंही म्हणतात. [कैमुतिकन्यायाचा अर्थ–काय कथा ! कशाला सांगावें ! काय नवल !–असा होतो.] तसेंच येथें देव व मेरुपर्वत हे देखील भस्म होतील असें वस्तुस्थितीपेक्षां फारच अधिक वर्णन केलेलें असल्यामुळें '**अतिशयोक्ति**' नामक अलंकारही आहे.

जरि हा स्वधर्म ऐसें [1]त्वन्मत, तरि हें बरें चि, राया ! हो[2] ।
आम्हां [3]भवदाज्ञा कीं, यज्ञ करा, मज करें चिरा, या हो !' ॥ १०४
तूं क्षत्रिय, आम्हीं ही शंभुप्रीत्यर्थ या [4]नव-क्रतुला ।
कां न करूं तुज मारुनि ? सरळ वचन हें गमो न [5]वक्र तुला. ॥ १०५
तोडावे बंध सकळ, सोडावे भूप, हात जोडावे, ।
[6]राजानें रक्षावे कीं दाटुनि धर्मसेतु मोडावे ? ॥ १०६
मी **शौरि** हा **ध**नंजय, हा हि [7]तिजा नीट ओळख [8]गदीन. ।
या [9]बळिखगप्रभुपुढें सर्व बळी अन्य टोळ खग दीन. ॥ १०७
सोडावे नृप, अथवा [10]रथवाहगजादिराज्यसुखभोग; ।
हो सिद्ध शीघ्र, [11]समरासम राया ! तुज न अन्य [12]हितें योग.' ॥ १०८
**मागध म्हणे**, '[13]मखार्थ [14]प्रोक्षितें नृपपशु भयें न सोडीन, ।
कर ईश्वरासि किंवा [15]तद्रूपब्राह्मणासि जोडीन.' ॥ १०९
ऐसें वदोनि [16]सनयीं [17]तनयीं राज्याभिषेक तो करवी; ।
त्यासि म्हणे, 'हर्षद हो सुहृदां, कमळांसि जेंवि [18]तोर्क-रवी.' ॥ ११०
विस्तर असो. तयासीं **भी**मासीं बाहुयुद्ध आरंभे; ।
'[19]पूर्वागत' म्हणति किती, 'हा उर्वशि ! हा घृताचि ! हा रंभे !' ॥ १११

---

१ तुझें मत. २ होवो. ३ तुझी आज्ञा. ४ नूतन यज्ञाला. ५ वांकडें. ६ हें गीत्यर्ध सुभाषितरूप समजावें. 'रायानें' असा पाठभेद आहे. ७ तिसरा. ८ भीमसेन. (गदिन (गदेनें युद्ध करणारा)+इन (स्वामी, श्रेष्ठ)=गदायुद्धांत जे प्रवीण वीर, त्यांमध्यें श्रेष्ठ). ९ बळवान् गरुडापुढें. या बळिखगप्रभुपुढें (बळवान् गरुडापुढें) सर्व अन्य (गरुडेतर) खग (पक्षी) बळी (बळवान् असले तरी) दीन टोळ (टोळांप्रमाणें क्षुद्र) [आहेत]—असा अन्वय. भीम हा गरुडासारखा पराक्रमी व जरासंधादि इतर राजे हे टोळांप्रमाणें सामर्थ्यहीन आहेत, असा कृष्णाच्या भाषणाचा मतलब. १० अश्वगजादि राज्यासंबंधीं जे सुखादि भोग ते. ह्या अर्धांत 'विकल्पा'लंकार आहे. ११ युद्धासारखा. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'समरास मराया' असा पदच्छेद केलेला आहे. १२ हित करणारा. 'हित याग' असाही पाठ आहे. योग=उपाय, युक्ति. १३ यज्ञासाठीं. १४ उदकासिंचनानें पवित्र केलेले. १५ त्या ईश्वरस्वरूपी विप्रांस. १६ न्याययुक्तीं, सदाचारसंपन्न अशा. १७ मुलास. याचें नांव सहदेव असें होतें. (अध्याय २२ श्लो० ३१). १८ बालसूर्य. हें पंतांच्या ठरींव यमकांपैकीं एक आहे (ब्रह्मोत्तरखंड, अध्याय ११ गीति ६ पहा). १९ स्वर्गांतील कित्येक प्रेक्षक अप्सरांस म्हणाले कीं, (हे) उर्वशी, घृताची, रंभे, हा (भीम किंवा जरासंध)पूर्वागत (युद्धांत मरण पावून प्रथम वरतीं स्वर्गांत आला). भीम व जरासंध यांचें बाहुयुद्ध चाललें होतें. त्या वेळीं एकदां असें वाटे, कीं जरासंध चीत झाला; पण पुन्हा वाटे, कीं भीम चीत झाला. यामुळें प्रेक्षक अप्सरांस एकदां सांगत, कीं भीम प्रथम मरण पावून त्यांस वरण्यासाठीं आला; व पुन्हा सांगत, कीं जरासंध आला. असे तर्कवितर्क जरासंधाचा वध होईपर्यंत चालले होते. रणांत पाठ न दाखवितां, शत्रूसन्मुख उभे राहून जे वीर धारातीर्थीं मरण पावतात, त्यांच्या गळ्यांत अप्सरा माळ घालतात, अशी समजूत आहे. ह्या समजुतीस अनुलक्षून हें वर्णन आहे. [मोरोपंतकृत भीष्मपर्व (काव्यसंग्रह), पृष्ठ ११ टीप ११ पहा]. 'पूर्वागता' असाही पाठ आहे.

आरंभ[1] कार्तिकाचा[2] युद्धाचा तुल्य[3] वर्णिती संत, ।
भूतातिथिदिवसांचा[4] त्या हि मगधभूमिजानिचा[5] अंत. ॥ ११

होते हर्षविषादाकुळमानस[6] सार्ध[7] घस्र तेरा जे ।
प्रभुनें केवळ हर्षाकुळ केले, पुसुनि अश्रु[8], ते राजे. ॥ ११

जो प्रथम तारकामयसंग्रामीं[9] जिष्णुविष्णुंनीं साजे, ।
तो रथ बृहद्रथसुतें संपादुनि सर्व जिंकिले राजे. ॥ ११

त्यावरि चढोनि, देउनि अभय जरासंधनंदना[10] अजितें[11], ।
आणुनि धर्मासि दिलें यश, आम्हांलाहि ध्यावया[12] अजि ! तें. ॥ ११

---

१ कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून त्रयोदशीपर्यंत तेरा दिवस मल्लयुद्ध करून भीमानें जरासंधा मारिलें. (अध्याय २३ श्लोक २९-३०). २ कार्तिक महिन्याचा. येथें रा. तेंडुलकर यांच्या प्रतीं 'कार्तिकाच्या' असा पाठ आहे व त्यावर 'कार्तिकस्वामीच्या' अशी टीप आहे. ३ सारखा. युद्धाच आणि कार्तिकमासाचा आरंभ सारखा एकाच दिवशीं झाला. ४ भूतें (पिशाचराक्षसादि) आहे अतिथि (पाहुणे) ज्या दिवसांत, त्या दिवसांचा आणि मगधभूमि आहे जाया (पत्नी) ज्याची अस जो जरासंध त्याचा अंत (नाश, शेवट) संत (साधुजन) तुल्य वर्णिती (समानकालीं झाला)—अस वर्णन करतात. युद्ध सरल्यामुळें रक्तमांस खाणाऱ्या भूतांचे चैनीचे दिवसही गेले आणि जरासंधह मरण पावला. ५ मगधराजाचा, जरासंधाचा. ६ भुजयुद्धाचा परिणाम कसा होईल याचा नियम नसल्यामुळें हर्षखेदयुक्त मानस असे राजे. ७ सार्ध (अर्धासहित) तेरा=साडेतेरा. घस्र=दिवस कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून त्रयोदशीपर्यंत तेरा दिवस मल्लयुद्ध होऊन चतुर्दशीच्या रात्रीं भीमानें जरासंधास मारिलें. (अ० २३ श्लोक २९-३०) ८ अश्रु. अस्र=नेत्रोदक. 'अस्रः कोणे कचे पुंसि क्लीबाश्रुणि च शोणिते' इति मेदिनी. ९ तारकामयसंग्रामीं=तारक+आमय+संग्रामीं=तारका म्हणजे बृहस्पतीची भार्या तारा ही आहे आमय म्हणजे रोग—तारारूप आमय (प्राणनाशक रोग) ज्यांत असा जो संग्राम (युद्ध) त्यांत. तात्पर्य, तारानिमित्त प्राणहानिकारक असें जें पूर्वीं मोठें युद्ध झालें, त्या वेळेस ज्या रथांत जिष्णु (इंद्र) व विष्णु बसले होते म्हणून जो शोभे (शोभला), तोच रथ बृहद्रथसुतें (जरासंधानें) मिळवून, त्या रथांत बसून, त्यानें सर्व राजे जिंकिले—असा स्पष्टार्थ. ह्या तारकामय संग्रामाची हकीकत अशी आहेः—एकदां चंद्राच्या घरीं कांहीं उत्सव होता, म्हणून इंद्रादि देव आपापल्या कुटुंबांसह तो प्रसंग साजरा करण्याकरितां चंद्राकडे आले होते. त्यांत बृहस्पतीही तारेसह आला होता. चंद्राला अनेक स्त्रिया होत्या, तथापि अतिकामुकत्वामुळें त्याचें समाधान झालें नव्हतें. तारेसारखी रमणी स्वगृहीं वारंवार दृष्टीस पडत असल्यामुळें, चंद्राचें मन कामार्त झालें व तीच अवस्था तारेचीही झाली. चंद्राकडील उत्सव समाप्त झाल्यावर सर्व देव आपापल्या कुटुंबांसह परत गेले. पण तारा कांहीं बहाणा करून चंद्राकडेच राहिली. बृहस्पतीनें पुष्कळ निरोप पाठविले, पण तिला स्वपतिगृहीं जावेंसें वाटेना. बृहस्पतीनें सर्व उपाय करून पाहिले, पण ते सर्व निष्फळ झाले. तेव्हां ही गोष्ट बृहस्पतीनें इंद्राचे कानावर घातली. त्यानेंही आपली शर्थ करून पाहिली, पण तारेचें मन वळेना. चंद्रानें तरी इंद्राचें म्हणण्यास मान द्यावयाचा होता, पण त्यानेंही तसें न करितां उलट इंद्राचीं अहिल्याधर्षणासारखीं कर्मेंवर्मैं काढून, त्याची यथेच्छ निर्भर्त्सना केली. तेव्हां बृहस्पतिपक्षानुयायी देव व चंद्रपक्षानुसारी दैत्य यांमध्यें तारामूलक तुमुल युद्ध झालें. यालाच 'तारकामयसंग्राम' असें सुप्रसिद्ध नांव आहे. ह्या युद्धांत हजारों प्राण्यांचा नाश होऊं लागला, तेव्हां ब्रह्मदेवानें मध्यस्थी करून लढाई मिटविली. १० सहदेवातें. ११ कृष्णानें. १२ 'गावया अजि ! तें' असाही पाठ आहे.

त्या[1] चि रथावरि बैसुनि मग जाय द्वारकेसि केशिघ्नें[2]; ।
तैं शंभु म्हणे, 'याच्या मात्र जना भय न देवि ! दे विघ्नें.'[3] ॥ ११६

---

## अध्याय दुसरा.[4]

मग[5] जिष्णु उत्तरेला जिंकाया, भीम वासवाशेला,[6] ।
सहदेव दक्षिणेला, वरुणदिशेला[7] हि नकुळ तो गेला. ॥ १
कवि[8] म्हणति, 'चतुर्भुजभुज[9] जे धर्मसहाय-दक्ष[10] अजित[11] रणीं ।
ते[12] हे कीं चतुराशासुखद[13] चतुर्मूर्ति[14] होय अजि तरणी.[15] ॥ २
हरिति रिपूंचे मदगद,[16] पदें[17] न, दयासिंधु ते सु-जन-महितें,[18] ।
झाले केवळ न दरद,[19] बदरद[20] हि न गांजिला प्रणत[21] अ-हितें.[22] ॥ ३
करुनि चतुर्दिग्विजय[23] द्रविणाचे[24] अमित[25] राशि जोडूनी, ।
ते स्वपुराला आले, विजित नृपांचें हि मन न मोडूनी. ॥ ४
तैसें च आणिलें बहु वित्त युधिष्ठिरपुरास दास-जितें[26] ।
अजितें,[26] अजि ! तें त्यां[27] तत्प्रेम[28] अशा कौतुकीं[29] सदा संजितें.[30] ॥ ५

---

१ त्या जरासंधाच्या रथांत. या रथाचें वर्णन अध्याय २४ श्लोक १८–१९ यांत आहे. २ केशि नामक राक्षसाचें हननकर्ता (कृष्ण). ३ श्रीकृष्ण इतका पराक्रमी होता कीं, (शंकर पार्वतीस सांगतात) याच्या (कृष्णाच्या) जना (भक्तांस) मात्र विघ्न भय न दे (विघ्नें प्राप्त होतील अशी मुळींच भीति वाटत नाहीं); विघ्नें आल्यास त्यांचा परिहार करण्यास कृष्ण समर्थ आहे–असा स्पष्टार्थ. ४ ह्या अध्यायांत मूळांतील २६–४६ ह्या एकवीस अध्यायांतील कथाभाग पंतांनीं वर्णन केला आहे. मुक्तेश्वरांनीं हाच कथाभाग अत्यंत विस्तृतपणें आपल्या सभापर्वाचें ८–११ अध्याय व बाराव्या अध्यायाच्या ४२ ओंव्या यांत म्हणजे सुमारें सव्वासहाशें ओंव्यांत वर्णिला आहे. ५ जरासंधवध करून धर्माची आज्ञा घेतल्यावर. ६ वासव+आशा=वासवाच्या (इंद्राच्या) आशेला (दिशेला)=पूर्व दिशेला. आठ दिशांचे आठ पालक, पति, अथवा स्वामी आहेत, त्यांस 'अष्टदिक्पाल,' 'अष्टदिक्पति' 'अष्टलोकपाल' असें म्हणतात. 'इंद्रो वह्निः पितृपतिर्नैर्ऋतो वरुणो मरुत् । कुबेर ईशः पतयः पूर्वादीनां दिशां क्रमात् ॥' (अमरकोश). ७ पश्चिमदिशेला. (वरुण हा पश्चिमदिशेचा पति). ८ ज्ञाते, बुध. ९ चार आहेत भुज (बाहु) ज्याला तो चतुर्भुज (कृष्ण) त्याचे भुज. १० धर्माला साहाय्य करण्यांत तत्पर. ११ रणामध्यें न जिंकलेले, पराजय न पावलेले. १२ पूर्वोक्त गीतींतील चवघे–भीम, अर्जुन, नकुळ व सहदेव. १३ चार दिशांना सुख देणारा. सूर्योदय होतांच सर्व जगास आनंद होतो, हें प्रसिद्धच आहे. १४ चार मूर्ति ज्याच्या तो. १५ सूर्य. ही सर्व गीति पंतप्रतिभानिर्मित आहे. हींतील दोन्ही उत्प्रेक्षा कोणाचें मन तल्लीन करणार नाहींत ? (सूर्यानेंच चार रूपें धारण केलीं कीं काय–असा भाव). १६ गर्वरूप रोग. १७ राजपद. १८ सज्जनांस पूज्य. १९ भयदायक. २० बोर देणारा. (अगदीं थोडा करभार देणारा देखील दुःख पावला नाहीं–असा भाव). २१ शरण आलेला. २२ शत्रु. २३ चार दिशांचा जय. २४ द्रव्याचे. 'राशि' हें नाम संस्कृतांत पुल्लिंगी आहे. २५ असंख्य, अगणित. २६ दासांनीं (भक्तांनीं) ज्याला जिंकिलें आहे अशा कृष्णानें. २७ कृष्णाला. २८ त्यांचें (दासांचें, भक्तांचें) प्रेम. २९ कौतुकानें. ३० सज्ज करतें. सजवितें, शोभवितें.

धर्मपरें धर्मपरा धन दिधल्या काय दोष ? कर दे, हें[1] ।
[2]किति ? [3]दासदास्य हि करी श्री[4]श श्री[5]चित्ततोषकर देहें[6]. ॥ ६

[7]धर्म [8]प्रभु, न [9]पर प्रभु, जेणें केला प्रसिद्ध [10]तो [11]कर-द, ।
मोठ्यांमोठ्यांला ही बुडतां [12]व्यसनाब्धिमाजि जो [13]कर-द. ॥ ७

धर्म म्हणे, ‘देवा ! तुज दीक्षा साजेल, मज न, यज्ञाची; ।
हो [14]सम्राट्, सर्वेशा ! दृष्टि निवो [15]सर्व-सव-नयज्ञांची.’ ॥ ८

कृष्ण म्हणे, ‘राया ! तूं उचित [16]अनुद्धत, न उद्धत [17]क्रतुला, ।
[18]योग्य न दुग्धस्थानीं योजाया प्रिय हि शुद्ध [19]तक्र तुला. ॥ ९

[20]देवा ! सेवा चि भली दे मज, दुसरी न घेववे दीक्षा, ।
[21]सुखकीर्तिहेतु आम्हां तव [22]नव-सव-भूमिदेव-वेदीक्षा. ॥ १०

करिन ब्राह्मणपादप्रक्षालन, [23]सांवडीन मी उष्टीं; ।
सर्व हि करीन, देहीं फल हें चि, न [24]अन्यथा [25]वृथा-पुष्टीं. ॥ ११

[26]कृतकृत्य यांत आम्ही, हो तूं सम्राट् प्रभो ! [27]अगाध-बला ! ।
हो [28]त्वद्यशें [29]त्रिलोकी राया ! कुरुसत्तमा ! अगा ! धवलीं[30]. ॥ १२

---

१ कर देणें. २ श्रीकृष्णानें करभार दिला, यांत नवल तें कोणतें ? हा ‘काव्यार्थापत्ति’ अलंकार आहे. (मागें अध्याय १ गीति ११३ वरील टीप पहा). ३ दासांची (भक्तांची) सेवा. ४ लक्ष्मीपति (कृष्ण). ५ लक्ष्मीच्या मनाला संतोष देणारा. ६ जातीनें, स्वतः, खुद्द. ७ युधिष्ठिर. ८ अतुल-पराक्रमी, सर्वशक्तिमान्. ९ अन्य. १० श्रीकृष्ण. ११ करभार देणारा. १२ संकटरूप सागरांत. १३ हात देणारा, साह्यकर्ता. १४ चक्रवर्ती. १५ सर्व यज्ञांचा (सवांचा) नय (पद्धति, विधि) जाणणाऱ्यांची. १६ नम्र, उद्धट नाहीं असा. १७ यज्ञाला. १८ शुद्ध [आणि] तुला प्रियहि तक्र (ताक) दुग्धस्थानीं योजाया योग्य न–असा अन्वय. ताक कितीही चांगलें असलें किंवा आवडतें असलें, तरी त्याची योजना दुधाचे ऐवजीं करणें योग्य नाहीं. त्याप्रमाणें मी (कृष्ण) तुला (धर्मराजाला) कितीही पूज्य असलों, तरी राजसूययज्ञ करण्यासाठीं माझी योजना करणें योग्य नाहीं–असा कृष्णाचे भाषणाचा मथितार्थ. १९ ताक. २० हे राजा, धर्मा. २१ सुखाला व कीर्तीला कारण. २२ नव सव (नवीन यज्ञ), भूमिदेव (ब्राह्मण) आणि वेदी (यज्ञभूमि) यांची ईक्षास (अवलोकन). २३ झाडून काढीन. २४ निष्फळ. ‘अन्य या’ असाही पाठ आहे. २५ व्यर्थ पुष्ट झालेल्या. (‘देहीं’ याचें विशेषण). २६ सफलमनोरथ. २७ ज्याचें बल (सामर्थ्य) अगाध (मोठें) आहे अशा हे धर्मा. २८ तुझ्या कीर्तीनें. यशाचा रंग पांढरा असतो, असा कविसंकेत आहे. २९ त्रैलोक्य, तीन्ही लोकांचा समुदाय. ३० तुझ्या कीर्तीचा सफेता लागून सर्व पृथ्वी शुभ्र होवो, म्हणजे तुझी कीर्ति सर्व पृथ्वीवर पसरो–असा भाव. येथें ‘तद्गुण’नामक अलंकार आहे, कारण पृथ्वी आपला स्वाभाविक गुण (रंग) टाकून, उज्ज्वल यशाचा गुण घेवो, असें वर्णन आहे. धबला=धवला, शुभ्र. येथें पंतांनीं यमकपोषणार्थ ‘बवयोः सावर्ण्यम्’ ह्या नियमानें ‘धवल’ हा शब्द ‘धबल’ असा लिहिला आहे. ‘रलयोर्डलयोश्चैव शषयोर्बवयोस्तथा । वदंत्येषां च सावर्ण्यमलंकारविदो जनाः ॥’

जैसी [1]यज्ञेशाज्ञा झाली कुरुसत्तमा अतिप्राज्ञा, ।
तैसी च [2]सत्कुलोत्तमधौम्यद्वैपायनादिविप्राज्ञा. ॥ १३
धर्मे [3]सवोत्सवोत्सुक नृप आणविले स्वदूत [4]धाडूनी, ।
विप्र क्षत्रिय वैश्य हि [5]सच्छूद्र हि भूवरील [6]झाडूनी. ॥ १४
भीष्म, [7]सकलत्रसुत धृतराष्ट्र, कृप, द्रोण विदुर, पुरवासी ।
धर्मे आणविले [8]मृग, [9]जाणों प्रेषूनि [10]नकुळ-सु-रवासी ॥ १५
[11]सवसाहित्य किति वदूं ? राबति भुज जेथ [12]साधु-सुर-तरुचे, ।
[13]ज्यां खटपटेपुढें न श्रीशास श्रीस [14]हीनें सुरत रुचे. ॥ १६
[15]रामादि सर्व यादव, शिशुपालादिक नृपाल बहु आले; ।
अर्पुनि [16]उपायनें बहु धर्मकृतें आदरें बहुत [17]धाले. ॥ १७
[18]अध्वर्यु याज्ञवल्क्य, [19]ब्रह्मा श्रीव्यास, [20]पैलमुनि [21]होता, ।
सुमुनि [22]सुसामानामा [23]सामग यज्ञांत जाहला होता. ॥ १८
जेथ सभासद नारद, फार दयाज्ञान ज्यांत वास करी, ।
जेथें विप्रपदा[24]ब्जप्रक्षालन तीर्थपा[25]ददेव करी, ॥ १९
तेथें साहित्यासि श्रीभी[26]ष्म द्रोण विदुर बहु जपती, ।

१ श्रीकृष्णाची (यज्ञेशाची) आज्ञा. २ उत्तम वंशांत जन्मलेल्या धौम्यव्यासप्रमुख ब्राह्मणांची आज्ञा. ३ यज्ञोत्सवाविषयीं उत्कंठित. ४ हें पंतांचें ठरींव यमक आहे (विराटपर्व, अध्याय १-१३). ५ उत्तम (सदाचारसंपन्न) शूद्रजनही. ६ सर्व. ७ बायको व पुत्र यांसहित. ८ भीष्मधृतराष्ट्रादिक हेच मृग=हरिण. हरिणांस गाणें फार आवडतें, अशी प्रसिद्धि आहे. ९ येथें उत्प्रेक्षालंकार आहे. १० नकुल हाच सुरव (मधुर गीतस्वर) त्यास. ११ सव=यज्ञ. १२ साधूंचा कल्पतरू जो कृष्ण त्याचे. १३ येथें पंतांच्या केकावलींतील 'सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास दारा परी । असा प्रभुहि सेवकां भजसि खासदारापरी ॥' ह्या वर्णनाची आठवण होते. 'ज्या खटपटीपुढें न श्रीचें श्रीशास हीन सुरत रुचे' असाही पाठ आहे. १४ तुच्छ, नीच. येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'ही न' असा पदच्छेद आहे. १५ बलरामप्रमुख. १६ भेटी, नजराणे. १७ संतुष्ट झाले. १८ अध्यक्ष, यजुर्वेदी ऋत्विज. ह्याचें काम अग्नींत आहुति देण्याचें असतें. १९ कर्मारंभीं व शेवटीं प्रणवोच्चार करणारा व यज्ञांतील सर्व कामांवर पैरवी ठेवणारा वेदत्रयज्ञ ऋत्विज. २० वसूचा पुत्र. २१ होतृ ऋत्विज्. हा ऋग्वेदी असून त्याचें काम यज्ञांतील देवतांस स्तुतिपूर्वक आव्हान करण्याचें असतें. २२ धनंजयगोत्रश्रेष्ठ सुसामा नांवाचा मुनि. (सभापर्व-अ० ३४-४५). २३ सामवेद पठण करणारा. ह्याला उद्गाता असें नांव आहे. ह्याचें काम देवतांच्या संतोषार्थ सामवेदगायन करणें, हें आहे. [विशेष माहितीकरितां जिज्ञासूंनीं मुक्तेश्वरकृत सभापर्व (काव्यसंग्रह)-पृष्ठ १२२ टीप ५ पहावी]. २४ विप्र (ब्राह्मण)+पद(पाय)+अब्ज (कमल)+प्रक्षालन(धुणें). धर्माच्या राजसूययज्ञांत ब्राह्मणांचे पाय धुणें व उष्टीं काढणें, हीं कामें कृष्णानें आपणाकडे घेतलीं होतीं (मागें गीति ११ पहा). २५ तीर्थ आहे पादीं ज्याच्या असा देव (श्रीकृष्ण). २६ केलें काय, हें पाहण्याचें काम भीष्मद्रोणांकडे होतें, आणि यज्ञसंबंधी खर्चाचें काम विदुराकडे होतें.

न विसंबिति क्षण जसे [1]गुणवदपत्यासि वृद्ध मनुजें[2]-पती. ॥ २०
यजमान हि गुरुदेवद्विजभक्त [3]अजातशत्रु, [4]तज्जाया ।
[8]मूर्तिमती [5]श्रद्धासी, आले गुण ज्या [6]सुधेंत [7]मज्जाया, ॥ २१
वाढी स्वमायसी कीं मूर्तिमती [9]सुरभि गायसी ते[10] तें, ।
जें जो इच्छी, ई[11]तें [12]गाय भुवन, जेंवि गाय सीतेतें, ॥ २२
यज्ञामें सफळ सकळ स[13]र्व, [14]सगुणब्रह्म ज्यांत [15]राबे तें, ।
त्या क्रतुच्या वर्णावें कीर्तिसुधेतें, न अन्य [16]राबेतें. ॥ २३
ई[17]तुक्या चि राजसूयक्रतुच्या या वर्णनें रसिक हर्षो; ।
काय ढरढरां ढेंकर देउनि चा[18]तक म्हणेल ? 'बहु वर्षो' ॥ २४
तें यजनकर्म झालें पूर्ण [19]सविधि परमशुद्ध [20]रायाचें, ।
उद्धरिलें भगवंतें भरताचें गोत्र [21]उद्धरायाचें. ॥ २५
तेव्हां [22]देवर्षि मनीं आणी कीं, '[23]क्षत्र सर्व [24]शुद्ध-रणें ।
उद्धरणार प्रभु, परि आधीं शि[25]शुपाल आजि उद्धरणें.' ॥ २६

१ गुणवान् पुत्रास. २ राजे, जनस्वामी. ३ ज्याला कोणी शत्रु नाहीं असा (धर्मराज). ४ त्याची बायको द्रौपदी. ५ मूर्तिमंत आस्तिक्यबुद्धि. ६ ज्या द्रौपदीरूपिणी सुधेंत. सुधा=अमृत. ७ स्नानार्थ. ८ गीति २१ व २२ ह्यांत द्रौपदीवर अनुक्रमें श्रद्धा, स्वमाय व सुरभि यांचा आरोप केलेला असल्यामुळें, ह्या दोन्ही पद्यांत 'उत्प्रेक्षा'लंकार आहे. ९ कामधेनु. येथें 'सुरभि गाय' असें म्हटल्यानें पंतांच्या हातून पुनरुक्ति दोष घडला, असें वाटण्याचा संभव आहे. परंतु सुरभि हें विशेषनाम असल्यामुळें पुनरुक्ति दोष होत नाहीं. गाय कोणती ? तर सुरभि. पुढें अ० ४ गीति ४ हींत 'बक शकुनी' हा प्रयोगही अशाच प्रकारचा आहे. १० द्रौपदी. ११ द्रौपदीतें. 'तीतें' असें पाठांतर. १२ स्तवी. १३ यज्ञ. १४ मूर्तिमान् ब्रह्म. १५ काम करी. १६ राब=काकवीपेक्षां कांहीं दाट जो उंसाच्या रसाचा रांधा; ती. १७ इतक्या अल्पवर्णनानें. (मागें अध्याय १ गीति ११ वरील टीपा पहा). १८ एक जातीचा पक्षी. हा फक्त पावसाचें पाणी पितो, अशी समजूत आहे. १९ विधिपूर्वक. २० धर्माचें. २१ उद्धरण्यास योग्य असें. २२ नारद. २३ क्षत्रिय. २४ धर्मयुद्धानें. २५ शिशुपाल हा सोमवंशीय दमघोष राजाचा पुत्र. ह्याची माता श्रुतश्रवा ही वसुदेवाची भगिनी, तेव्हां हा कृष्णाचा आतेभाऊ. शिशुपालाच्या आजाचें नांव चेदि म्हणून याला 'चैद्य' अथवा 'चेदिप' आणि ह्याच्या देशास 'चेदि' असें नांव पडलें. या देशाची राजधानी शुक्तिमतीनामक नगरी. शिशुपाल हा हिरण्यकशिपूचा अंशावतार होय. यास जन्मतः तीन डोळे व चार हात होते. हा कृष्णाच्या मांडीवर बसला तेव्हां याचे दोन हात व एक डोळा असे गळून पडले. तत्क्षणींच श्रुतश्रवा भयभीत होऊन कृष्णास शरण गेली आणि 'यास मारणार नाहीं' असें वचन दे, असें त्यास म्हणाली. 'मी या शिशुपालाचे शतापराध क्षमा करीन' असें कृष्णानें आपल्या आतेस वचन दिलें. नंतर तो द्वारकेस परत आला. पुढें राजसूययज्ञांत इंद्रप्रस्थ येथें कृष्णाची अग्रपूजा करावी असें ठरलें. ती गोष्ट शिशुपालास पसंत न पडून त्यानें भीष्माची आणि कृष्णाची अद्वातद्वा बोलून निंदा केली. ती कृष्णास सहन झाली नाहीं, तेव्हां त्यानें शिशुपालाचे शंभर अपराध होतांच आपल्या चक्रानें त्याचें शिर तोडिलें व तो तात्काळ मरण पावला. (सभापर्व–अ० ४५.) ह्या शिशुपालवधाच्या कथानकावर माघकवीचें एक उत्तम संस्कृत काव्य आहे.

**ध**र्मासि [1]म्हणे, 'राया ! आले यज्ञोत्सवार्थ नगरा [2]जे ।
त्यांमध्यें पूजावा त्वां प्रथम श्रेष्ठ, सर्व मग राजे.' ॥ २७

**ध**र्म म्हणे **भी**ष्मातें, 'सांगा जी ! मज तुम्ही च जें विहितें[3], ।
सांगत आलां पूर्वीं जैसे [4]मद्भावुकार्थ जेंवि हित.' ॥ २८

**भी**ष्म म्हणे, 'वत्सा ! जरि पुससी, 'सर्वांत कोण पूज्य ?' असें ।
तरि **वा**सुदेव आधीं पूजावा त्वां विशुद्ध-भक्ति-रसें. ॥ २९
[5]ज्योतिर्गणांत रविसा, तेजस्वी **कृ**ष्ण या सदांत[6] पहा, ।
तेज[7] अहा ! क्षिप्र वहा, अर्घ वहा, एक पूज्य [8]**वृ**ष्णिप हा.' ॥ ३०

पूजी **प्र**भुला प्रेमें व्हाया [9]दृक्कामपूर्ति **स**हदेव, ।
पूजित झाले [10]सस्थिरचर त्या श्री**वि**श्वमूर्तिसह देव. ॥ ३१

**ना**रद**भी**ष्मप्रमुखां साधूंच्या होय [11]दृष्टिलाभा जी ।
[12]भा [13]जीमूतश्याम **प्र**भुची ती [14]**चै**द्यदृष्टिला [15]भाजी. ॥ ३२
[16]**भ**गवत्सत्कृति पाहुनि कोपे **शि**शुपाल [17]सत्समाजांत, ।
दुष्टीं जशी पिशाची भरली दुर्बुद्धि तत्समा [18]ज्यांत. ॥ ३३
**ध**र्मासि [19]करी [20]सज्जनवृंदीं [19]पाण्यापरीस [19]पातळ, तें ।

---

१ भीष्म धर्मराजास म्हणतो. येथें 'म्हणे' याचा कर्ता 'भीष्म' अध्याहृत आहे. (सभापर्व–अ० ३६ श्लो० २२). २ आचार्य, ऋत्विज्, श्वशुरादि संबंधी जन, मित्र इत्यादि. ३ करण्यास योग्य. ४ माझ्या कल्याणार्थ. (भावुक=कल्याण, क्षेम). ५ नक्षत्रसमूहांत. हाच दृष्टांत मूळांत आहे:–'मध्ये तपन्निवाभाति ज्योतिषामिव भास्करः.' (सभापर्व–अ० ३६ श्लो० २८). ६ सभेंत. ७ त्याचें तेज (कांति) अवर्णनीय आहे, त्याला क्षिप्र (लवकर) वहा (बोलवा) आणि त्याला अर्घ (पूजासाहित्य) वहा (अर्पण करा). तेज=बळ, पराक्रम–असा अर्थ केला तरी चालेल. ८ वृष्णिपालक, यादवकुलपालक श्रीकृष्ण. ९ दृष्टीची इच्छा पूर्ण करण्यासाठीं. १० स्थावरजंगमासह. 'पूजित आले सस्थिरचर' असाही पाठ आहे. ११ नेत्रांना लाभदायक. १२ कांति. १३ मेघश्याम. (जीमूत=मेघ). १४ शिशुपाळाच्या दृष्टीला. येथें कृष्णाची मेघश्याम कांति शिशुपाळास भाजी, असें स्वाभाविक नियमाविरुद्ध वर्णन असल्यामुळें येथें '**विरोधा**'लंकार आहे. १५ भाजून टाकी, संताप उत्पन्न करी. १६ भगवंताचा सत्कार. १७ साधुमंडळांत. १८ ज्यांत (शिशुपाळांत). १९ पाण्यापेक्षां पातळ करणें=निंदा करणें, खालीं पहावयास लावणें, अपमान करणें. येथें '**लोकोक्ति**' नामक अलंकार आहे. जेथें एकाद्या लोकप्रसिद्ध उक्तीचें अनुकरण केलेलें असतें, तेथें '**लोकोक्ति**' नामक अलंकार होतो. २० साधुजनांच्या समुदायांत.

वदवे ना; सन्निंदावागनुवादें[1] हि पाप आतळतें[2]. ॥ ३४

गांजी[3] पुष्कळ लावुनि मूर्खपण तशा सभेंत शांतनवा[4], ।

परि साहे[5] कीं जन्मापासुन बहु शांत तो, न शांत नवा. ॥ ३५

त्रिजगत्पूज्यपद[6] प्रभु गुरु पुण्यश्लोक[7] सार्वभौम खरा, ।

त्या निंदी श्रीकृष्णा कीर्तिश्रीशांतिर्भूतिच्या[8] मखरा. ॥ ३६

बहु सांत्वन धर्म करी, न शमे, न वळे परंतु तो चैद्य. ।

मरणाऱ्या[9] रोग्याला काय करिल जाणता भला वैद्य ? ॥ ३७

भीष्म म्हणे, 'खळसांत्वन कां करितो ? याचिया नसे कानें ।

हें ऐकिलें, निवे[10] घृत कढलें तोयाचिया[11] न सेकानें[12].' ॥ ३८

क्षोभे बहु या वचनें, त्याला उपमान[13] दुष्ट कुतरेंच; ।

विस्तर असो. तयाचा उत्तरी[15], शिर हरुनि शौरिसुत[14], रेंच[15]. ॥ ३९

सोसुनि शत अपराध[16] प्रभुनें शिशुपाल मारिला चक्रें; ।

केला पात्र सुगतिला[17], जी प्रार्थावी गति स्वयें शक्रें. ॥ ४०

शिरलें तद्देहोत्थित[18] तेज प्रभुच्या मुखीं, पदा नमुनी, ।

मानिति मनांत त्या वरचरितास[19] महावरप्रदान मुनी. ॥ ४१

---

१ साधुनिंदारूप शब्दांच्या उच्चारणानें सुद्धां. २ स्पर्श करितें. ३ याचा कर्ता 'शिशुपाळ' (अध्याहृत). ४ शंतनुपुत्र जो भीष्म त्याला. ५ सहन करी. 'हांसे' असें पाठांतर. ६ तीनही लोकांनीं पूजा करण्यास योग्य असे ज्याचे पद तो (श्रीकृष्ण). ७ निष्कलंक कीर्ति ज्याची तो. 'पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥' हें वचन सुप्रसिद्धच आहे. श्लोक=यश, कीर्ति. ८ भूति=ऐश्वर्य. ह्या गीत्यर्धांतील कल्पना मोठी सरस व सुरम्य आहे. ९ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. कल्पनासादृश्यः—युक्तचि मरणाराला हितपरिणामहि न सोसवे काढा. (मोरोपंत, आदिपर्व, अध्याय ९।३९). १० कढलें घृत तोयाच्चिया सेकानें न निवे–असा अन्वय. हा भागही सुभाषितरूप आहे. ११ पाण्याच्या. १२ शिंपडण्यानें. कढलेल्या तुपावर पाणी शिंपडलें असतां तें थंड तर होत नाहींच, पण त्यास ज्यास्त उकळ्या फुटूं लागतात. त्याप्रमाणें दुष्टाचें शांतवन करण्याचा प्रयत्न केल्यास, त्यास ज्यास्तच चेव येतो. म्हणून खळसांत्वन करणें व्यर्थ आहे, असा भावार्थ. १३ सादृश्य, दाखला. १४ वसुदेवपुत्र (कृष्ण). १५ रेंच उतरी=गर्व हरण करी, खोड मोडी, रग जिरवी. १६ सभापर्व—अ० ४५ श्लो० २३–२७ पहा. १७ मोक्षाला. १८ त्याच्या (शिशुपालाच्या) देहापासून उत्पन्न झालेलें. १९ श्रेष्ठचरित्रास (श्रीकृष्णास).

देवर्षिप्रमुख सुजन म्हणती, 'जीवांसि एक हरि हितं[1] रे ! ।
अद्भुत महिमा याचा, भक्त तरे, करुनि वैर अरि हि तरे.[2]' ॥ ४२
ऐसें सद्यश[3] निर्मुनि, नेउनि सिद्धीस दासयागा[4] त्या, ।
केली हृष्टा[5] वाणी[6] कविच्या हि तिच्या सदास या गाल्या. ॥ ४३
धर्में विप्रादि सकळ पूजुनि आनंदवूनि बोळविले, ।
भूदेवपदरजांत[7] स्वजनाकरवीं हि देह घोळविले. ॥ ४४
प्रभु हि स्वपुरा[8] गेला, दुर्योधन शकुनि राहिले होते, ।

---

१ कल्याणकारक. २ रावणासारख्या वैरभाव करणाऱ्या भक्तांचा उद्धार भगवंतांनीं केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. ३ उत्तम अशा श्रीकृष्णानें यश निर्माण केलें, असें पंतांनीं म्हटलें आहे. त्याचें कारण असें, कीं परमेश्वर जनप्रवृत्तीला अनुसरून साधूंना गाण्यासाठीं अनेक प्रकारचे उत्तम यशाचे प्रसंग मुद्दाम घडवून आणीत असतो. नाहीं तर एकादी गोष्ट जेव्हांचे तेव्हांच चटदिशीं करून टाकण्यास परमेश्वराला कांहीं कठीण नसतें. अध्याय १ गीति ११५ हींत 'अजितें यश धर्मासि आणुनि दिलें' असें पंतांनीं म्हटलें आहे. ४ दासांचा, भक्तांचा (धर्मादिकांचा) यज्ञ. ५ संतोषित. ६ सरस्वति. उत्तरार्धाचा अन्वयार्थः-ऐसें सद्यश निर्मुनि त्या दासयागा सिद्धीस नेउनि, वाणी हृष्टा केली; [आणि] या गाल्या तिच्या कविच्या सदासही [हृष्ट केलें]. म्हणजे-श्रीकृष्णानें अशा प्रकारचें उत्तम यश निर्माण करून, आपला भक्त जो धर्म, त्याचा 'राजसूय' यज्ञ सिद्धीस नेऊन वाणीला (सरस्वतीला) [अशा प्रकारचें सुयश गाण्याची संधी प्राप्त करून देऊन] आनंदित केलें; आणि त्याप्रमाणेंच या यशास किंवा या यागास गाणारा (वर्णन करणारा) जो तिचा (सरस्वतीचा) कविसमुदाय, त्यालाही आनंदित केलें. ह्या पंक्तीचा पुढें दिल्याप्रमाणें देखील कोणी अन्वयार्थ करितातः-[प्रभु श्रीकृष्णानें] तिच्या (दासयागसिद्धीच्या) गाल्या (गाणाऱ्या) [धर्मयागसिद्धीचें वर्णन करणाऱ्या] या कवींच्याही सदास (मंडळास) वाणी हृष्टा (संतोषित, प्रसन्न) केली. ह्या यागसिद्धीचें वर्णन करितांना कवींनाही आनंदाचें भरतें येऊन, त्यांना विलक्षण वाक्स्फूर्ति येते-असा भावार्थ. रा० पराडकर यांनीं प्रसिद्ध केलेल्या पंतांच्या आर्याभारताच्या आरंभीं पंतांच्या हस्ताक्षराचा नमुना दिला आहे, त्यावरून पंतलिखित प्रतींत शब्द तोडलेले नसावे, असें दिसतें. परंतु निरनिराळ्या संपादकांनीं पदच्छेद निरनिराळ्या प्रकारें केला असतां अर्थ कसा बदलतो, हें रा० पराडकरांनीं ह्या गीतीच्या उत्तरार्धाचा जो पदच्छेद केला आहे, त्यावरून स्पष्ट होईल. हें गीत्यर्ध त्यांनीं पुढीलप्रमाणें छापिलें आहेः—'केली हृष्टा वाणी कविच्याहि तिच्या सदा सया गाल्या ।' व त्यावर अशी टीप दिली आहेः-[कृष्णानें] हृष्टा (आनंदपूर्ण) वाणी (भाषण) केली, [आणि] तिच्या (कृष्णवाणीच्या) सया (मैत्रिणी) [अशा ज्या] कवीच्या वाणी, त्याहि सदा गाल्या [केल्या]. येथें दिलेल्या निरनिराळ्या अर्थांपैकीं स्वाभाविक व सरस कोणता हें रसिक वाचकांनींच ठरवावें, हें बरें. ७ ब्राह्मणांच्या पायांच्या धुळींत. ८ द्वारकेस. ९ सभापर्व अ० ४५ श्लो० ६७-६८ पहा. येथें शिशुपालवध हें कथानक समाप्त झालें. येथून द्यूताच्या कथेस आरंभ होतो.

त्या मयसमेस डोळे धृतराष्ट्रें [१]काय वाहिले हो ! [२]ते. ॥ ४५
घेतां निरोप सांगे व्यास मुनीश्वर युधिष्ठिरासि असें:- ।
'[३]वत्सा ! होणार पुढें [४]क्षत्रक्षय, फार सावधान [५]असें. ॥ ४६
[६]कारण करूनि तुजला क्षत्रक्षय करिल काळ, हें चुकवी ।
ऐसा कोण त्रिजगीं ? म्हणती [७]दुर्वार [८]भाविला सु-कवी. ॥ ४७
दुर्योधनापराधें क्षत्रक्षय भीमजिष्णु[९]बाहुबळें ।
होणार, बा ! [१०]त्रयोदशवर्षान्तीं आटतील [११]वीरबळें. ॥ ४८
क्षत्रक्षयीं कुरुपते ! धर्मा ! तुजला निमित्त जो कर्ता, ।
स्वप्नांत निज सुदुर्लभ दर्शन देईल तो [१२]जगद्भर्ता.' ॥ ४९
ऐसें [१३]भावि कथुनि [१४]मुनि गेला कैलासपर्वता, राया ! ।
[१५]प्रभुला विनउनि, [१६]अयशोभीत निज[१७]सुपौत्र सर्व ताराया. ॥ ५०
धर्म म्हणे, 'भ्राते हो ! क्षत्रक्षय [१८]मन्निमित्त [१९]होयाचा; ।
अ[२०]यश नसावें, त्यजितों जीवित, उपयोग काय हो ! [२१]यांचा ?' ॥ ५१
[२२]जिष्णु म्हणे, 'मतिनाशकमोहीं द्यावें न चित्त अजि ! राया ! ।
[२३]कश्मलपंकें भरितां पटुबुद्धि[२४]नटी त्यजील [२५]अजिरा [२५]या. ॥ ५२
बुध [२६]मतिकवचें व्यसनीं स्वपर[२७]परित्राण कीं करी; राया ! ।

१ ह्या गीत्यर्धांत 'उत्प्रेक्षा'लंकार आहे. २ दुर्योधन व शकुनि हे उभयतां. ३ सभापर्व-अ० ४६ श्लो० १०-१७ पहा. ४ क्षत्रियांचा संहार. ५ रहा. ६ निमित्त. ७ निवारण करण्यास अशक्य, दुरतिक्रम. ८ भविष्याला, पुढें होणाऱ्या गोष्टीला. ९ पराक्रमानें. १० तेरा वर्षांच्या अखेरीस. ११ योद्धे व सैन्यें वीर (योद्धे) बळें (मुद्दाम, जाणून बुजून, दुराग्रहामुळें) आटतील (नाश पावतील)=असा अर्थ केला तरी चालेल. १२ जगताचें पालन करणारा (उमापति). एका पहांटेस तुला स्वप्न पडेल व त्यांत वृषभवाहन शंकर दक्षिण दिशेकडे टक लावून पाहात असलेला तुझ्या दृष्टीस पडेल, असें व्यासांनीं सांगितलें. १३ होणारें. १४ व्यास. १५ ईश्वराराधना करून. १६ अपयशाला भ्यालेले. १७ आपले (व्यासाचे) सदाचरणी नातू. १८ माझ्या निमित्तें. १९ व्हावयाचा, होणारच. २० 'अवश' असा पाठ आदर्शप्रतींत होता. २१ या जीविताचा. 'संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ।' म्हणजे-संभावित मनुष्यास अपकीर्ति मरणाहूनही अधिक वाटते; असें भगवद्गीतावचन (अध्याय २।३४) आहे. २२ सभापर्व-अ० ४६ श्लो० २३-२४ पहा. २३ मोहरूप चिखलानें. २४ कुशलांची (सुज्ञांची) बुद्धिरूप नटी. २५ या देहरूप नृत्यांगणास. येथें सुरेख 'रूपका'लंकार आहे. २६ बुद्धिरूप चिलखतानें. २७ आपलें व दुसऱ्याचें रक्षण.

बुधविबुधसाधुमान्यां[1] ! रक्षीं सत्स्वर्द्रुमा[2] शरीरा या.' ॥ ५३
**धर्म** म्हणे, 'व्हाल तुम्ही जरि मज अनुकूळ तरि करीन असें, ।
ज्ञातींसीं इतरांसीं वर्तेन तसें, तयांसि इष्ट जसें. ॥ ५४
कथिली दुर्व्यसनाची[3] भेदमयी[4] बुद्धि हे खनि[5] पटूनीं[6]; ।
शिवखनिसम[7] मति धरितों मीं निजपरभेदलेख[8] निपटूनी[9].' ॥ ५५
विग्रहकारण[10] भेद त्यागावा, युक्ति हे नृपा[11] सुचली. ।
[12] **भीमा**र्जुनादिसाधुस्वांतासि सुधेपरीस ती रुचली ॥ ५६
आधीं च **धर्म** नयरुचि[13], सर्वत्र सम, क्षमी[14], कृती[15], करुण, ।
स्थिर[16] ज्यापुढें विवेक व्यक्त सदा, जेंवि **रवि**पुढें **अरुण**, ॥ ५७
तत्साधुत्व[17] किति वदों ? स्वगुरूंच्या हितवचा[18] शिकविल्याला ।
जपला जो रात्रिंदिव[19] दृढसद्गुणसुकवचाशि[20] कवि त्याला. ॥ ५८

---

## अध्याय तिसरा[21]

त्या **मय**सभेंत रचना पाहुनि राजा **सुयो**धन भ्रमला, ।
प्रौढकविकृतींत[22] जसा बाळ[23] म्हणे जो, 'कळे अदभ्र[24] मला.' ॥ १
मानुनि जळ स्थळाला, वस्त्रातें आवरी करें, वाटे[25] ।

---

१ बुद्ध, देव आणि साधु यांस मान्य अशा (हे धर्मा). २ सज्जनांस कल्पतरुरूप अशा. ३ मोठ्या संकटाची. ४ स्वपरभेदरूप, फुटाफूट करणारी, 'भेदमूलो हि विग्रहः' असें मूळांत आहे. ५ खाण. ६ सुज्ञांनीं. ७ कल्याणाच्या खाणीसारखी. ८ हा आपला (निज), हा परका (पर), अशा भेदाचा विचार. ९ नाहींसा करून, निपटून. १० कज्जाचें मूळ. ११ धर्मराजाला. १२ भीम, अर्जुन इत्यादिकांच्या अतिशय शुद्ध मनाला (स्वांत=अंतःकरण). १३ नीतीची गोडी ज्यास तो. १४ क्षमा करणारा, क्षमाशील. १५ पंडित, विद्वान्. १६ निश्चल, दृढ, पक्का. (हें विवेकाचें विशेषण). १७ धर्माचा साधुपणा. १८ हितपर वचनास. १९ 'रात्रिदिवस' असें पाठांतर. २० मजबूत सद्गुणरूप चिलखताला. जो कवि दृढ सद्गुणसुकवचाशि त्याला [व] स्वगुरूंच्या (आपल्या गुरूंनीं) शिकविल्याला (शिकविलेल्या) हितवचा रात्रंदिव (रात्रंदिन) जपला, तत्साधुत्व किति वदों ?–असा अन्वय. ह्या दोन गीतींत **'सार'** नामक अलंकार आहे. २१ ह्या अध्यायांत मूळांतील अध्याय ४७–४८ ह्यांतील कथाभाग वर्णिलेला आहे. इतकाच कथाभाग मुक्तेश्वरांनीं स्वकृत सभापर्वाच्या बाराव्या अध्यायाचा उर्वरित भाग व तेरावा अध्याय यांत, म्हणजे सुमारें ३०० ओंव्यांत वर्णिला आहे. २२ प्रतिभासंपन्न अशा कवींच्या कवितेंत. 'प्रौढकविकृतीं जैसा' असें पाठान्तर. २३ मूर्ख. २४ अ(नाहीं)+दभ्र (थोडें)=पुष्कळ. २५ वाटेंत, रस्त्यांत.

कोठें पडे जळीं तो जळ न, जळ स्थळ चि तें खरें वाटे.[1] ॥ २
पिहितें[2] द्वार विवृत[3]तसें मानुनि जातां कपाळ आपटलें,[4] ।
झाला व्याकुळ दुर्मति आपुलिया चि भ्रमाचिया पटलें.[5] ॥ ३
जाय बळें उघडाया कर देउनि उघडिल्या हि अररा[6] ज्या, ।
तोंडघशीं च पडे हो ! होय चमत्कार तापकर राजा. ॥ ४
**भीमा**र्जुन पोषिति अतिहासा अंध[7]जसुदुःसहा यम[8] ही, ।
त्यां[9] 'निजभर[10]हर हरिचे[11] सुसहाय'[12] म्हणे न 'दुःसहाय' मही[13]. ॥ ५
त्या उपहासें झाला बहुत चि संतप्त तो **सुयोधन** हो ! ।
चित्तीं म्हणे, 'मरो, परि अपमानितें[14] सर्वथा सुयोध 'न[15] 'हो,[15] ॥ ६
जातां पुरासि मार्गीं **शकुनि** म्हणे कुरुवरासि,[16] 'सांग मला, ।
तूं अप्रसन्न कां ? गा ! वाङ्नियम[17] सदैव विहित[18] कां गमला ?' ॥ ७
दुष्ट म्हणे, 'जें झालें खर[19] दुःख कृतांतरूप[20] मामा ! तें ।
दावार्चिसें[21] कराया भस्म पहातें तरूपमा[22] मातें.[22] ॥ ८
झालें **युधिष्ठिराला** भूमंडळ विक्रमें[23] वश, कु[24]–नेते ।
भ्राते नव्हेत त्याचे, नरतनुधर[25] सर्व देव **शकुने** ! ते.[26] ॥ ९
तो राजसूय सन्मख,[27] वैर्यापरि[28] ते तसे[29] करद[30] राजे, ।

---

१ सभापर्व–अ० ४७ श्लो० ३–६ पहा. 'कोठें पडे जळीं तों जळ न' असें पाठान्तर. २ लावलेलें, बंद. ३ उघडें असें. ४ सभापर्व–अ० ४७ श्लो० ११ पहा. ५ पडद्यानें. ६ द्वारास. 'कपाटमररम्' (अमरकोश). ७ सुयोधनास दुःसह अशा (हासाला). दुर्योधनास सहन करण्यास फार कठीण अशा प्रकारचा हास्योपहास भीमादिकांनीं केला–असा भावार्थ. 'निजबंधुदुःसहा' असें पाठांतर. ८ जुळे भाऊ (नकुलसहदेव) देखील. ९ भीमार्जुनांस. १० आपला(महीचा) भार हरणाऱ्या. ११ कृष्णाचे. १२ उत्तम साहाय्यकर्ते. १३ पृथ्वी. १४ 'अपमानी' असें पाठांतर. १५ न होवो. सुयोध मरो, परि [तो] सर्वथा अपमानित न हो–असा अन्वय. १६ दुर्योधनास. १७ मौन धारण करणें. १८ उचित. १९ प्रखर, तीक्ष्ण. २० यमासारखें. २१ दावानलाच्या (वणव्याच्या) ज्वालेप्रमाणें. २२ वृक्षाप्रमाणें मला (दुर्योधनाला). येथील कल्पना समर्पक असून ती दुर्योधनाच्या संतापाची तीव्रता दर्शविते. २३ (अर्जुनादि बंधूंच्या) प्रतापानें. २४ (कु)=पृथ्वीतें(नेते)=नियमन करणारे. पृथ्वीचे शासनकर्ते. २५ मनुष्यदेह धारण करणारे ते (भ्राते) (हे शकुने)–देव होत. ही 'उत्प्रेक्षा' आहे. २६ ते भ्राते. २७ उत्तम यज्ञ. २८ 'वैन्यापरि' असें पाठांतर. २९ जे अभिमानी (व) वज्रभृत्करदरा समरीं न गणायाचे, ते तसे (पृथ्वीचे शासनकर्ते) राजे करद ( खंडणी देणारे )[केले]–असा भावार्थ. ३० करभार देणारे.

समरीं न[1] गणायाचे, अभिमानी, [2]वज्रभृत्करदरा जे. ॥ १०
एक हि शतांत न, जसा [3]अज सिंहें हुंगिल्या [4]अजा [5]तारी, ।
तेंवि न नृप [6]चैद्याला; मारविता रक्षिता [7]अजातारी. ॥ ११
[8]श्रीकीर्तिभूतिमहिमा शक्रींचा या युधिष्ठिरीं भूपीं, ।
[9]अन्यत्र लेश; कैचें [10]सलिल जसें सागरीं तसें कूपीं ? ॥ १२
या [11]स्वसपत्नोत्कर्षें जळतों मी अंतरीं च, [12]अ-सुखा या ।
सोसील कोण मानी ? देतों मी [13]पावकासि [14]असु खाया. ॥ १३
घेउनि दे [15]गुर्वाज्ञा मज हा अग्नींत काय [16]होमाया; ।
[17]दुःखद जो [18]स्वपराला त्याची ज्ञात्यांसि काय हो ! [19]माया ? ॥ १४
भ्रमलों सभेंत, केला उपहास [20]तिहीं ससेवकांनीं कीं, ।
फसलों दैवें [21]पंकीं, हंस[22]खग जसा फसे [23]बकानीकीं.’ ॥ १५
शकुनि म्हणे ‘राया ! ते प्रिय, अप्रिय काय तूं अगा ! [24]धात्या ? ।
‘[25]कर्मानुरूप देतो फळ’ म्हणति असें भले [26]अगाधा [27]त्या. ॥ १६

---

१ न गणणारे, पर्वा न करणारे. २ वज्र धारण करणारा कर (हात) आहे ज्याचा असा जो इंद्र त्याच्या भयाला. ३ बकरा. ४ बकऱ्यास. ५ रक्षण करी. ६ शिशुपालाला. जसा सिंहें हुंगिल्या अजा तारी [असा] अज न, तेविं चैद्याला [तारी असा] शतांत एकहि नृप न–असा अन्वय. ७ अजातशत्रु, ज्यास शत्रु नाहीं तो (धर्म). ८ श्री+कीर्ति+भूति+महिमा=लक्ष्मी, यश व ऐश्वर्य यांची महती. ९ धर्मराजाखेरीज इतर राजांचे ठिकाणीं. १० उदक. सलिल जसें सागरीं तसें कूपीं (विहिरींत) कैचें (कोठून असणार) ?–असा अन्वय. समुद्रांत जसें अगाध पाणी राहूं शकतें, तसें तें एकाद्या विहिरींत राहूं शकेल काय ? अर्थात् राहूं शकणार नाहीं. युधिष्ठिर हा समुद्रासारखा आहे, म्हणून इंद्राचा अगाध महिमा त्याच्यामध्यें राहणें हें साहजिकच आहे. परंतु तो इतर राजांच्या ठिकाणीं, विहिरींतील थोड्या पाण्याप्रमाणें, अगदीं अल्प प्रमाणानेंच असणार–असा स्पष्टार्थ. येथें ‘दृष्टांता’लंकार आहे. ११ आपल्या शत्रूंच्या उत्कर्षानें. १२ दुःखा. १३ अग्नीस. १४ प्राण. १५ वडिलांची परवानगी. १६ जाळाया. १७ दुःख देणारा. १८ आपल्यास आणि दुसऱ्यास. १९ ममता. २० त्यांनीं, पांडवांनीं व पांडवस्त्रियांनीं (पुढें गीति ३४ पहा). ‘तिहीं’ हें ‘तें’ ह्या सर्वनामाचें तृतीयेचें अनेकवचनी रूप आहे. २१ चिखलांत. २२ खग=पक्षी. मागें अ० २ गीति २२ वरील टीपा पहा. २३ बगळ्यांच्या समूहांत. (अनीक=मंडळी). २४ ब्रह्मदेवाला. ते ब्रह्मदेवाचे आवडते व तूं नावडता आहेस, असें नाहीं–असा भावार्थ. ‘शकुनि म्हणे रायातें’ असें पाठांतर. २५ ह्या विषयासंबंधीं पुढील वचनें लक्ष्यांत ठेवण्यासारखीं आहेतः–(१) यादृशं कुरुते कर्म तादृशं फलमश्नुते । (वाल्मीकिरामायण–उत्तरकांड, सर्ग १५।२४). (२) यादृशं वपते बीजं क्षेत्रमासाद्य कर्षकः । सुकृते दुष्कृते वापि तादृशं लभते फलम्. ॥ (अनुशासनपर्व–अध्याय ६।६). २६ अगम्य व गूढ अशा. २७ त्या ब्रह्मदेवाला.

पुण्य तसें चि तयांचें, व्हावा उत्कर्ष नित्य नव साचा; ।
महिमा पूर्वींचा हा [1]सुकृतभराचा, नव्या न नवसाचा. ॥ १७
यत्न [2]तदुच्छेदीं त्वां शत केले, परि [3]कवे ! न [4]शकलास, ।
[5]पूर्णेंदु काय जिंकी [6]उडु ? [7]ज्याच्या जिंकवे न [8]शकलास. ॥ १८
तुज ही सहाय **[9]गुरु**, **[10]गुरुसुत**, **कृप**, **[11]वृष**, बंधु, **भीष्म**, आहेत; ।
होईल पूर्ण दिग्जय, [12]बहुदक्षिण यज्ञ, कीर्ति हा हेत.' ॥ १९
नृप त्यासि म्हणे, 'मामा ! योजिसि येथें कशास [13]सामातें ? ।
सांग उपाय, **युधिष्ठिर**[14]परिभवें जेणें घडे, असा मातें,' ॥ २०
**शकुनि** म्हणे, '**पांडुसुत**, **द्रुपद**नृपति, तत्सहाय **[15]कंसारी**, ।
यांसि भुजबळें जिंकी ऐसा कैंचा समर्थ [16]संसारी ? ॥ २१
परि एक उपाय असे, **धृतराष्ट्र** तुला म्हणेल जरि, 'कर गा !' ।
होइल **युधिष्ठिरा**ची [17]श्री–पृथ्वी निश्चयें चि तरि [18]कर–गा. ॥ २२
[19]प्रेमें बहु, [20]पटुत्व नसे द्यूतीं, **धर्म** स्वयें असे भोळा, ।
[21]अनिवर्तनप्रतिज्ञा; [22]तच्छ्रीला [23]यां बळें करीं गोळा.' ॥ २३
**[24]कुरुखल** म्हणे, 'तरि नृपा ! घे आज्ञा, तूं चि हें वद पित्यातें. ।
मी हें बोलों न शकें, जरि करितो बहु दया, तदपि [25]त्यातें.' ॥ २४
करुनि कुविचार, [26]नगरीं जाउनि, एकान्त समय पाहूनी, ।

---

१ पुण्यातिशयाचा, मोठ्या पुण्याईचा. २ त्यांच्या नाशार्थ. वनभोजनांत कौरवांनीं भीमाचे अन्नांत विष घातलें; पांडवांसाठीं बांधविलेल्या जातुषालयास कौरवांनीं आग लाविली; असे अनेक उपाय कौरवांनीं पांडवनाशार्थ योजिले होते. ३ हे पंडिता, हे शाहाण्या. ही **व्याजस्तुति** आहे. ४ समर्थ झालास. ५ हें गीत्यर्थ सुभाषितरूप आहे. ६ नक्षत्र. ७ चंद्राच्या. ८ तुकड्यास. ९ द्रोण. १० अश्वत्थामा. ११ कर्ण. १२ पुष्कळ दक्षिणा ज्यांत असा. १३ साम=समजावणें, मनधरणी करणें, सांत्वन करणें. माझी समजूत घालण्याचा प्रयत्न कशाला करितोस?–असा भाव. १४ परिभव=पराजय. १५ कंस+अरी=कृष्ण. १६ प्रापंचिक मनुष्य. १७ वैभव आणि राज्य. १८ हस्तगत. १९ आवड. २० चातुर्य. २१ द्यूत खेळण्यासाठीं कोणीं बोलाविलें असतां परतावयाचें नाहीं अशी प्रतिज्ञा. २२ त्या धर्माच्या राज्यलक्ष्मीला. २३ ह्या द्यूताच्या बलानें. 'यापरी' असाही पाठ आहे. २४ कौरवांतील दुष्ट, दुर्योधन. २५ धृतराष्ट्रातें. (सभापर्व–अ० ४८ श्लो० २३). २६ हस्तिनापुरीं.

नृप गांठिला हळू हळु तच्छास्त्रविवेकचंद्रराहूनीं.[1] ॥ २५
शकुनि वदे, 'राजा ! हा झाला त्वज्ज्येष्ठ पुत्र कृश हरिण[2] ।
क्षण हि स्वस्थ नसे चि व्याघ्रवनामाजि जेंवि शिशुहरिण.[3]' ॥ २६
वृद्ध[4] वदे, 'वत्सा ! कां पांडुर[5] कृश जाहलासि सांग मला ? ।
भोगिसि भोग सुरांचे,[6] निष्कंटक[7] राज्य, खेद कां गमला ?' ॥ २७
कलिपुरुष[8] म्हणे, "देती तिळ हि न सुख हे स्वभाग्यभोग मला, ।
पाहुनि युधिष्ठिरश्री मज तुच्छ स्वविषय[9] प्रभो ! गमला. ॥ २८
मतिचक्षु[10] भेदिलें हो ! माझें अतिदुःसहें किरीटि–कर्णें[11]; ।
मज संसारीं कैंचें चिंतेनें लागतां किरी[12] टिकणें ? ॥ २९
मी घटतों,[13] परि तुमचें मन केवळ बाढ,[14] तात ! ते[15] ज्यानें ।
अवलोकिले, कळे त्या शिशुशशिसे[16] वाढतात तेजानें. ॥ ३०
इतरांची काय कथा[17] ? जे देणार त्रिखर्व[18] बळि[19] बा ! गा ! ।
त्यांतें वारित होते द्वारप,[20] दारापुढें न ज्यां जागा. ॥ ३१
संज्ञा[21] केली होती, कीं होतां लक्ष[22] त्या मखीं पात्र, ।
उच्चगृहाग्रगपुरुषें[23] फुंकावा शंख एकदा मात्र. ॥ ३२
वाजत होता संतत दर[24], जाणों[25] विष वचोगृहीं[26] वमला; ।
त्या अनिशरवश्रवणें[27] बापा ! आलें खरें च हींव[28] मला. ॥ ३३

१ त्याच्या (धृतराष्ट्राच्या) शास्त्रविचाररूप चंद्राचा ग्रास करणाऱ्या (शकुनिदुर्योधनादि) राहूंनीं. २ निस्तेज, फिकट, पांढरा फटफटित. ३ मृगबालक. ४ धृतराष्ट्र. ५ फिकट, पांडुरवर्ण. ६ देवांचे. ७ शत्रुरहित. [तूं] सुरांचे भोग [व] निष्कंटक राज्य भोगिसी, [असें असूनही तुला] खेद कां गमला ? (वाटला)–असा अन्वय. ८ कलीचा अंशावतार (दुर्योधन). ९ आपला प्रांत, स्वराज्य. १० बुद्धिरूप नयन. 'चक्षु' हें नाम संस्कृतांत नपुंसकलिङ्गी आहे. ११ अर्जुनरूप कणानें. ह्या गीत्यर्धांत 'रूपका'लंकार आहे. १२ कीड. १३ कृश होतों. १४ दृढ. 'परि तुमचे मनि केवळ बाढ' असें पाठांतर. १५ पांडव. १६ बालचंद्राप्रमाणें. १७ येथें '**काव्यार्थापत्ति**' अलंकार आहे. १८ तीन खर्व रुपये. १९ कर. २० द्वारपाल. (सभापर्व–अ० ४९ श्लो० २४). २१ संकेत, ठराव. (सभापर्व–अ० ४९ श्लो० ३१). २२ एक लाख ब्राह्मणांना वाढप झालें म्हणजे सर्वांस कळविण्यासाठीं शंख वाजवावा, असा संकेत केला होता. २३ उच्चगृहाच्या अग्रभागीं गेलेल्या पुरुषानें. २४ शंख. २५ येथें शंखनादावर विषाचा आरोप केल्यामुळें '**उत्प्रेक्षा**'लंकार आहे. २६ कानांत. २७ सतत चालू असणाऱ्या शंखनादाच्या श्रवणानें. २८ ताप भरला. हींव=थंडी वाजून भरणारा ताप.

**म**यकृत सभेंत पडलों मी वापींत[1] स्थलभ्रमें[2] सहसा, ।
हंसले सपत्नदार[3] हि, न म्हणे कोणी हि कीं, 'उगे, न हंसा.' ॥ ३४
खद खद हांसे **भीम** हि, **जि**ष्णु हि, मजला तसे चि बा ! **य**में[4] ही; ।
तद्दुर्दशा[5] न करितां, निस्तेजा[6] मज[6] वठेलें[7] काय मही ? ॥ ३५
पडलों उघडें[8] जातां, द्वार गमे विवृत्त ही यथापिहितें[9]. ।
तत्कृतबोधाहुनि[10] मज गमलें तम[11], अहित जऱ्हि तथापि हित. ॥ ३६
विवृतद्वाराकार[12] प्रेक्षुनि[13] भित्तिप्रदेश[14] जों शिरतों, ।
फुटलें[15] तें थोडें, बहु जें धरिलें शत्रुनें स्वयें शिर तों. ॥ ३७
'**धृ**तराष्ट्रसुता ! ये, मी दाखवितों, द्वार हें, न बापा ! हें' ।
वदला असें **वृ**कोदर जें, तद्वाक्यार्थ[16] तूं चि बा ! पाहें." ॥ ३८
अतिशयित भाग्य त्यांचें[17], स्वीय[18] हि अतिशयित दुःख कळवीलें[19]. ।
जों त्या खलतिलकानें[20] कांहींसें अंधचित्त[21] वळवीलें; ॥ ३९
तों **श**कुनि म्हणे, 'राया ! अभिमानधना[22] ! **सु**योधना ! जरि तें ।
भाग्य हरावें चि असें इच्छिसि जिंकोनि दुर्जयां[23] अरितें[23], ॥ ४०
तरि मज कपटद्यूतीं आहे बळ, फार हा उपाय भला, ।
**ध**र्म हि न म्हणेल, 'नको,' हें ही ठावें असे यथार्थ मला. ॥ ४१
**ध**र्माची 'आहूतो[24] न[24] निवर्तेयम्[24]' असि प्रतिज्ञा, ते ।

---

१ वापी=रुंद व खोल अशी मोठी विहीर, पुष्करिणी. २ जमीन आहे असें समजून. ३ शत्रूची बायको (द्रौपदी). 'दार' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी बहुवचनी आहे. ४ नकुळ व सहदेव हे जुळे भाऊ. ५ त्यांची (भीमादिकांची) वाईट दशा. ६ पराक्रमहीन अशा (मला). ७ वठणीस येईल, ताब्यांत राहील. ८ उघडें असलेलें. ९ झांकल्याप्रमाणें. १० मी मूर्च्छित पडलों असतां, त्यांनीं मला सावध केलें, त्यापेक्षां. ११ मूर्च्छा, घेरी. १२ उघडलेल्या दरवाजाप्रमाणें वरून दिसणारा. १३ पाहून. १४ भिंतीची बाजू. १५ जें शिर भिंतीवर आपटल्यामुळें थोडें फुटलें होतें, तें पांडवांनीं धरल्यामुळें ज्यास्त फुटलें. सारांश, डोकें भिंतीवर आपटल्यामुळें मला फारसें दुःख झालें नाहीं. पण पांडवांनीं माझें डोकें धरून माझी चेष्टा केल्यामुळें मला फार दुःख होत आहे, असा भावार्थ. येथें **'असंगति'** नामक अलंकार आहे. १६ त्या भीमाच्या भाषणाचा अर्थ. (आंधळ्याच्या पोरा-असा भाव). १७ धर्मराजाचें. १८ स्वकीयही. १९ 'कळविलें' ह्या क्रियापदाचा अन्वय देहलीदीपकन्यायानें 'त्याचें भाग्य' व 'स्वीय दुःख' ह्यांकडे लाविला पाहिजे. २० दुर्जनश्रेष्ठानें. २१ धृतराष्ट्राचें मन. २२ अभिमान हेंच धन (द्रव्य, प्रियवस्तु) ज्याचें तो. २३ जिंकण्यास कठिण अशा शत्रूतें. २४ बोलावलें तर मागें फिरावयाचें नाहीं.

न मृषा[1], द्यूताप्रति अतितर खर[2] म्हणति, न असिप्रति[3] ज्ञाते,' ॥ ४२
खलमणि[4] म्हणे, 'नृपाळा[5] ! दे आज्ञा, श्री हरील शकुनी ती. ।
कां[6] न स्वीकारावी, करिल जरि महारिला वश कु—नीती ?' ॥ ४३
धृतराष्ट्र म्हणे, 'पुसतों विदुराला, तो विवेकराशि कवी ।
मज हित सदा शिकवितो, जेविं बृहस्पति सुरेश्वरा[7] शिकवी.' ॥ ४४
भरतकुळकलंक[8] म्हणे, 'मोडील विदुर विचार हा केला[9], ।
मग मी मरेन, राया ! कथितों मारूनि उच्च हाकेला. ॥ ४५
तो चि इहांमुत्र सुखद[10] तुज, न प्रिय सुत, जसा प्रिय क्षत्ता[11]; ।
मजमागें राज्य करा दोघे, कोणास हो[12] ! नको सत्ता[13] ?' ॥ ४६
पुत्रप्रियकर[14] राजा[15] आज्ञापुनियां निजानुगां[16] बरवी ।
जींत सहस्र स्तंभ स्वर्णमणिखचित[17] असी सभा करवी. ॥ ४७
आप्तांनीं विदुराला हा कपटद्यूतमंत्र[18] जाणविला, ।
मग त्या धृतराष्ट्रें ही तो बुद्धिसुधासमुद्र[19] आणविला. ॥ ४८
नमुनि कवि[20] म्हणे, 'राया ! न द्यूतविचार हा मला रुचला. ।
त्यजुनि सहकार[21] पिकला[22] पिक[23] लाजेना वरावया कुचला[24] ?' ॥ ४९
अंध म्हणे, 'होवूं दे द्यूतक्रीडाविनोद भावांत, ।

---

१ असत्य. २ अतितीक्ष्ण. ३ खड्गास. ज्ञाते द्यूताप्रति अतितर खर [ असें ] म्हणती, असिप्रति न [म्हणती]—असा अन्वय. ४ दुर्जनश्रेष्ठ. ५ धृतराष्ट्रा. ६ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ७ इंद्राला. ८ भरताच्या वंशाला डाग लावणारा दुर्योधन. (सभापर्व—अ० ४९ श्लो० ४५—४६). ९ केला=केलेला. हें विचाराचें विशेषण. 'केला' ह्या रूपाचा प्रयोग गद्यात्मक ग्रंथांत भूतकालवाचक क्रियापद म्हणून होतो. तथापि तें मूळचें विशेषण असून त्याचा उपयोग कवितेंत अनेक स्थळीं विशेषणासारखाच केलेला आढळतो. पुढें गीति ४९ मधील 'पिकला सहकार' हा प्रयोगही अशाच प्रकारचा आहे. १० मृत्यु व स्वर्ग या लोकीं सुख देणारा. ११ विदुर. १२ 'ही' असा पाठभेद. १३ अधिकार. येथें 'सत्ता कोणास नको असते ?' ह्या सामान्य वचनानें 'मजमागें दोघे राज्य करा' ह्या विशेष वचनाचें समर्थन केलें आहे, म्हणून हा **'अर्थान्तरन्यास'**नामक अलंकार झाला. १४ सुताचें (दुर्योधनाचें) प्रिय करणारा. १५ धृतराष्ट्र. १६ स्वसेवकांस. १७ सुवर्णरत्नमंडित. १८ कपटानें फांसे टाकून द्यूतांत पांडवांस जिंकावें, हा विचार. १९ बुद्धिरूप अमृताचा सागर (विदुर). २० विदुर. २१ आंबा. २२ पिकलेला, पक्व. पिकला सहकार त्यजुनि कुचला वरावया पिक लाजेना? (लाजत नाहीं काय ?)—असा अन्वय. अर्थात्—लाजतो; काजऱ्याचा स्वीकार करीत नाहीं—असा इंगितार्थ. २३ कोकिळ. २४ काजऱ्याचें फळ. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. हा दाखला मूळ ग्रंथांत नाहीं.

[1]अस्मन्निकट तयांच्या न शिरेल [2]दुराग्रह स्वभावांत. ॥ ५०
मी, तूं, **द्रोण**, [3]नंदीसुत बैसों जेथें समर्थ, घात कसें ।
द्यूत करील ? [5]शमेल **श्रीराम**गुणांसमक्ष पातकसें. ॥ ५१
[6]होणें होतें, साधो ! चित्त तुझें ही न काळजी वाहो, ।
ज्याचें आचरण जसें, त्या तैसा फलद काळ जीवा[7] हो'. ॥ ५२
[8]क्षम हि [9]बुधोक्त न रुचलें, रुचलें [10]बालोक्त [11]अक्षम हि, [12]म्यां तें ।
काय वदावें ? भुलला [13]दोषज्ञ हि भूप [14]अक्षमहिम्यातें. ॥ ५३
'**धर्मा**सि [15]सुहृतें-द्यूत-क्रीडार्थ क्षिप्र आण जा, **विदुरा** !' ।
ऐसें [16]वदे वचन, तें [17]कविहृदयासि च न, कांपवी [18]भिदुरा. ॥ ५४
[19]असकृद्धितोपदेशें **विदुर** न शकला नृपासि वळवाया, ।
कीं, तो पुत्रस्नेहें झाला सिद्ध स्वकीर्ति मळवाया ! ॥ ५५
जो [20]पोकळ वळवाया स्वमनास हि न शकला, [21]तया खळ तो ।
[22]सिकतासेतूस [23]महाबळतोयमहौघसा कसा वळतो ? ॥ ५६
**धर्मा**सि निरोप [24]**ह**रिप्रस्थीं [25]कटु केवळ [26]स्व [26]भावाचा, ।

---

१ आमच्या ( धृतराष्ट्रद्रोणभीष्मादिकांच्या ) सान्निध्यांत २ दुर्बुद्धि. ३ आपगेय, भीष्म. ४ जेथें आपण समर्थ (अधिकारी, वडील माणसें) बसूं तेथें द्यूत घात कसें करील ? (करणार नाहीं–असा **भावार्थ**). ५ शांत होईल, विकोपास जाणार नाहीं. ह्याचा कर्ता 'द्यूत'. (हें नाम संस्कृतांत पुल्लिंगीं व नपुंसकलिंगी आहे). द्यूत घातक होणार नाहीं–असा भावार्थ. ६ जें व्हावयाचें तें, जें दिष्ट आहे तें. ७ प्राण्याला. ८ समर्थ, हितकर. 'क्षमं शक्ते हिते त्रिषु' इत्यमरः. ९ ज्ञात्याचें भाषण, विदुराचें सांगणें. १० मूर्खांचें भाषण. ११ असमर्थ, अहितकर. १२ मीं=मोरोपंतानें (कवीनें). १३ विद्वान् (द्यूतापासून उत्पन्न होणारे दोष जाणणारा) असा धृतराष्ट्र राजा. १४ द्यूताच्या प्रभावाला. अक्ष=फांसे. १५ मित्रांशीं द्यूतक्रीडा करण्याकरितां. १६ 'वदे' याचा कर्ता 'धृतराष्ट्र' (अध्याहृत). १७ ज्ञात्याच्या हृदयालाच कांपवी असें नाहीं, तर वज्रालाही कांपवी–असा भावार्थ. येथें वस्तुस्थितीपेक्षां फारच अधिक वर्णन केलेलें आहे, म्हणून हा '**अतिशयोक्ति**' अलंकार समजावा. १८ वज्राला. १९ वारंवार हितोपदेश केला असतांही. २० पोंचट, अजागळ, मेषपात्र. हें धृतराष्ट्राचें विशेषण. २१ धृतराष्ट्राला. २२ वाळूच्या बांधास. २३ खळाळीच्या पाण्याच्या मोठ्या ओघासारखा. येथील **उपमा** कार्याचें दुर्घटत्व दर्शविते. २४ इंद्रप्रस्थीं. इंद्रप्रस्थ (दिल्ली) नामक नगराचे आसपास जें अरण्य होतें, त्याला खांडवप्रस्थ असें नांव होतें. ह्या अरण्यांत धृतराष्ट्राच्या आज्ञेवरून पांडवांनीं शहर वसविलें; तें अत्यंत सुशोभित होतें म्हणून त्यास 'इंद्रप्रस्थ' व 'शक्रप्रस्थ' असें म्हणूं लागले. (हरि=इंद्र, हरिप्रस्थ=इंद्रप्रस्थ). २५ कडू. २६ आपल्या भावाचा (धृतराष्ट्राचा).

[1]चिंताम्लानच्छविनें [1]कविनें कथिला [2]चळ-स्वभावाचा. ॥ ५७
जी [3]पतिदत्त गर[4]ळरस आणुनि पाजी सुतों[5] [6]कयाधू ती, ।
ही विदुररीति हि [7]सख्या, दोघींच्या[8] अपयशा दया धूती. ॥ ५८
धर्म म्हणे, '[9]बापाजी ! [10]ऐसें म्हणतात काय हो तात ? ।
बहु उत्तम, [11]वचनकरा [12]तारक गुरुचे चि पाय होतात. ॥ ५९
गमले तुम्हांपरिस ते [13]कितव हित [14]वसुंधरावरा कांहीं, ।
जाणों तुम्हीं बुडविली श्री, उद्धरिजेल त्या [15]वराकांहीं ! ॥ ६०
न [16]विचक्षण [17]हित [18]मानी [19]दर्शितनवपुष्टिगुणभरा रोगां[19], ।
[20]नवकितवसचिवमंत्रें तरि [21]कुरुगुरुभाग्य बहु [22]भरारो गा ! ॥ ६१
चाला, अवश्य येतों, [23]भावि चुकेना चि जें [24]भलें [24]खोटें, ।
अयश पुन्हा वृद्धपणीं [25]गुरुचें होईल, दुःख हें मोटें. ॥ ६२

---

१ चिंतेमुळें म्लान झाली आहे मुखकांति ज्याची अशा कवीनें (विदुरानें). २ चंचल स्वभाव ज्याचा अशा भावाचा. चलस्वभावाचा स्व-भावाचा केवळ कडु निरोप चिंताम्लानच्छविनें कविनें हरिप्रस्थीं धर्मासि कथिला—असा अन्वय. ३ पतीनें (हिरण्यकशिपूनें) दिलेला. ४ विषरस. ५ पुत्राला (प्रह्लादाला). प्रह्लाद हा हिरण्यकशिपूस कयाधूपासून झालेला ज्येष्ठ पुत्र. हा जन्मापासून भगवन्निष्ठ व विष्णूचा उपासक असल्यामुळें हिरण्यकशिपूनें ह्याचा फार छळ केला. परंतु पुढें प्रह्लादाच्या सेवेनें प्रसन्न होऊन विष्णूनें नारसिंहाचा अवतार धारण केला व हिरण्यकशिपूस मारिलें—अशी कथा आहे. (भागवत, स्कंध ७ अध्याय १–१०). ६ हिरण्यकशिपुभार्या. ७ कयाधू व विदुररीति ह्या दोघी एकमेकींच्या सख्या (मैत्रिणी) होत. ८ [कयाधूची पुत्रविषयक व विदुररीतीची धर्मादिपांडवविषयक] दया त्या दोघींच्या [अकृत्य केल्यामुळें आलेल्या] अयशा (दोषा) धूती (धुवून टाकिते, नाहींशी करिते). ९ हे विदुरा. १० द्यूत खेळावें असें तात (धृतराष्ट्र) म्हणतात काय ? ११ गुरूची आज्ञा पालन करणाऱ्यास. १२ संरक्षक. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १३ ते ठक. अक्षक्रीडानिपुण शकुनि, विविंशति, पुरुमित्र इत्यादि लबाड पुरुष धृतराष्ट्रराजाला तुमच्यापेक्षां हितकर गमले—असा भाव. १४ पृथ्वीपतीला (धृतराष्ट्राला). १५ नीचांनीं. हें भाषण औपरोधिक आहे. १६ ज्ञाता, पंडित. १७ हितकर. १८ गणी. १९ दाखविला आहे पुष्टतेचा भर (पुष्टिगुणातिशय=लठ्ठपणा) ज्यानें, अशा सूज इत्यादि रोगास. २० नवीन दुष्ट मंत्र्यांच्या मसलतीनें. २१ धृतराष्ट्राचें दैव. २२ उत्कर्ष पावो. २३ पुढें होणारें. कल्पनासादृश्यः—'को नाम पाकाभिमुखस्य जन्तोर्द्वाराणि दैवस्य पिधातुमीष्टे ॥' (भवभूतिकृत उत्तररामचरित, अंक ७।४) याचें कै० परशरामपंत तात्या गोडबोले यांनीं केलेलें भाषांतर—(आर्या) दुर्दैव दुर्विपाका द्याया जंतूस जैं उभें राहे । त्याचा हात धराया सृष्टींत समर्थ कोण हो ! आहे ? ॥. २४ भलें=चांगलें, इष्ट. खोटें=वाईट, अनिष्ट. २५ धृतराष्ट्राचें.

खमीं हि अनय[1] न घडो, अपकीर्ति नसो, असें असेल मनीं, ।
तरि तारील जगत्पति[2] मज, सालस[3] जरी नसेन तन्नमनीं[4]. ॥ ६३
युद्धास द्यूतास हि जावें, 'नाहीं' म्हणों नये, बा ! हे ।
माझी अशी प्रतिज्ञा सत्या अत्यादरोचिता[5] आहे.' ॥ ६४
ऐसें वदोनि राजा सकुटुंब निघोनि गजपुरा[6] आला; ।
त्याला[7] पाहुनि आप्तां थोडा, बहु हर्ष दुर्जनां झाला. ॥ ६५

---

## अध्याय चवथा[8]

दुसरे[9] दिवशीं नेले पांडुसुत न[10]व्या सभेंत बाहून[11] ।
शकुनि म्हणे, 'खेळों या;' धर्म म्हणे, 'अधिक काय याहून[12] ?' ॥ १
भीष्म[13] द्रोण विदुर कृप धृतराष्ट्र सकर्ण जे शतभ्राते ।
खळ[14] होते, साधूंचा करणार बळें सभेंत बभ्रा[15] [16]ते. ॥ २
कपटद्यूतीं लावी प्रथम चि तो साधुगीतकथ[17] रथ रे ! ।
तों शकुनि म्हणे, 'जितिला.' तैं थोड्यांचें चि चित्त न[18] थरथरे. ॥ ३

---

१ अन्याय, अनीति. २ कृष्ण, ईश्वर, ३ स+अलस=आळशी. ४ त्याच्या (ईश्वराच्या) नमनाविषयीं. ५ मोठ्या सत्कारास योग्य. ६ हस्तिनापुराला. ७ धर्मराजाला. ह्या गीत्यर्धांत '**विरोध**' अथवा '**विरोधाभास**' नामक अलंकार आहे. जेथें एका पदार्थावर विरुद्ध अशा एक किंवा अनेक धर्मांचा आरोप केलेला असतो, तेथें '**विरोध**'नामक अलंकार होतो. येथें धर्मराजाच्या येण्यामुळें आप्त व दुर्जन यांवर निरनिराळे आरोप केले आहेत, म्हणून हा '**विरोधा**'लंकार समजावा. ८ या अध्यायांत मूळांतील ५९–६६ ह्या व ६७ व्या अध्यायाचा कांहीं भाग यांतील कथाभाग वर्णिलेला आहे. इतकाच कथाभाग मुक्तेश्वरांनीं आपल्या सभापर्वांच्या १४ व्या अध्यायांत व १५ व्या अध्यायाच्या आरंभींच्या २५ ओंव्यांत म्हणजे सुमारें २०० ओंव्यांत वर्णिला आहे. ९ इंद्रप्रस्थाहून आल्यावर दुसरे दिवशीं. १० धृतराष्ट्रानें नवीन तयार करविलेल्या सभेंत. हिचें नांव 'तोरणस्फटिका' असें होतें. ११ बोलावून. १२ खेळाहून अधिक काय ? पण लावून द्यूत खेळावयाचें काय ?–असा भावार्थ. १३ भीष्म, द्रोण, विदुर, कृप, धृतराष्ट्र [आणि] जे साधूंचा बळें बभ्रा करणार (करणारे) ते सकर्ण खळ शतभ्राते [त्या] सभेंत होते–असा अन्वय. १४ सकर्ण शतभ्राते मात्र खळ होते. (भीष्म, विदुर, द्रोण इत्यादि सज्जन होते. सभापर्व–अ० ६० श्लो० २). १५ उपहास, विटंबना. १६ कर्णासह शंभर बंधु. १७ साधूंनीं गाइल्या आहेत कथा ज्याच्या, असा (धर्म). १८ थोड्यांचेंचि न=पुष्कळांचें.

मग धर्म लक्षदासीपण मांडी; 'जिंकिला' म्हणे शकुनी; ।
कपटें जिंकूं पाहे हंसाला जेंवि दुष्ट [1]बक-शकुनी. ॥ ४
धर्म म्हणे, '[2]छेळ करिसी, [3]मर्यादा त्यजुनि ढाळिसी फांसे; ।
शकुने ! त्यजितां [4]धर्मव्यवहारपथासि, [5]सत्सभा हांसे.' ॥ ५
'कोणा व्यवहारीं छळ नाहीं ? दे धरुनि [6]गजवरा खळगा; ।
भ्यालासि तरि [7]निवर्ते' [8]प्रभुला हि ह्मणे असें चि तो [9]खळ गा ! ॥ ६
राजा म्हणे, "'[10]प्रतिज्ञा माझी 'नाहीं म्हणों नये' असि कीं, ।
त्यागीन तिला कां मी ? [11]यत्त्यागें निष्फळें यशें [12]असिकीं. ॥ ७
[13]देवनकर्ता मजशीं मत्तुल्य सभाग्य कोण गा ! आहे ?" ।
धर्म असें सत्य वदे, तें दुर्मति तो सुयोधन न साहे. ॥ ८
गर्वे [14]म्हणे, 'अहो ! मी [15]मामाला द्यावया धनें, रत्नें ।
आहें समर्थ, [16]देवनसाहित्य करीन सर्वथा यत्नें.' ॥ ९
धर्म म्हणे, 'अन्यासीं अन्याचें द्यूत हें [17]विषम [18]वाटे, ।
ऐसें हि असो, परि परिणामीं भय, सोडितां [19]सु-नय-वाटे'. ॥ १०
मणि, हार, दास, दासी, रथ, हय, गज, [20]कनकनिधि हि [21]तो लावी, ।
जिंकी [22]कपटी जी श्री [23]श्रीदश्रीशीं [24]विशंकें तोलावी. ॥ ११
कपटद्यूत विलोकुनि विदुर म्हणे, 'काय हें अगा ! [25]राया ! ।
कां भ्रमलासि ? स्वकरें अग्नि कसा लाविसी [26]अगारा या ? ॥ १२

---

१ बगळापक्षी. २ कपट. 'छलं तु स्खलिते व्याजे' इति विश्वः. ३ नीतिमार्गाचें उल्लंघन करून. ४ नीतिव्यवहार करण्याच्या मार्गाला. ५ साधुजनांची सभा. ६ मोठ्या हत्तीला खळगा धरून देतो. ७ मागें फीर, खेळ सोडून जा. ८ समर्थ व सदधिकारी अशा धर्मराजाला देखील. ९ दुष्ट शकुनि. येथें सच्छील धर्मराज व दुष्ट शकुनि यांचा संबंध वर्णिला आहे, म्हणून हा 'विषमा'लंकार आहे. जेथें दोन अननुरूप वस्तूंचा संबंध वर्णिलेला असतो, तेथें 'विषमा'लंकार होतो. १० 'आहूतो न निवर्तेयमिति मे व्रतमाहितम्' (अध्याय ५९ श्लोक १८). ११ ज्या प्रतिज्ञेचा त्याग केल्यानें. १२ सर्व, सगळीं. हा शब्द पुढें अ० ५ गी० ६ हींत योजिलेला आहे. १३ द्यूतक्रीडा करणारा. १४ सुयोधन म्हणे. १५ शकुनीला. हा दुर्योधनाचा मामा कपटद्यूतांत फार निपुण होता. १६ द्यूतक्रीडा करण्याची सामग्री. १७ अन्याय्य, पक्षपाती, विलक्षण. १८ भासतें. १९ सुनीतिमार्गातें. २० सुवर्णराशि. २१ धर्मराज. लावी=पणाला लावी. २२ शकुनि. २३ कुबेराच्या संपत्तीशीं. २४ निःसंशय. २५ हे धृतराष्ट्रा. २६ गृहाला. हें पंतांच्या ठरींव यमकांपैकीं एक आहे. (आदिपर्व-अध्याय ३४।४;३८।२९ पद्य.)

मद्वाक्य तुला न रुचे मरणारा[1] अगदसें[2] अगा बापा ! ।
पुत्र[3] कसें म्हणसी या, नरकीं नेत्या सविग्रहा[4] पापा ! ॥ १३
कोल्हा चि पाळिला त्वां आरडला उपजतां चि जंबुकसा[5]. ।
श्रीदं[6] त्यजिले, वरिला अदक्षिणावर्त[7] तुच्छ कंबु[8] कसा ? ॥ १४
मधुतें[9] चि मूढ[10] पाहे, पाहत[11] नाहीं परि प्रपातातें[12]; ।
त्वां घातली **कुरुकुळीं** द्यूतविषमयी[13] बरि प्रपा[14] तातें ॥ १५
त्यजिले खल सुत कविंनीं[15] पाहुनि तत्संग्रहांत[16] अत्याग[17], ।
न्याय्य[18] त्याग अशांचा, केवळ अन्याय्य होय अ-त्याग[19]. ॥ १६
**भोजकुळीं कंस**, तसा या हि **कुरुकुळीं** कळंक हां[20] राया ! ।
नांदोत ज्ञाति[21] सुखें, दे आज्ञा पामरासि[22] माराया. ॥ १७

---

१ मरणाऱ्या मनुष्याला. हें 'मरणार' ह्या शब्दाचें चतुर्थ्यर्थी सामान्यरूप. ह्याच दृष्टांत मूळांतही आहे. (अध्याय ६२ श्लोक २). २ औषधासारखें. ३ पुत्र=जो आपल्या बापास पुन्नामक नरकापासून तारतो तो. [याविषयीं मनुवचन आहे तें असें-'पुन्नाम्नो नरकाद्यस्मात्त्रायते पितरं सुतः । तस्मात्पुत्र इति प्रोक्तः स्वयमेव स्वयंभुवा. ॥' (मनुस्मृति, अध्याय ९।१३८). याचा तात्पर्यार्थः-ज्या कारणास्तव पुं नाम नरकापासून मुलगा पित्याचें त्राण (रक्षण) करितो, त्या कारणास्तव स्वतः ब्रह्मदेवानें मुलाला 'पुत्र' असें म्हटलें आहे]. वाल्मीकिरामायणांतही मनुस्मृतींतील हा श्लोक आढळतो. (अयोध्याकांड, सर्ग १०७।१२). दुर्योधनाला पुत्र म्हणणें ठीक नाहीं, कारण तो तुला नरकांत नेणारा प्रत्यक्ष पापाचा पुतळाच आहे-असा भाव. ४ देहधारी, मूर्तिमान् अशा. (विग्रह=शरीर, देह). ५ जंबुक=कोल्हा, गोमायु. दुर्योधन जन्मास आला तेव्हां त्यानें कोल्ह्यासारखा शब्द केला, असें वर्णन आहे. (अध्याय ६२ श्लोक ३). ६ संपत्ति देणारे. ७ अदक्षिणभागीं (डाव्या अंगास) भोंवरा (आवर्त) आहे ज्याचा असा (शंख). दक्षिणावर्त (सव्य मुखाचा शंख, ज्याचें वलन दक्षिणाकृति असून शरीरावर भोंवरे असतात असा) शंख मंगलप्रद व अदक्षिणावर्त शंख अशुभप्रद समजतात. 'होय न तें शंखशतें जें शिव एकें चि दक्षिणावर्तें.' (मोरोपंत-उद्योगपर्व-अध्याय ४।८४). ८ शंख. ९ मधातें. १० मूर्ख मनुष्य. हें वचन शुक्रोक्त नीतींतील आहे. कल्पनासादृश्यः-'मधु देखोनि वळघे कडा । तळीं पात न देखे पुढां । अनर्थ-सर्पीं सूदला वेढा । द्यूतधनाजवळिकें. ॥' [मुक्तेश्वर सभापर्व-अध्याय १४।१०५]. ११ ह्याच दृष्टांत मूळांत आहे. १२ प्रपात=पर्वताचा कडा. (मूढ पर्वताच्या कड्यावरील मध पाहतो, पण कडेलोट होईल हें त्यास समजत नाहीं, असा भाव). कल्पनासादृश्यः-मधु यः केवलं दृष्ट्वा प्रपातं नानुपश्यति । स भ्रष्टो मधुलोभेन शोचत्येवं यथा भवान् ॥ (स्त्रीपर्व-अध्याय १।३७). १३ द्यूत हेंच विष त्यानें भरलेली. १४ पाणपोई. १५ सुज्ञांनीं. १६ त्या दुष्ट पुत्रांचा संग्रह करण्यांत. कल्पनासादृश्यः-'औरस्यानपि पुत्रान्हि त्यजन्त्यहितकारिणः । समर्थान्संप्रगृह्णन्ति जनानपि नराधिपाः ॥' (वाल्मीकिरामायण-अयोध्याकांड, सर्ग ३६।२६). अर्थः-राजे लोक औरस पुत्रांचा, ते अहित करणारे असल्यास, त्याग करितात, आणि समर्थ अशा प्राकृत मनुष्याचाही संग्रह करितात. १७ अति+आग (अपराध)=मोठा अपराध. १८ न्यायी, यथायोग्य. १९ त्याग न करणें. येथील द्विरुक्ति विदुराच्या भाषणांतील कळकळ दर्शविते. २० दुर्योधन. २१ जातभाई व नातेवाईक. २२ क्षुद्रास, नीचास.

तो कृष्ण[1] त्या खळाला, तैसा हा कृष्ण[2] या खळासि[3] वधू, ।
त्याली असंग्रहार्हा[4] म्हण गा भूपा ! अशा मळासि वधू[5]. ॥ १८
देऊनि काक[6], घ्यावे पांच तुवां चित्र[7]-बर्ह-शितिकंठ, ।
घे पंचानन[8] पांच, क्रोष्टा[9] दे, मानवेल शितिकंठ[10]. ॥ १९
राया ! कुलार्थ[11] पुरुष, ग्रामार्थ कुळ हि समस्त सोडावें, ।
ग्राम हि देशार्थ, मही आत्मार्थ; बुधें भलें चि जोडावें[12]. ॥ २०
भाग्यें येउनि बसले स्वर्णष्ठीवी[13] निर्जालयीं[14] पक्षी, ।
आमिष[15]लोभांध परम पामर कोण्ही तशा खगां भक्षी. ॥ २१
मग तळमळे, रडे बहु, [16]तो आपण आपला करुनि घात, ।
तैसें च तुज हि घडतें, हो सावध, आवरीं नृपा ! हात. ॥ २२
धनलोभें नुमजे, परि तूं म्हणसील क्षणक्षणीं मग 'हाँ[17] !' ।
आमिषलोभांध जसा तो पश्चात्तप्त[18] मंदधी खग-हा[19]. ॥ २३

---

१ कंसाला. २ अर्जुन. अर्जुनाला निरनिराळीं दहा नांवें होतीं:-'अर्जुन, फाल्गुन आणि जिष्णु। किरीटी, पांचवें श्वेतवाहनु । बीभत्सु, विजयी, आठवें कृष्णु । सव्यसाची, धनंजय. ॥' (मुक्तेश्वर-कृत विराटपर्व-अध्याय ६।७५). ३ दुर्योधनाला. ४ असंग्राह्य, संग्रह करण्यास अयोग्य अशास. ५ (तुझी) बायको (गांधारी). ६ काकरूपी शंभर पुत्र देऊन पांच मयूर म्हणजे पांच पांडव घे-असा भाव. ७ चित्रविचित्र रंगांचे पिसारे आहेत ज्यांचे असे मोर. बर्ह=मोराचें पीस. ह्या गीतींत 'रूपकातिशयोक्ति' नामक अलंकार आहे. (पुढें गीति ८४ पहा). ८ सिंह. मूळांत 'शार्दूल' असें आहे. ९ कोल्हा (दुर्योधन). १० शंकर. ही अदलाबदल देवाला आवडेल-असा भावार्थ. ११ याविषयीं वचनाधारः-'त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् । ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत्॥' (सभापर्व-अध्याय ६२ श्लोक ११.) याचा अर्थः-एका पुरुषाच्या संग्रहेंकरून जर कुळाचा नाश होत आहे, तर त्याचा त्याग करून कुळाचें रक्षण करावें. एका कुळाच्या योगेंकरून जर ग्राम नाश पावत असेल तर तें कुळ ग्रामांतून काढून लावावें, आणि ग्राम रक्षावा. एका ग्रामामुळें जर देश उच्छिन्न होतो, तर तो ग्राम मोडून टाकावा. जर आत्मा नाश पावतो आहे, तर पृथ्वीचा त्याग करून आत्मरक्षण करावें. जंभासुराच्या त्यागाकरितां शुक्राचार्यांनें जी नीति सर्व असुरांस सांगितली, तींतील हें वचन आहे. ह्या गीतीशीं मोरोपंतकृत उद्योगपर्व-अध्याय ९ गीति ६२ ही अगदीं समानार्थक आहे. १२ ही गीति 'सार' नामक अलंकाराचें उदाहरण होय. जेथें एकाद्या पदार्थाचे गुण क्रमाक्रमानें अधिकाधिक वर्णिले असतात, अथवा त्यांचा उत्तरोत्तर अपकर्ष वर्णिला असतो, तेथें सारनामक अलंकार होतोः=जसें, मधाहून सुधा गोड, सुधेहून काव्य गोड इ०. ह्या अलंकारास 'उदार' असें अन्य नाम आहे. १३ सुवर्ण ओकणारे. १४ आपल्या घरीं. १५ मांसलोभानें अंध असा. १६ तो लोभांध पुरुष. १७ हाय! १८ पश्चात्तापानें पोळलेला. १९ पक्षी मारणारा.

माळाकार[1] तरूचें घेतो फळपुष्पें[2] जेंवि, तेंवि नृपा ! ।
घे पांडुसुतांपासुनि वित्त, असों दे मनांत पूर्ण कृपा. ॥ २४
धनलोभ धरुनि चित्तीं, द्यूतें चरणाश्रितां न गांजावें, ।
त्वां नरकासि न, घेउनि संगें स्वसचिवसुतानुगां[3], जावें. ॥ २५
ऐका, हो ! सर्व तुम्ही या रायाचें करूनि हित वांचा, ।
साधुच्छळें कुळक्षय, कीर्तिश्रीभंग संग कितवांचा[4]. ॥ २६
शकुनि कुनीतिज्ञ[5] कुमति, येथुनि[6] आतां चि या खळा दवडा, ।
हा न भला, बुडवाया शिरला या राजमंदिरीं कवडा[7].' ॥ २७
इत्यादि विदुर बोले तें ऐकुनि ही अचक्षु[8] तो न वळे, ।
दुर्योधन पंचाक्षरिमंत्रें[9] परमोग्र[10]भूतसा खवळे. ॥ २८
जनकाहूनि परम हित, परं[11]—महित[12] ज्ञानसिंधु जो, त्यातें ।
धिक्कारी; उडवी त्या स्वशिवगृहाधारभूत[13] जोत्यांतें[14]. ॥ २९
'विदुरा ! उगा उगा गा ! मेळविलें बुडवितोसि यश कां गा ? ।
कोण तुला पुसतो ? कीं, 'अजि आम्हां नेणत्यां स्वहित सांगा.' ॥ ३०
निपुण असेल निजहितीं, करिल पराचें हि तो चि धीर[15] हित, ।
स्वामिद्रोहरता[16] ! तुज काय कळे ? तूं प्रसिद्ध धी[17]-रहित. ॥ ३१

१ माळी. २ सुवर्णष्ठीवी खगाचा आणि माळाकाराचा दृष्टांत मूळांतून घेतलेला आहे. (अध्याय ६२ श्लोक १३-१६). ३ आपले प्रधान, पुत्र आणि सेवक यांस (अनुग=सेवक). ४ जुगाऱ्यांचा, शठांचा. येथें क्रियापदें अध्याहृत आहेत असें समजून, पुढीलप्रमाणें अन्वय करावा:—साधुच्छळें कुळक्षय [होतो], कितवांचा संग कीर्तिश्रीभंग [करितो]. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ५ कुमार्ग जाणणारा. ६ या राजमंदिरांतून. ७ पक्षिविशेष. 'कवडा' हा शब्द 'कपोत' ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा असें दिसतें. कित्येक पक्षी शुभाशुभसूचक मानिले आहेत. त्यांत कवडा हा पक्षी अशुभसूचक होय. हें पंतांच्या पुढील उल्लेखावरूनही दिसून येतें.—'त्या रंध्रीं शिरला तो, श्रीच्या गेहीं हळूच कलि कवडा.' (वनपर्व, अध्याय ४।९२). कित्येक पक्षी शुभसूचक आणि कित्येक अशुभसूचक मानण्याचा प्रचार आपल्या देशाप्रमाणें इतर देशांतही आढळतो. ८ अंध (धृतराष्ट्र). ९ अंगांतून पिशाच काढण्याच्या पंचाक्षरयुक्त मंत्रानें, मांत्रिकाच्या मंत्रानें. १० अत्यंत भयंकर पिशाच्चासारखा. ११ 'सर्वात्मज्ञानसिंधु जो त्यातें' असाही पाठ आहे. १२ अत्यंत पूज्य. १३ स्वकल्याणरूप गृहास आश्रयभूत जें जोतें त्यातें (विदुराला). १४ चौथऱ्याला. येथें 'स्वशिवगृहाधारभूत' असें 'जोतें' याचें विशेषण योजिलें आहे. पण तें लहानशा मराठी शब्दाला साजण्यासारखें नाहीं. उचित विशेषणांनींच विशेष्याचा अर्थ खुलतो. "विशेषणैः समुचितैर्विशेष्योऽर्थः प्रकाशते" (क्षेमेंद्रकृत औचित्यविचारचर्चा पहा). येथें केवळ यमक साधण्यासाठींच पंतांना अशी शब्दयोजना करावी लागली, असें म्हणावें लागतें. विशेषणें विशेष्यांना साजण्यासारखीं असलीं पाहिजेत, ह्या नियमाकडे पुष्कळदां पंतांनीं काणा डोळा केलेला आढळतो. १५ सुज्ञ, पंडित. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १६ राजद्रोहासक्ता. १७ बुद्धिहीन, अक्कलशून्य.

तूं [1]पोषिलासि [2]सादर सतत जसा आत्म[3]कार्य [4]मत्तातें, ।
निंदिसि सभेंत, दुष्टा! कर्म विसरलासि काय मत्ता! [5]तें. ॥ ३२
[6]अस्मदहितहित इच्छिसि, लाविसि आम्हां [7]दहांत [8]बालिशता, ।
वाचाल [9]कृतघ्न कुटिल भरतकुळीं तूं चि पात्र [10]गालि-शता. ॥ ३३
राजसभेंत वदावें कैसें तें न शिकलासि अभ्यासीं, ।
चतुरपण परम दुर्मिळ, [11]तुज परिचय न घडला चि [11]सभ्यांसीं. ॥ ३४
तुज काय राजनीतिज्ञान? अरे! साप दुखविला साचा. ।
मृत्यु, तसा चि [12]सपत्न हि, कैंचा मग लाभ सुख-विलासाचा? ॥ ३५
[13]शत्रूच्छेद करावा, करितों, कां लावितोसि अन्याया? ।
आम्ही च साहतों, न दुरुक्ति तुझ्या सोसतील अन्या या. ॥ ३६
[14]जों मृदु लागे तों तों दडपी शिशु फार [15]ऊन भातातें, ।
तैसें न करावें त्वां, न [16]बसावें हारवून [17]भा तातें. ॥ ३७
[18]शास्ता एक चि, न दुजा, [19]गर्भीं जीवांसि [20]जो शिकवितो रे! ।
करितों [21]तच्छिक्षित मी, बैस उगा, तूं न होसि कवि [22]तोरें. ॥ ३८
[23]हितशत्रु [24]निकटें न बरा, जा त्यांप्रति [25]दयित जे तुला असती; ।
[26]टांकुनि जाती च बहु प्रेमें जरि सतत सांत्विली अ-[27]सती.' ॥ ३९

---

१ पोशिला गेलास. २ सन्मानपूर्वक. ३ स्वदेह. ४ मत् (माझ्या)+तातें (बापानें)=धृतराष्ट्रानें. ५ तुझें पालनपोषण. ६ असत्+अहित+हित=आमच्या शत्रूंचें कल्याण. ७ चारचौघांत, समाजांत. 'दहा' हा शब्द पंतांनीं अन्यत्र याच अर्थीं योजिला आहे:–'होईन निंद्य दहांत, न सोडवितां श्रीस संजया! परिस.।' (उद्योगपर्व–अध्याय ३।५१). ८ मूर्खपणा. ९ कृतघ्न–केलेल्या उपकारांची फेड अपकारांनीं करणारा.–'घ्न' हा प्रत्यय 'हन्' धातूपासून झालेला आहे. घ्न=घातक, दूर करणारा. १० अपशब्दांच्या शतकाला. ११ सभ्य (प्रतिष्ठित) जनांचा सहवास तुला घडला नाहीं. १२ शत्रु. १३ शत्रु+उच्छेद=शत्रूंचा नाश. १४ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १५ ऊन्ह, कढत, उष्ण. १६ 'वसावें' असा अन्य पाठ आहे. १७ तेज (प्रतिष्ठा, मान). १८ शासनकर्ता. १९ गर्भवासांत. २० निर्माणकर्ता (ब्रह्मदेव). २१ त्या निर्माणकर्त्याच्या प्रेरणेप्रमाणें आचरण. दुर्योधनानें येथें मांडलेला सिद्धांत मान्य केल्यास कोणीच कोणास दोष द्यावयास नको. हा सिद्धांत वांकड्या वाटेनें जाणाऱ्यांना अज्ञानी लोकांस चकविण्याचे कामीं बराच उपयोगी पडतो! २२ गर्वानें. 'तोरा' ह्या शब्दाचें हें तृतीयान्तरूप चिंतनीय आहे. 'एं' हा तृतीयेचा प्रत्यय अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी नामांस कवितेंत मात्र लागतो, असा नियम आहे. परंतु मोरोपंतांनीं हा प्रत्यय येथें 'तोरा' ह्या आकारान्त नामास लाविला आहे. असेंच 'घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें' (केकावलि, श्लोक ४०) ह्या ठिकाणीं पांखरूं ह्या ऊंकारान्त नपुंसकलिंगी नामाचें तृतीयान्तरूप 'पांखरें' असें पंतांनीं केलें आहे. तसेंच 'नातू' ह्याचें 'नातें' (नातवानें) असें रूप द्रोणपर्व–अध्याय ३।९९ येथें आढळतें. २३ बाह्यतः मित्र (हित करणारा) असून अंतर्यामीं शत्रु, हित न करणारा, अनिष्टचिंतक. २४ समीप. २५ प्रिय. २६ हाच दृष्टांत मूळांत योजिला आहे. (सभापर्व–अध्याय ६४ श्लोक ११). हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २७ जारिणी. हें यमक मागें अ० १ गीति ६१ हींतही आहे.

विदुर म्हणे, 'न धरील श्रोत्रिय[1]वचनें सदाचरण कुलटा[2], ।
टाकवितां दुर्व्यसन, द्वेषें इच्छील घात ती उलटा. ॥ ४०
बोध प्रगल्भ[3] हा जरि न करायाचा स्वधर्महानि बरा, ।
परि कुरुवरमति[4] नें[5] वैरी, नवरी[6] जैशी वरा[7] महानिबरा[8]. ॥ ४१
अप्रिय[9] परि पथ्य असें[10] वक्ता श्रोता हि दुर्लभ स्पष्ट, ।
बहु सुलभ प्रियं[11] वदते[11] वाढविती, चुकविती न ते[12] कष्ट. ॥ ४२
सुप्तव्याघ्रासि[13] नको लावूं दाटूनि शृंगें[14], परिणामीं ।
संकट पडेल, म्हणतों काय अहित हें मदांधहरिणा[15] ! मीं ? ॥ ४३
स्पष्ट हित अहित कथिता जो होय सहाय तो चि रायास, ।
प्रियंवाक्[16] नर कीं नरकीं भोगवितो भोगितो चिरायास[17]. ॥ ४४
सदय हितकाम[18] जो त्या असमंजस[19] कर्म पाहवेना गा ! ।
कैसें लावूं द्यावें पद, ज्या लंघन[20] न साहवे नागा[21] ? ॥ ४५
भ्रातृहितेच्छु[22] बिभीषण पावे धिक्कार कीं परम हा[23] ही. ।

१ वेदाध्ययन करणाऱ्याच्या भाषणानें. श्रोत्रियाची स्त्री दुष्ट झाली असतां घरांत ठेवण्यास योग्य होत नाहीं, असें वर्णन मूळांत आहे. (अध्याय ६४ श्लोक १४). २ जारिणी स्त्री. ३ प्रौढ, पोक्त. ४ कुरुकुलश्रेष्ठाची (दुर्योधनाची) बुद्धि. ५ पसंत न करी. ६ वधू, कुमारी. हा दृष्टांत पंतकालीन समाजस्थिति दर्शवितो, असें म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. पेशवाईंत बालविवाह-पद्धतीच रूढ होती. ७ पतीला. ८ अतिप्रौढा. (म्हाताऱ्यास, साठ वर्षांच्या वृद्धास). हाच दृष्टांत मूळांत आहे. ९ 'लभ्यते खलु पापीयान्नरो नु प्रियवागिह । अप्रियस्य हि पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः' ॥ (सभापर्व-अध्याय ६४ श्लोक १६). भावार्थः-मधुर बोलणारा व पापप्रवर्तक असा पुरुष अनायासें सांपडेल, परंतु न आवडणारें तथापि हितप्रद वचन बोलणारा व तें ऐकणारा विरळा. १० 'असो' असाही पाठ आढळतो. ह्या पंक्तीशीं समानार्थक पद्यांशः-'हितं मनोहारि च दुर्लभं वचः ।' (किराता-र्जुनीय-सर्ग १।४). ११ प्रिय भाषण करणारे. आदर्शप्रतींत ह्या ठिकाणीं 'प्रियंवद ते' असा पाठ होता. पण त्या पाठांतील 'प्रि' ह्या जोडाक्षरापूर्वीं आलेल्या 'भ' ह्या वर्णाला गुरुत्व येऊन तृतीय पादांत एक मात्रा ज्यास्त होते. १२ प्रिय वदणारे. ही गीति लिहीत असतां पंतांच्या मनांत रामा-यणांतील पुढील श्लोक घोळत होता असें दिसतें:-'सुलभाः पुरुषा राजन्सततं प्रियवादिनः । अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः ॥' (अरण्यकांड, सर्ग ३७।२). १३ निजलेल्या वाघाला. १४ शिंग (हरिणाचें). १५ मदानें अंध झालेल्या हरिणा (दुर्योधना). येथें 'रूपकातिशयोक्ति' अलं-कार आहे. १६ मधुर भाषण करणारा, गोडबोल्या. १७ चिरकाल आयास. ही गीति सुभाषितरूप आहे. १८ हित व्हावें असें इच्छिणारा तो. १९ मूर्खपणाचें. २० गमन, नुसतें जवळून जाणें. २१ सर्पाला. २२ बंधूचें (रावणाचें) हित इच्छिणारा. [राम वनवासांत असतां, रावणानें भिक्षुरूपानें येऊन सीतेचें हरण केलें. पुढें रामास सीता लंकेंत आहे असा शोध लागतांच, तो आपल्या वानर-सेनेसह लंकेस गेला. तेव्हां सीता परत देऊन, रामाशीं सख्य करण्याविषयीं बिभीषणानें रावणास परो-परीनें सांगून पाहिलें. पण रावणानें त्याचें म्हणणें मान्य केलें नाहीं, व त्याची उलट निर्भर्त्सना केली. तेव्हां अखेर रामरावणांचें घनघोर युद्ध झालें व त्यांत रावणाचा पराजय झाला-अशी कथा आहे]. २३ विदुर देखील.

खळ बहु खोटा, त्यासम[1] म्हणति[2] किती कवि भला पर[3] महाही[4]. ॥ ४६

शकुनि म्हणे, 'धर्मा ! त्वां हारविलें धन समस्त कीं आहे ?' ।
या वचनाशि न, पुच्छीं दत्तपदाला[5] भुजंगसा[6], सा[7]हे. ॥ ४७

'काय पुससि रे ! अयुत[8]प्रयुत तथा शंकुपद्म, अर्बुद कीं, ।
खर्वनिखर्व, समुद्र हि पूर्ण[9] धनीं मी, जसा उदधि उदकीं. ॥ ४८

हा ग्लह[10] माझा शकुने ! हूं खेळ; च्छळ नको करूं होगा[11], ।
कपटें यमदूतवृकव्याघ्रांमध्यें न कोकरूं हो गा !' ॥ ४९

ऐकुनि म्हणे 'जितं'[12] तो[13], मत्स्यातें वक जसा, खळ पणातें[14] ।
ग्रासी, उपमाचि नसे दुसरी त्याच्या विशृंखळ[15]-पणातें. ॥ ५०

'वृष[16], हय[17], धेनु, अजाविक[18], हें धन म्यां लाविलें' ह्मणे धर्म. ।
तों तो 'जितं' म्हणे हो ! होय भरतकुळसभेंत हें कर्म ! ॥ ५१

'वर्जुनि विप्रधन[19], सकळ पुरजनपदभू[20] अविप्रपुरुष[21] असें ।
हें शिष्ट[22] मद्धन' म्हणे धर्मात्मा[23]; भावि[24] तें चुकेल कसें ? ॥ ५२

---

१ त्या खळासारखा. २ किती कवि त्यासम (खळासम) महाही (सर्प) म्हणती, पर (परंतु, तो महाही सर्प) भला आहे-असा भाव. याशीं समानार्थक श्लोकः-'सर्पदुर्जनयोर्मध्ये वरं सर्पो न दुर्जनः । सर्पो दशति कालेन दुर्जनस्तु पदे पदे ॥' याचा अर्थः-दुर्जन आणि दीर्घद्वेषी सर्प या उभयतांमध्यें सर्प बरा; कां कीं, सर्प कदाचित् कालेंकरून दंश करितो, पण दुर्जन पदोपदीं मर्मच्छेद करितो. एका हिंदी कवीचेंही असेंच पद्य आहेः-खलहु सर्प इन दुहुनमें भलो सर्प, खल नाहीं । सर्प डसत है कालमें खलजन पद पद माहीं ॥. ३ परंतु. ४ महा+अहि=मोठा सर्प. ५ शेंपटीवर दिलेल्या पावलाला. हीच कल्पना पंतांच्या काव्यांत वारंवार आढळतें. (द्रोणपर्व, अध्याय ३।४८; कर्णपर्व, अध्याय ११।२०). ६ सर्पासारखा. ७ ह्याचा कर्ता 'युधिष्ठिर.' ८ 'अयुता'पासून 'निखर्वा'पर्यंत सर्व संख्या आहेत. ९ धनानें परिपूर्ण समुद्र असा मी आहें. ( अ० ६५-श्लो० ३-४ ). जसा उदधि (समुद्र) उदकीं ( पाण्यानें ) [परिपूर्ण असतो] तसा मी धनीं (धनानें) पूर्ण समुद्र (परिपूर्ण भरलेल्या समुद्राप्रमाणें) [आहें]-असा अन्वय. येथील **उपमा** अत्यंत समर्पक आहे. 'पूर्णधनी' असा अन्य पाठ आहे. १० पण, पणास लावण्याचें धन. ११ 'होगा' ह्या कोंकणी शब्दावर 'ढिला, सैल, बलहीन' अशी आदर्शप्रतींत टीप आहे. तीस अनुसरून ह्या गीतीचा अन्वयार्थ पुढीलप्रमाणें करावा, व हें धर्मराजाचें भाषण औपरोधिक आहे असें समजावें. होगा च्छळ करूं नको (च्छळ करण्यांत ढिलाई-कमतरता करूं नको, तुझें कपटाचरण यथेच्छ चालूं दे) [पण] कपटें (ह्या तुझ्या कपटाचरणामुळें) यमदूतवृकव्याघ्रांमध्यें (यमाचे दूत हेच लांडगे व वाघ यांच्याशीं) कोकरूं न हो (कोंकरांप्रमाणें दीन होण्याची पाळी येऊं देऊं नको)-असा भावार्थ. परंतु होगा=ओगा=उगा, उगाच, व्यर्थ-असा अर्थ ज्यास्त सरळ व सुसंबद्ध दिसतो. १२ जिंकिलें. १३ शकुनि. १४ पणास लाविलेल्या धनातें. १५ उद्दामपणातें, दांडगेपणातें. १६ बैल. १७ घोडे. १८ अजा+अविक=शेळ्या व मेंढ्या. १९ ब्राह्मणांचें धन शिवाय करून. २० नगर व देशभूमि. २१ अब्राह्मण-पुरुष; विप्रांवांचून क्षत्रियादिक जन. २२ शिल्लक राहिलेलें (अध्याय ६५ श्लोक ८). २३ धर्मपरायण, धार्मिक (धर्मराज). हें विशेषण साभिप्राय असल्यामुळें येथें '**परिकरा**'लंकार आहे. २४ जें व्हावयाचें तें.

दुर्जन 'जितं' म्हणे हो ! मग सर्व अमूल्य[1] निज-कुमार[2]-मणी ।
द्यूतीं लावी, जिंकी त्या नियति[3], जसी हरा[4] उमा[5] रमणी. ॥ ५३
मग **धर्म** वदे, 'सिंहस्कंध[6] युवा[7] श्याम[8] दीर्घभुज **नकुळ**, ।
हें माझें धन, जेणें 'धन्य' म्हणे **कुरुकुळासि** सु-जन[9]-कुळ.' ॥ ५४
'इदंमपि धनं जितं ते'[10] **शकुनि** म्हणे, दीप्तपावक[11] पटानें[12] ।
वांधी मणिभ्रमें[13], बहु फुगला मलिनस्वभाव[14] कपटानें. ॥ ५५
**धर्म** म्हणे, 'गा **शकुने** ! न कुनेत्रें[15] जाय रूप[16], कुज्ञानें[17]; ।
ज्ञानासि लोचनाहुनि फार जपावें म्हणोनि सुज्ञानें[18]. ॥ ५६
सद्गुणमंडित पंडित दंडि-तपस्वीड्य[19] सद्विवेक[20]-पिता ।
**स**हदेव ग्लह[21] माझा, स्वप्नीं हि न यन्मना[22] सिवे कपितां[23].' ॥ ५७
'त्वद्बंधुरत्न हें ही द्यूतीं म्यां जिंकिलें' **म्हणे शकुनी.** ।
साहे[24] महापराध हि, दंड खळाला करावया शकुनी[25]. ॥ ५८
'ग्लह[26] केले **माद्रीसुत**; परि आतां परम कठिन वाटेल, ।
सोदर[27]**भीम**ध**नं**जयपण करितां कंठ फार दाटेल'. ॥ ५९
**धर्म म्हणे**, 'मी म्हणतों मूर्तिधर[28] बहिश्चर[29] ख[30] असु[30] यांतें; ।
**शकुने** ! परुषोक्तीतें[31] भ्याल्या श्रुति[32], कांपतील[33] न[33] सुयांतें. ॥ ६०

---

१ अत्यंत मौल्यवान्. (पृष्ठ १३ टीप १६ पहा). २ राजकुमार आणि त्यांचीं महार्ह भूषणें. ३ दैव. ४ शंकराला. ५ एकदां शंकर व पार्वती हीं सारीपाट खेळत असतां भोळ्या शंकराला पार्वतीनें सर्व डावांत जिंकिलें. तेव्हां शंकर रागावून अरण्यांत गेले-अशी कथा आहे. [अनेककविकृत लघुकाव्यमाला-भाग १, मुकुंदकविकृत सारीपाटकथा पहा]. ६ सिंहासारखे खांदे ज्याचे असा. ७ तरुण. ८ कृष्णवर्ण. ९ सुजनांचा समुदाय. १० हेंही तुझें धन जिंकिलें. ११ प्रज्वलित अग्नि. १२ वस्त्रानें. १३ रत्नाच्या भ्रांतीनें. १४ दुष्ट स्वभाव ज्याचा तो (शकुनि). १५ वाईट लोचनानें. येथें '**परिसंख्या**' नामक अलंकार आहे. कारण सौंदर्य कमी होण्यास सामान्यतः ज्या गोष्टींची आवश्यकता असते, त्यांपैकीं येथें फक्त एकीचें (कुज्ञानाचें) ग्रहण केलें आहे. १६ शोभा, सौंदर्य. १७ कुत्सित ज्ञानानें मनुष्याचें रूप बिघडतें. १८ ज्यास उत्तम ज्ञान आहे त्या मनुष्यानें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १९ संन्यासी व तपस्वी यांहीं स्तुत. (ईड्य=स्तवनयोग्य, स्तुत्य). २० सद्विचारांचा जनक. २१ पणास लावण्याचें द्रव्य. २२ ज्याच्या (सहदेवाच्या) अंतःकरणास. २३ मर्कटचेष्टा (थट्टामस्करी). २४ (धर्मराज) खळाला दंड करावया शकुनी (समर्थ असून) महापराध साहे (सहन करी)-असा अन्वय. २५ समर्थ असून. २६ शकुनि म्हणतो. २७ सहोदर भाऊ भीम आणि अर्जुन यांचा पण. २८ देहधारी. २९ शरीराबाहेर फिरणारे. ३० माझे प्राण. ३१ कठोर शब्दांस. ३२ कान. ह्या अर्धांत '**परिसंख्या**'लंकार आहे. जेथें अनेक सारख्या वस्तूंमधून एकीचें ग्रहण करून बाकीच्यांचा स्पष्ट किंवा गर्भित त्याग केलेला असतो, तेथें '**परिसंख्या**' अलंकार होतो. ३३ न भितील, कंपायमान न होतील.

सर्व अनिष्ट करावें शकुने ! त्वां कीं परें हि अंत-रतें[1] ।
परि न वदावें बंधुप्रेमीं जेणें पडेल अंतर[2] तें.' ॥ ६१
**श**कुनि म्हणे, '**कौं**तेया[3] ! द्यूतीं कितवप्रलाप बहुतर, ते[4] ।
वदते हितें[5] मितें[6], कितव-व्यसनीं बुडते कशास ? बहु तरते. ॥ ६२
ज्येष्ठ[7] श्रेष्ठ[8] नृपा ! तूं न धरावे बोल हे मनीं कांहीं; ।
द्यूतीं[9] बहु कितवांहीं बडबडिजे, संगरीं अनीकांहीं[10].' ॥ ६३
**ध**र्म म्हणे, 'ग्लह केला **अ**र्जुन, जरि योग्य हा न या[11] कामीं[11]; ।
**श**कुने ! याच्या तेजें[12] झालोंसें विदित[13] फार नाकीं[14] मीं.' ॥ ६४
'तो जिंकिला' म्हणे खळ, बसला मूळींच नागवायाला[15], ।
कीं भेटला कपटमिष साक्षात् कोल्हा[16] चि नागवा[16] याला[17]. ॥ ६५
**ध**र्म म्हणे, 'पण केला आतां, ज्याच्या **कृ**तांत[18] भी महिम्या[19]; ।
अमितबल[20] सन्नतभ्रू[21] तिर्यक्प्रेक्षी[22] गदींद्र[23] **भी**म हि म्यां.' ॥ ६६
**श**कुनि म्हणे, 'या हि पणा जिंकुनि, पणविजयतत्पर[24] मदक्ष[25] ।
**ध**र्मा ! ग्लहांतराची[26] वाट पहाताति हे परम दक्ष[27]. ॥ ६७
सुत बंधु हि हारविले, उरलें धन काय गा ! पणास हितें[28] ?' ।
**ध**र्म म्हणे 'मी द्यूतीं[29] बुडवीं सर्वस्व[30] आपणासहित.' ॥ ६८
**ध**र्मास हि जिंकी खळ कपटजयें, परम अक्षम[31] हि मातें[32], ।
जे व्यसन टाकणारे बुध हा ऐकोत अक्षमहिमा[33] ते. ॥ ६९

---

१ नाशाविषयीं तत्पर अशानें. २ वैमत्य. परस्पर मतभेद होईल असें न वदावें, असा भावार्थ. ३ जुगारी लोकांची बडबड. ४ कितव, द्यूत खेळणारे. ५ हितकारक, चांगलें. ६ थोडें, बेताचें. ७ वयानें अधिक, वडील. ८ वरिष्ठ, गुणांनीं थोर. ९ 'द्यूतीं कितवमुखांनीं बडबडिजे' असाही पाठ आहे. १० सैन्यांनीं. ११ ह्या द्यूतांत पणास लावण्याचे कामास. १२ पराक्रमामुळें. १३ प्रसिद्ध, प्रख्यात. १४ स्वर्गाला. १५ फसविण्यासाठीं, लुटावयाकरितां. १६ एकाद्याला अचानक कांहीं लाभ झाल्यास त्यास नागवा कोल्हा भेटला, असें म्हणण्याचा भाषणसांप्रदाय आहे. कोल्ह्याचें शेंपूट मोठें व केंसाळ असून जमिनीपर्यंत लोंबत असतें. तें कुत्र्याच्या शेंपटाप्रमाणें वर वळलेलें नसतें. तेव्हां 'नागवा कोल्हा' ही अद्भुत गोष्ट आहे व ती दृष्टीस पडणें हें बहुभाग्याचें लक्षण मानिलें आहे. '*** सवाशीण' हा भाषाप्रयोगही याच अर्थीं करितात. १७ शकुनीला. १८ यम. १९ पराक्रमाला, मोठेपणाला. २० अमर्याद सामर्थ्य ज्याचें असा. २१ खालीं चांगल्या वळलेल्या (कमानदार) आहेत भिंवया ज्याच्या असा. २२ वक्रदृष्टीनें पहाणारा. २३ गदाधरांमध्यें श्रेष्ठ. २४ पण जिंकण्याविषयीं दक्ष. २५ मत्+अक्ष=माझे फांसे. २६ दुसऱ्या पणाची. २७ निपुण, कुशल. २८ उपयुक्त. २९ 'द्यूतीं बुडविन' असें पाठांतर. ३० सर्व धन. ३१ असमर्थ. ३२ माजे, उन्मत्त होई. ३३ फांशांचा पराक्रम. (फांसे खेळण्याचा परिणाम).

शकुनि म्हणे, 'चुकलासि, ग्लहयोग्य हि संग्रहीं असोनि धन, ।
जिंकोनि घेतलें कां ? समयीं चुकणें नसो, असो नि[1]धन. ॥ ७०

घे आपणासि राया ! सोडवुनि, द्रौपदीस [2]लाव [3]कसा ।
श्रीचा कैवारी नृप धन्य, स्त्रीचा सदैव [4]लावक-सा.' ॥ ७१

धर्म म्हणे, 'शकुने ! जी [5]रूपें श्री[6]ला, क्षमागुणें [7]महिला ।
साजे सखी, [8]अखिन्ना कृत्यभरें, सुमति आमुची [9]महिला; ॥ ७२

[10]शरदुत्पलपत्राक्षी [11]शरदुत्पलपुण्यगंधसमगंधा, ।
[12]अस्खलित चालवी गृहधर्मीं मज, [13]यष्टि जसि [14]पथीं अंधा; ॥ ७३

आली [15]मखवेदीच्या जी [16]द्रुपदसुकृतभरास्तव [17]कुशीला, ।
वाटो वरा [18]सु-शीला, वाटेल न हा वरा [19]स्तव [20]कु-शीला; ॥ ७४

---

१ मृत्यु. येथें 'व्यतिरेक' व 'अनुज्ञा' ह्या अलंकारांचा संकर आहे. २ पणास लाव—असा भावार्थ. ३ 'कसा' ह्या शब्दानें शकुनीची आतुरता स्पष्ट होते. कसा लाव=कसाला लावून पाहा, कसोटीला उतरते किंवा नाहीं, हें पहा—असा अर्थ कोणी कोणी करितात. ४ लावकपक्ष्यासारखा. स्त्रीचा (कैवारी नृप) लावकसा—लावापक्ष्यासारखा (होय). हा पक्षी आपल्या मादीविषयीं फार लंपट असतो, असा समज आहे. तात्पर्य, तूं आपला व संपत्तीचा नाश करून स्त्रीचें रक्षण केलेंस म्हणून तूं स्त्रीलंपट आहेस. (नवनीत). ५ लावण्यानें. ६ लक्ष्मीला. ७ पृथ्वीला. ८ आनंदित, खेदरहित. ९ स्त्री. १० शरदृतूंतील कमलपत्रासारखे नेत्र जीचे अशी. (अध्याय ६५ श्लोक ३४ पहा). उत्पल=कमल. ११ शरदृतूंतील जें कमल त्याच्या पवित्र सुगंधाशीं तुल्य गंध जीचा अशी. १२ पतन पावल्याशिवाय, बिनचूक, सुरक्षितपणें. १३ काठी. 'यष्टि तसि पथीं अंधा' असें पाठांतर. १४ मार्गांत, वाटेंत. १५ यज्ञकुंडाच्या. वेदि=अग्निहोत्र, यज्ञ इत्यादिकांकरितां डमरूच्या आकाराप्रमाणें केलेली जी भूमि ती. १६ द्रुपदराजाच्या पुण्यातिशयामुळें. सुकृत=पुण्य. १७ उदरास, पोटीं द्रौपदी ही पांचालकुलोत्पन्न द्रुपदराजाची कन्या. ही द्रुपदराजाच्या यज्ञांत शचीच्या अंशानें अग्नींतून निर्माण झाली होती. [द्रुपदराजा व द्रोणाचार्य हे दोघे गुरुबंधु असल्यामुळें द्रोणाचार्य एकदां द्रुपदाकडे कांहीं याचना करण्याकरितां गेले. तेव्हां द्रुपदानें मदांधपणानें त्यांचा उपहास करून त्यांस कांहीं न देतां परत लाविलें. यावरून द्रोणाचार्यांस फार क्रोध येऊन ते 'मी आपल्या शिष्याच्या हातून याचा पराभव करवीन' अशी प्रतिज्ञा करून निघून गेले. पुढें त्यांनीं आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें कौरवपांडवांस धनुर्विद्या शिकवून, अर्जुनाकडून याचा पराभव करविला व त्यास बांधवून आपणापुढें आणविलें. अशा प्रकारें त्याचा पाणउतारा करून त्याचें अर्धें राज्य घेऊन त्यास सोडून दिलें. ह्या अपमानाचा सूड उगवावा म्हणून 'द्रोणाचार्यांस मारील असा पुत्र आपणास व्हावा' या हेतूनें द्रुपदानें याज नामक ऋषीची सेवा करण्यास सुरवात केली व आपलें मनोगत त्यास कळविलें. त्यास त्या ऋषीनें तसें अनुमोदन देतांच द्रुपदानें त्यास तात्काळ आपल्या नगरास आणिलें. पुढें त्यानें यज्ञ केला असतां अग्निकुंडांतून धनुर्बाणधर असा धृष्टद्युम्न नांवाचा पुत्र व कृष्णा नांवाची कन्या निर्माण झाली—अशी कथा आहे]. १८ सुस्वभावाच्या जनांस. १९ स्तुति. २० दुराचरणी लोकांस.

आधीं जिनें [1]उठावें, पाहुनि निजलों असें मग निजावें, ।
[2]रागेजणें सुदुर्मिळ, तें हि तिचें ज्वाळसें गगनिं जावें; ॥ ७५
धौम्यापासुनि गोपांपर्यंत जिनें स्वयें समाचार ।
घ्यावा, [3]श्रिततापहर श्रीगंगेचा जिचा स[4]माचार; ॥ ७६
[5]ती देवी आतां म्यां या द्यूतीं लाविली, अहाहा ! रे ! ।
[6]छळिसी, द्यूतीं च कसा हा[7]रे ? अन्यत्र कां न हा[8] हारे ?' ॥ ७७
धर्म [9]नयज्ञोत्तम जो द्यूतीं [10]स्वकलत्ररत्न तो लावी. ।
हांसे '[11]जितं' म्हणे खल, कवि हो ! ती गोष्टि काय बोलावी ? ॥ ७८
'धिक् धिक्' [12]सभ्यजन म्हणे, विदुर अधोवदन बैसला [13]उगला. ।
भीष्म द्रोण म्हणति, '[14]हा ! भाच्यांसह शकुनि जयसुखें फुगला.' ॥ ७९

---

१ अध्याय ६५ श्लोक ३७ पहा. २ रागावणें. ती आधीं कधीं रागवावयाची नाहीं, रागावलीच तर तिचा राग अग्निज्वालेप्रमाणें आकाशांत (वरच्या वर) तत्काळ निघून जातो; म्हणजे तिचा रागही तत्काळ नाहींसा होतो. सारांश, त्यापासून कोणास पीडा होत नाहीं–हें तात्पर्य (नवनीत). ३ आश्रितांचा ताप हरणारा. (हें 'समाचार' याचें विशेषण). ४ सारखें आचरण. गीति ७२–७६ ह्या पद्यपंचकांत प्रातःस्मरणीय पंच–कन्यांतील श्रेष्ठ जी द्रौपदी तिचें पंतांनीं जें सुंदर वर्णन केलें आहे, त्याशीं आंग्ल-कविश्रेष्ठ वर्डस्वर्थ कवीच्या उत्तम-स्त्री-प्रशंसापर पंक्ति ताडून पाहण्यासारख्या आहेतः—

A perfect woman nobly plann'd
To warn, to comfort and command;
And yet a spirit still and bright,
with something of an angeeic light.-

भावार्थः—लोकांस सन्मार्ग दाखविणें, त्यांनां सुख देणें, व त्यांच्यावर प्रसंगविशेषीं अधिकार चालविणें, याकरितां परमेश्वरानें सर्वगुणसंपन्न अशी स्त्री निर्माण केली. ती तेजस्वी पण सुशांत असून तिच्यांत दैवी अंश होता. ५ ह्या सर्वनामाचा संबंध मागें गीति ७२ हींतील 'जी'शीं आहे. येथें ७२–७७ गीतींचा अन्वय आहे, म्हणून हें 'कुलका'चें उदाहरण आहे. 'द्वाभ्यां युग्ममिति प्रोक्तं त्रिभिः श्लोकैर्विशेषकम् । कलापकं चतुर्भिः स्यात्तदूर्ध्वं कुलकं स्मृतम् ॥' अर्थ–दोन पद्यांचा संबंध एकत्र असला म्हणजे त्या पद्यद्वयास 'युग्म', तीन पद्यांचा असला तर 'विशेषक', चारांचा असेल तर 'कलापक' आणि पांच किंवा त्यांहून जास्त पद्यांचा असेल तर त्यास 'कुलक' असें म्हणतात. ६ हा अन्यत्र न हारे, द्यूतींच हारे, अतएव छळिसी (कपट करितोस). हा (मी, धर्मराज) दुसऱ्या कोणत्याही गोष्टींत हार (पराभव) पावत नाहीं आणि द्यूतांतच कसा पराभव पावतो? यास्तव तूं माझ्याशीं कपट करीत आहेस–असा भावार्थ. ७ पराभव पावे. ८ हा धर्मराज. ९ नीतिनिपुणांमध्यें श्रेष्ठ. १० उत्तम पत्नी. कलत्र=स्त्री. 'जातौ जातौ यदुत्कृष्टं तद्रत्नमभिधीयते' . 'रत्नं स्वजातिश्रेष्ठेऽपि मणावपि नपुंसकम्'–इति मेदिनी. प्रत्येक जातीच्या वस्तुमात्रांत जी वस्तु उत्तम, तिला 'रत्न' असें म्हणतात. ११ जिंकिलें. १२ सभासदांचा समुदाय. १३ उगाच, स्तब्ध. (अध्याय ६५ श्लोक ४२ पहा). १४ हाय! हाय!

'किं जितमिह[1] ? किं जितमिह ?' ऐसें [2]असकृत् पुसे [3]अचक्षु [4]रसें, ।
रडले सभ्य, तयांच्या हृदयीं तें लागलें [5]वेंच [6]क्षुर-सें. ॥
[7]सखिर्हस्तीं हस्त न [8]वृष, पांडवहृदयांत [10]सायका मारी; ।
क्रोधातें भीम गिळी, [11]गरळातें जेंवि काय [12]कामारी. ॥
[13]अंधसुत म्हणे, 'विदुरा ! कृष्णा दासी सभेसि आणावी, ।
[14]गृहसंमार्जन करणें, हे सेवा तीस योग्य जाणावी.' ॥
[15]विदुर म्हणे, '[16]शस्त्र वधी गिळितां तत्काळ [17]बोकडाला, हें ।
तैसें चि कर्म करिसी, रे [18]मंद ! [19]न मृत्यु रोकडा [19]लाहें. ॥
[20]हरिच्या पुनःपुन्हां कां [21]कांड्या नाकांत घालिसी ? [22]शशका ! ।
[23]यश काय [24]पक्षिपतिचें येइल हे [25]चौर करुनि तुज ? [26]मशका ! ॥
[27]ब्रूयात्क्षमी गभीरोऽसीति बत युधिष्ठिरं प्रभुं को न ? ।

---

१ या डावांत काय जिंकलें? (अध्याय ६५ श्लोक ४३). २ वारंवार. ३ धृतराष्ट्र. ज्यास (नयन) नाहींत तो. ४ गोडीनें, आवडीनें. ५ भाषण. ६ वस्तऱ्यासारखें, तीक्ष्ण. ७ मि दुर्योधन त्याच्या हातावर. ८ 'सखिहस्तीं हस्त न नृप' असाही पाठ आहे. या पाठाचा स्व केल्यास सखिहस्तीं म्हणजे मित्र जो कर्ण त्याच्या हातावर आणि नृप म्हणजे दुर्योधन, समजावें. ९ कर्ण. १० बाणाला. ११ विषातें. १२ शंकर. (यानें समुद्रमंथनसमयीं विष केलें, ही कथा सुप्रसिद्धच आहे). हें '**अपन्हुति**' नामक अलंकाराचें उदाहरण होय. 'ह्या रणांत 'हातावर हात मारणें' ह्याच्या स्वरूपाचा अपलाप करून त्याच्या ठायीं 'बाण मारणें' आरोप केला आहे.' (साहित्यशास्त्र, पृष्ठ ६१). १३ दुर्योधन. १४ घरांतील झाडसारवण. १५ पर्व-अध्याय ६६ पहा. १६ [बोकड शस्त्र] गिळितां [तें] शस्त्र बोकडाला तत्काल वधी, हें कर्म करिसी-अन्वय. (अध्याय ६६ श्लोक ८). १७ एकदां एक बोकड एक शस्त्र पडलें होतें तें गिळूं लागला, पण तें त्याला गिळतां येईना. म्हणून त्यानें खालीं पडून आपलें मस्तक ज टेंकलें व पुढच्या पायांनीं तें शस्त्र उचलून तो तें गिळण्याचा प्रयत्न करूं लागला. तेव्हां त्या धारेच्या शस्त्रानें तोंडांतून जात जात त्याचा गळासुद्धां चिरून टाकिला-अशी गोष्ट मूळांत १८ मूर्खा. 'रे मंदा! मृत्यु रोकडा लाहें.' असाही पाठ आहे. १९ मिळवूं नको, मृत्यु येईल करूं नको. २० (धर्मरूप) सिंहाच्या. २१ नाकांत काड्या घालणें=कुरापत काढणें, त्रास मर्मभेदक भाषण करणें. २२ (दुर्योधनरूप) ससा. २३ ही गीति '**रूपकातिशयोक्ति**' अलंकाराचें उत्तम उदाहरण आहे. जेथें प्रकृत आणि अप्रकृत यांच्यामध्यें पूर्ण अभेद असून अ प्रकृतास अगदीं गिळून टाकिलें आहे, असें वर्णन असतें, तेथें '**रूपकातिशयोक्ति**' अलंकार येथें 'हरि' व 'पक्षिराज' हे शब्द धर्मराजाबद्दल व 'शशक' आणि 'मशक' दुर्योधनाबद्दल घातले धर्म व दुर्योधन या उपमेयांचा उल्लेख मुळींच कोठें केलेला नाहीं. येथें उपमानांमध्यें उपमेयें मिळून गेलीं असून उपमानवाचक शब्दांनींच उपमेयांचा बोध होतो. २४ (धर्मरूप) ग २५ चेष्टा. २६ (दुर्योधनरूप) चिलटा. २७ गभीरः असि इति युधिष्ठिरं प्रभुं कः बत न ब्रू क्षमाशील व गंभीर आहेस असें कोण बरें धर्मराजास म्हणणार नाहीं? अशीं लहान मोठीं संस्कृत वाक्यें पंतांच्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं आढळतात. यांतील कित्येकांचा संग्रह माला'-अंक ६६ (पृष्ठें ३०-३१) यांत केलेला आहे, तो पहावा. पंतांची कविता 'प्राकृतसंस्कृत आहे, असें खुद्द पंतांनीं स्वकृत 'मंत्ररामायणा'च्या उपक्रमांत सांगितलेंच आहे.

निज नीचपण प्रकटिसि, तूं श्वान[1] भल्यावरी हि भुंकोन. ॥ ८५
पांडव किमपि न वदती, तूं वदसि सभेंत शब्द घाणेरे,[2] ।
हे सकळखळतिळांचे[3] रगडुनि करणार पिष्ट घाणे रे !' ॥ ८६
दुर्योधन, हित कथितां[4] 'धिक्कार तुला[5] असो' असें च वदे. ।
ज्वरिता[6] जसें ससितपय,[7] सद्वचन न दुर्जना तसें चव[8] दे. ॥ ८७
कल्यंश[9] खळशिरोमणि[10] कपटपटु कटुस्वभाव सद्द्वेषी,[11] ।
तो प्रातिकामि[12]नामक सूतातें द्रौपदीप्रति प्रेषी[13]. ॥ ८८
'सूता ! जा कृष्णेला घेउनि ये, भय नसे तुला लेश, ।
सर्वज्ञ न, किंचिज्ज्ञ[14] क्षत्ता[15]; ब्रह्मा नव्हे कुलालेश[16]. ॥ ८९
बहु कातर[17] विदुर सदा, वटवट[18] करितो असी च हा नीच, ।
या खोट्याला गमले जी अस्मद्वृद्धि[19] ती खहानीच.' ॥ ९०
जाउनि तो सूत म्हणे,[20] 'कृष्णे ! द्यूतांत तूं स्वयें धर्मे ।
हारविलीस,[21] सुयोधनसदनाप्रति ये करावया कर्मे[22].' ॥ ९१
हें वाक्य त्या सतीतें बहु दुःसह, जेंवि वज्र कदलीतें,[23] ।

---

१ कुत्रा. २ वाईट, घाणेरडे. ३ सर्व दुष्टजन हेच तीळ त्यांचे. ह्या गीत्यर्धांत 'रूपका'लंकार आहे. ४ विदुरानें हित कथितां, दुर्योधन वदे—असा अन्वय. ५ विदुराला. ६ ज्वर आलेल्या रोग्याला. समानार्थक पद्यः—'कौरवीं हेळिली त्याची बुद्धी । जैसी निर्नाका दर्पणविधी । ना तें, ज्वरितासी शर्करा दुग्धीं । घोटितां वाटे विषप्राय. ॥' (नरहरिकृत उद्योगपर्व, अ० ६।८४). अशा वैद्यशास्त्रविषयक उपमा पंतांच्या काव्यांत मधून मधून चमकतात. (द्रोणपर्व—अध्याय १४।१०, अध्याय २१। ७१ पहा). ७ शर्करायुक्त दुग्ध. (सिता(शर्करा)सह जें तें ससित). ८ गोडी. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ९ कलीचा अवतार (दुर्योधन). १० खळांचा मुकुटमणि, दुष्टश्रेष्ठ. ११ साधूंचा द्वेष करणारा. १२ दूतविशेष. हा दुर्योधनाचा सूत (सारथि) द्यूतप्रसंगीं द्रौपदीस 'सभेंत ये' म्हणून बोलावण्यासाठीं गेला होता. १३ पाठवी, धाडी. १४ अल्पज्ञाता. १५ सूत, विदुर. १६ कुंभारांचा स्वामी हवीं तशीं मडकीं घडितो, म्हणून तो सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाची सर पावेल काय? तसा अल्पस्वल्प जाणतो म्हणून विदुर सर्वज्ञ समजूं नये—असें तात्पर्य. कुलाल (कुंभार)+ईश (स्वामी)=कुंभारांचा स्वामी. कल्पनासादृश्यः—भीमा मी, दाखविता विधिस जसा दक्षता कुलालेश. (द्रोणपर्व—अध्याय १४।१४). १७ भितरा. १८ विपरीत बोलतो, बडबड करतो. १९ आमची (वृद्धि) भरभराट, आमचा उत्कर्ष. २० 'वदे' असें पाठांतर. २१ कर्मणिप्रयोगांत कर्मपद तृतीय पुरुषीं असतें, प्रथम किंवा द्वितीय पुरुषीं गद्यांत फारसें येत नाहीं पण पद्यात्मक ग्रंथांत तशीं उदाहरणें कधीं कधीं आढळतात. जसें प्रस्तुत गीतींत 'तूं' हें द्वितीय पुरुषीं कर्मपद आहे. अशा प्रकारचे प्रयोग पंतांच्या कवितेंत कोठें कोठें आढळतात. (मागें गीति ३२ पहा). २२ गृहसंमार्जनादि कृत्यें, दास्य. २३ केळीस. ही उपमा समर्पक आहे. हा कदलीचा दृष्टांत पंतांचा आवडता दिसतो. (विराटपर्व—अध्याय २।११९; द्रोणपर्व—अध्याय २।१०५; मंत्रभागवत, स्कंध १०।४३१). 'कदली वैजयंत्यां च रंभायां हरिणान्तरे' इति विश्वः.

परि परिसावें, धैर्यें त्यासी जें ती सुबुद्धि[1] वदली तें. ॥ ९२

'सूता ! काय वदसि हें ? द्यूतीं हारविति संपदे[2]तें गा ! ।

'श्री'[3] म्हण, न 'स्त्री' म्हण, हें त्वद्वचन[4] मनास कंप देतें गा !' ॥ ९३

सूत म्हणे, 'आधीं श्री, मग सात्मजबंधुमंडळी[5] धर्में ।

हारविली, निजमूर्ति द्यूतीं, स्त्री शेवटीं असत्कर्में.' ॥ ९४

राज्ञी[6] म्हणे, 'तरि अगा ! जा पूंस[7] सभेंत तूं असें आर्या, ।

राजेंद्रा ! हारविली प्रथम द्यूतीं स्वमूर्ति कीं भार्या ?' ॥ ९५

सूत सभेंत विचारी धर्मातें कीं, 'पुसे असें आर्या; ।

राजेंद्रा ! हारविली प्रथम द्यूतीं स्वमूर्ति कीं भार्या ?' ॥ ९६

धर्म न कांहीं च वदे; तों दुर्योधन म्हणे 'सभेस तिनें ।

यावें, स्वयें पुसावें, जें पुसणें योजिलें तिच्या मतिनें.' ॥ ९७

कृष्णेप्रति सूत म्हणे, "देवि ! न कांहीं च धर्म वदला गे ! ।

जाणों, सभासदांस हि कठिन त्वत्प्रश्नवाक्यपद[9] लागे. ॥ ९८

दुर्योधन वदला कीं 'त्वां चि पुसावें सभेंत, डोलेल[10] ।

त्वत्प्रश्नश्रवणसुखें, तुज पाहुनियां यथार्थ बोलेल' ॥ ९९

बहुधा सभेंत तुजला नेईल क्षुद्रबुद्धि[11] गांजाया; ।

नसतां उपाय कांहीं, आग्रह करिसील तूं हि कां जाया ?" ॥ १००

कृष्णा म्हणे, 'समर्थ न कोण्ही ही सुज्ञ भावि टाळाया,

जेंवि विधु[12] राहु येतां पर्वीं[13] आत्मप्रभा[14] विटाळाया. ॥ १०१

**रक्षील[15] धर्म समयीं, धरिती त्याचा चि भरंवसा सु-कवी[16]; ।**
**आर्जविला असतां तो स्वजनव्यसनासि[17] निश्चयें चुकवी.॥१०२**

---

१ बुद्धिमती (द्रौपदी). २ संपत्तीला, श्रीला. ३ श्री (संपत्ति) हारविली असें म्हण, परंतु स्त्री (भार्या) हारविली, असें म्हणूं नको. (अध्याय ६७ श्लोक ५). ४ तुझें भाषण. (गीति ९१ पहा). ५ पुत्रांसहवर्तमान बंधुमंडळी. ६ द्रौपदी. ७ विचार; चौकशी कर. ८ अध्याय ६७ श्लोक ७–८ पहा. ९ तुझ्या प्रश्नाच्या वाक्यांतील प्रत्येक शब्द. १० संतोष पावेल. या क्रियापदाचा कर्ता 'सभा' अध्याहृत समजावा. डोलेल=मान डोलवील. मान (किंवा मस्तक) डोलविणें–ही क्रिया मान्यता, स्वीकार, अनुमोदन, संमति, संतोष, समाधान इत्यादिकांची दर्शक आहे. ११ हलक्या बुद्धीचा (दुर्योधन). १२ चंद्र. जेंवि आत्मप्रभा विटाळाया पर्वीं राहु येतां विधु [तें टाळाया समर्थ न]–असा अन्वय. १३ पूर्णिमेस. १४ आपली कांति. १५ ह्या पद्यांत वर्णिलेलें तत्व अत्यंत महत्वाचें आहे. 'यतो धर्मस्ततो जयः' हें गीतावाक्यही सर्वांच्या परिचयाचें आहे, परंतु त्याप्रमाणें वागणारे फारच विरळा! १६ ज्ञाते. १७ आपल्या भक्तांच्या संकटांना.

भरतकुळधर्म न बुडो; सभ्यांला पूस एकदा जा, गा ! ।
तन्मत[1] मान्य मला, कीं, नय तच्चित्तीं[2] असे सदा जागा.[3]' ॥ १०३
पुनरपि सभेंत जाउनि सूत म्हणे, "सभ्य हो ! तुह्मांस सती, ।
'द्यूतांत मी जिता कीं अजिता,' ऐसें मदाननें[4] पुसती." ॥ १०४
दुर्जनदुराग्रहाचे[5] ज्ञाते सभ्य हि न पाहती च वर, ।
तेथें उत्तर कैंचें ? न[6] चलेसें न वदती कवि-प्रवर[7]. ॥ १०५
जाणुनि संकट धर्में दूतमुखें कळविलें स्व-जायेतें ।
कीं, 'श्वशुरासि[8] शरण ये', गुरु[9] कवच[10], व्यसन[11] उग्र ज्या येतें. ॥ १०६
सभ्य[12] न वदती कांहीं, पांडव ही मूकबधिरसम[13] गमती, ।
पाहुनि असें सुयोधन बोले जो सत्पथोपरम-ग-मती[14]. ॥ १०७
'तीतें चि आण जा, रे ! ती कां स्वमुखें पुसे न येऊनी ? ।
सभ्यजनीं हितपृच्छक[15], शीतार्त[16] हि कोण गा ! न ये ऊनीं[17] ? ॥ १०८
सभ्यांनीं प्रश्नोत्तर[18] योजावें नीट, कीं न योजावें ? ।
आर्तें[19] वैद्यगृहाला, गुण यो कीं प्राक्तनें[20] न यो, जोवें[21].' ॥ १०९
मत्तें[22] श्वयूथपें[23] श्वा[24] सिंहीप्रति धाडितां धरायाला, ।

---

१ त्या सभ्यांचा अभिप्राय. २ त्या सभ्यांच्या मनांत नीति जागृत असते, कारण ते सभ्य धर्मात्मे आहेत. (अध्याय ६७ श्लोक १६). ३ जागृत. ४ माझ्या मुखानें. (मत्=माझ्या+आननें=मुखें). ५ दुर्जन जो दुर्योधन, त्याच्या (द्रौपदीला सभेंत आणण्याविषयींच्या) दुराग्रहाला जाणणारे (ज्ञाते) असे भीष्मादिक सभासद. ६ न चालेल असें, न मानवेल अथवा पसंत न पडेल असें. ७ कविश्रेष्ठ, सुज्ञवर्य. ८ सासऱ्याला (धृतराष्ट्राला). ९ ज्या व्यसन उग्र येतें (त्याला) गुरु कवच आहे—असा अन्वय. हा चरण सुभाषितरूप आहे. येथें 'काव्यलिंग' नामक अलंकार आहे. जेथें 'म्हणून' किंवा 'कारण' हा शब्द अध्याहृत असून शब्दांमध्यें किंवा वाक्यांमध्यें कार्यकारणभाव स्वीकारावा लागतो, तेथें हा अलंकार होतो. ह्या ठिकाणीं 'श्वशुरासि शरण जाणें' हें कार्य व 'गुरु कवच' हें कारण समजावें. १० चिलखत, रक्षण करणारें साधन. ११ संकट, दुःख. १२ सभासद. १३ मुके आणि बहिरे यांसारखे. १४ सत् (चांगला) +पथ (मार्ग)+उपरम (नाश)+ग (गमन करणारी)+मति (बुद्धि)= सन्मार्गापासून नाशाकडे (उपरमाकडे) जाणारी ज्याची मति असा. १५ आपल्या हिताची विचारपूस करणारा. १६ थंडीनें पीडित. (शीत=थंडी, आर्त=व्यथित). कल्पनासादृश्यः—'पतिभजनीं सुख पावो तव मति, शीतांत जेंवि पाठ उनीं ।' (मदालसोपाख्यान, अध्याय २।५३). १७ सूर्याच्या प्रकाशांत. हा चरण सुभाषितरूप आहे. येथें 'दृष्टान्ता'लंकार आहे. १८ प्रश्नाचें उत्तर. १९ रोग्यानें. २० दैवानें. २१ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. हें 'दृष्टान्ता'लंकाराचें उत्तम उदाहरण आहे. जेथें प्रकृत अर्थाचें अप्रकृत अर्थाचा दाखला (उदाहरण-दृष्टांत) देऊन समर्थन केलेलें असतें, तेथें 'दृष्टान्त' अलंकार होतो. २२ माजलेल्यानें. २३ श्व(कुत्रा)+यूथ (कळप)+प (पति, स्वामी) त्यानें, कुत्र्यांच्या कळपाच्या नायकानें. २४ कुत्रा.

जाईल कसा? तैसा सूत हि मी कर्म तें करायाला. ॥ ११०
[1]तांतड करी **सुयोधन**, परि सूत पुन्हा म्हणे, 'अहो सभ्य ! ।
काय वदों ? प्रश्नोत्तर **कृष्णे**ला कां न होय हो ! लेभ्य ?[2]' ॥ १११
कोपें ह्मणे **सुयोधन**, 'भीतो **भी**मासि सूत हा भितरा, ।
[3]दुःशासना ! स्वयें जा, आण तिला, कर्म हें नव्हे [4]ईतरा.' ॥ ११२

## अध्याय पांचवा.[5]

तो [6]हरिणीग्रहणार्थी [7]अत्युग्रप्रकृति लांडगा-सा च ।
गेला तें चि कराया **दुःशासन** दुष्ट दांडगा साच. ॥ १
**कृष्णे**सि [8]म्हणे, 'चाल, द्यूतीं तुज जिंकिलें, [9]भज [10]**कुरू**तें, ।
**कुरु**पतिस पहा, लज्जा त्यज, सेवावें [11]सुखें [12]शतगुरूतें.' ॥ २
त्या [13]दुष्टोक्तश्रवणें [14]**पांडूं**ची संकटीं पडे [15]जाया, ।
संरक्षणार्थ धांवे **धृत**राष्ट्राच्या स्त्रियांकडे जाया. ॥ ३
पळतां धांवोनि तिला, त्या केशांतें धरूनि, [16]आकर्षी, ।
ज्यां राजसूययज्ञीं [17]अभिषेचिति बहु [18]महर्षि [19]नाकर्षी. ॥ ४
**कृष्णा** म्हणे, 'सभेंत न न्यावें मज, मी रजस्वला, आंगा ।
आच्छादन [20]एकांबर, नेतोसि असीस आग्रहें कां ? गा !' ॥ ५

---

१ घाई, जलदी. २ लभ्य=प्राप्त; उत्तर कां मिळत नाहीं? असा भावार्थ. ३ अध्याय ६७ श्लोक २५ पहा. ४ इतराच्या हातून हें काम होणार नाहीं—असा भाव. ५ ह्या अध्यायांत मूळांतील ६७ व्या अध्यायाच्या अवशिष्ट भागाचा व ६८–६९ ह्या दोन अध्यायांचा सारांश पंतांनीं वर्णिला आहे. ह्या अध्यायाशीं मुक्तेश्वरकृत सभापर्वाचा १५ वा अध्याय ताडून पाहण्यासारखा आहे. ६ मृगीला पकडण्याचा हेतु ज्याचा आहे असा. ७ अतिक्रूर आहे स्वभाव (प्रकृति) ज्याचा असा. ८ दुःशासन म्हणे. ९ सेवा कर. १० दुर्योधनादि शतबंधूंना. (कुरु, रघु, यदु वगैरे नांवें त्यांच्या कुळांत उत्पन्न झालेल्या पुरुषांसही लावितात). 'कुरूतें' असें पाठांतर. कुरु=दुर्योधन. ११ 'तुवां' असा पाठभेद आहे. १२ शंभर पंडितांना, दीडशहाण्यांना. गुरु=बृहस्पति. (मूर्खांला आपण मोठे शहाणे आहोंत, असें वाटतें—असा अनुभव आहे. तेव्हां, दुःशासनाला आपण सर्व बंधु शहाणे आहोंत असें वाटलें, यांत कांहीं आश्चर्य नाहीं). येथें रा. पराडकर यांच्या प्रतींत—'शंभर पतींना किंवा शतकौरवांच्या मातापित्यांना'—अशी टीप आहे, पण ती आम्हास सयुक्तिक वाटत नाहीं. 'शतगुरूतें' असें पाठांतर. शतगुरूतें=शंभर भावांत जो गुरु (वडील) दुर्योधन त्यातें. (मूळ अध्याय ६७ श्लोक २७ पहा). १३ दुष्ट भाषणाच्या श्रवणें 'दुष्टोक्तिश्रवणें' असें पाठांतर. १४ पांडवांची. 'धर्माची' असें पाठांतर. १५ स्त्री. १६ ओढी. ह्या क्रियापदाचा कर्ता 'दुःशासन' (अध्याहृत). १७ 'अभिषेकिति' असा अन्य पाठ आहे. १८ महातपस्वी. १९ स्वर्गस्थ नारदादि ऋषि. (नाक= स्वर्ग). ह्या गीतींत **'विषम'** नांवाचा अलंकार आहे. एकाद्या पदार्थास प्राप्त झालेली दशा अयोग्य आहे, असें वर्णन करण्यांत आलें, म्हणजे देखील 'विषम' अलंकार होतो. (मागें पृष्ठ ३५ टीप ९ पहा). २० एक वस्त्र. (अंबर=वस्त्र).

दुष्ट म्हणे, 'खसमेला तुजला नेतों चि, दूरसी[1] अस कीं;[2] ।
एकांबरा अस, तुझीं अंगें नग्नें असोत हीं असकीं.' ॥ ६
देवी म्हणे, 'अनार्या[3]! नाहीं च तुझ्या मनांत पाप-दर.[4] ।
ओढूं नको फरफरां,[5] घेऊं दे सावरूनि हा पदर'. ॥ ७
अधम म्हणे, 'द्यूतजिता दासी तूं, लाजसी कशाला गे! ।
चाल उगी च, प्रभुसीं हठ[6] करितां पाठिला कशा[7] लागे.' ॥ ८
कृष्णा म्हणे, 'पति कसें पाहुनि हें कर्म साहतील? न घा ।
पद सर्पशिरीं, तुमच्या रक्ताच्या स्पष्ट वाहतील नद्या. ॥ ९
गुरुजनसभेंत कैसा नेसी ओढूनि कांय हा[8] नीचा! ।
करितोसि कर्म दुष्टा[9]! प्राक्ष्यर्थ बळें चि काय हानीच्या[10]? ॥ १०
धर्म परम सूक्ष्म[11] असे, धर्मात्मा धर्म नृप नसे चुकला, ।
सावध व्हा, कंठीं यमपाश कसे घालितां? अहा! उकला.[12]' ॥ ११
ओढुनि सभेंत नेली तेव्हां ती द्रौपदी म्हणे, 'कुरुची ।
कीर्ति बुडाली, हा धिक्! कुरुवृद्धांला हि मानली[13] कु-रुची[14]. ॥ १२
हा[15]! भीष्मद्रोण कसें न म्हणति, 'हे सहजमित्र! सत्व[16]! रहा.' ।
अन्यायें बुडणार व्यसनीं कुरुराजवंश सत्वर हा. ॥ १३
अन्यायाचलभिदुरें[17] विदुरें अनवरतशुद्धसत्वरतें[18] ।
जाऊं दिलें कसें? जें गेलें सोडूनि सख्य सत्वर तें.[19] ॥ १४

१ दूर राहण्यास योग्य अशी (रजस्वला). २ अवयवीं. 'कीं असकीं' असा पाठभेद. ३ नीचा, अधमा. ४ पापभय. 'दर' शब्दाचे (१) शंख, (२) भीति, व (३) अल्प, असे तीन अर्थ होतात. ह्या तिन्ही अर्थीं पंतांनीं हा शब्द आपल्या काव्यांत योजिला आहे. 'नाहीं तुझिया मनांत पापदर' असाही पाठ आहे. ५ 'फरारां' असें पाठांतर. ही गीति आबालवृद्धांच्या अत्यंत परिचयाची आहे. ६ हट्ट. 'प्रभुशीं हट करितां पाठिसीं कशा लागे' असा पाठभेद. ७ चाबुक. ८ हा माझा देह. ९ 'करितोसि कर्म दुष्ट' असाही पाठ आहे. १० नाशाच्या. ११ समजण्यास कठीण. १२ उलगडून काढा. १३ मानवली, मान्य झाली. १४ वाईट कृत्याची आवड. १५ हा! (हाय, हाय). [स्वभावतःच सात्विक असणारे हे] भीष्मद्रोण, 'हे सहजमित्र सत्व! (हे जन्मसिद्ध मित्रा सत्वगुणा!) रहा (आम्हांला सोडून जाऊं नको)' [असें] कसें न म्हणती? (असें कां बरें म्हणत नाहींत?)–असा अन्वयार्थ. सारांश–द्रौपदीचें संरक्षण न केल्यामुळें भीष्मादिकांनीं आपलें सत्व घालविलें–असा इत्यर्थ. १६ हे सत्वगुणा! सत्वगुण अचेतन असून तो सचेतन आहे असें समजून त्यास संबोधिलें आहे. म्हणून येथें **'चेतनधर्मारोपोक्ति'** नामक अलंकार आहे. १७ अनीतिरूप पर्वतास (अचलास) वज्रासारख्या (भिदुरासारख्या) अशा (विदुरानें). येथील **'रूपक'** फार बहारीचें आहे. १८ निरंतर शुद्ध अशा सत्वगुणांत रमणारा असा, अखंड शांतवृत्तीचा असा, त्यानें. १९ सत्व. हें पंतांचें आवडतें यमक आहे. (वनपर्व–अध्याय १३।४८).

कारुण्यरसें भरले होते, जे दुर्बळांसि उद्धरिते, ।
झाले कसे अकस्मात् ते केवळ **कुरुगुरु** प्रबुद्ध[1] रिते[2]?' ॥ १५
प्रेरियेले[3] भेदाया पतिधैर्यद्विरदकट[4] कटाक्ष तिनें, ।
प्रथम न हणति[5] श्रीच्या, हणति[5] स्त्रीच्या चि कटकटा[6] क्षतिनें[7]. ॥ १६
पेटे **पां**डवकोपानल[8], **कृ**ष्णादृष्टि[9] होय तद्धमनी[10]; ।
काय करितील हो! ते? निजमर्यादागुणें[11] चि बद्ध मनीं. ॥ १७
**दु**:शासनासि म्हणती **भी**मादिक निजमनांत, 'हे बाल[12]! ।
हूं; सुप्त[13] सर्पिणीतें मेली मानूनि ओढ हे बाल[14].' ॥ १८
केश धरुनि **दु**:शासन तीस बळें फिरफिरोनि दे हिसके, ।
भावितमःप्रशमीं[15] न, क्षम[16] ही होऊनि तेज[17] देहिं[18], सके[19]. ॥ १९
'दासी दासी' ऐसें असकृत्[20] तो खळ म्हणे सहास[21] तितें; ।
जाणों क्षमालि[22] शिकवी, 'जें जें अरि करिल तूं सहा सति! तें.' ॥ २०
'दासी दासी' म्हणतां **दुर्योधन कर्ण शकुनि** मानवती[23] ।
हांसति[24] खळ, सभ्य रडति, दुष्टें छळितां सभेंत मानवती[25]. ॥ २१
**गां**गेय[26] म्हणे[27], "सुभगे[28]! धर्म परम सूक्ष्म[29], यास्तव स्पष्ट, ।

---

१ पंडित, ज्ञाते. २ कारुण्यरसरहित, दयाशून्य. 'रितें' हा अशिक्षित लोकांच्या बोलण्यांत येणारा शब्द आहे. याचा अर्थ–रिकामें, खालीं. ३ पाठविले. ४ पतिधैर्यरूप गजांचीं गंडस्थळें. कटाक्ष=नेत्र-कटाक्ष. ५ ह्या क्रियापदाचा कर्ता–पांडव. ६ खेदोद्गारशब्द. (हाय हाय!). ७ नाशानें. ८ पांडवांचा क्रोधरूप अग्नि. ९ द्रौपदीचे कटाक्ष. १० कोपाग्नीची फुंकणी (धमनी). ११ आपल्या मर्यादारूप दोरीनें. (गुण=दोरी). धर्मराजाविषयीं पूज्यबुद्धि हीच दोरी, तिनें बांधले गेलेले. ह्या गीतींत **'रूपका'**लंकार आहे. १२ हे मूर्खा! १३ निजलेल्या. १४ केश. 'हेबाळ' असा पाठ रा० **पराडकर** यांच्या प्रतींत आहे. 'हेबाळ=हिसकाहिसक कर. 'हेबाळ' हा शब्द 'अबल' ह्या शब्दापासून झाला आहे. ह्याचा अर्थ निःशक्त, व तो क्रियापदाप्रमाणें योजला असतां निःशक्त करणें, वाईट रीतीनें वागविणें, छळणें, हाल करणें इत्यादि अर्थ दाखवितो.' (मराठी शब्दांचें उद्घाटन–पृष्ठ ४९). **'बालः कचे शिशौ मूर्खे ह्रीबेरेऽश्वेभपुच्छयोः'** इति विश्वः. १५ (द्रौपदीच्या) देहीं क्षम तेज होऊनिही भावितमःप्रशमीं न शके–असा अन्वय. द्रौपदीच्या आंगीं योग्य पातिव्रत्यतेज होतें, तथापि पुढें अवश्य होणाऱ्या **वस्त्रहरणा**दिरूप दुःखाचा उपशम करण्यास तें समर्थ झालें नाहीं–असा भावार्थ. १६ समर्थ. १७ पराक्रम, सामर्थ्य. १८ येथें रा० **पराडकर** यांच्या प्रतींत 'देहि' असा पाठ आहे. १९ समर्थ झालें नाहीं. २० वारंवार (सकृत्=एकवार). २१ हांसत, उपहासपूर्वक. २२ क्षमारूप सखी (आलि). ह्या गीत्यर्धांत **'उत्प्रेक्षा'** आहे. २३ हर्ष पावती. २४ येथें **'विरोधा'**लंकार आहे. २५ मानप्रतिष्ठा ठेवण्यास योग्य अशी, पूज्य द्रौपदी. २६ गंगात्मज, भीष्म. २७ सभापर्व–अध्याय ६७, श्लोक ४६-४९ पहा. २८ हे सौभाग्यसंपन्न स्त्रिये. २९ जाणण्यास कठिण, न्यायान्यायविचार अत्यंत गहन. 'सूक्ष्मा गतिर्हि धर्मस्य दुर्ज्ञेया ह्यकृतात्मभिः' म्हणजे 'धर्माचें स्वरूप अत्यंत सूक्ष्म असून मनोजय ज्यांनीं केलेला नाहीं, त्यांस तें समजणें कठिण' असें अनुशासनपर्वांतही सांगितलेलें आहे. (अध्याय १०।६८).

'ऐसें[1] चि' असें मजला वदवेना, हा विचार बहु कष्ट[2]. ॥ २२
वदला 'जितोऽस्मि'[3] ऐसें धर्म; शकुनिनें तयावरि स्वमतें ।
पण करविला तुझा, यावरुनि तरि 'न तूं जित[4]' असें गमतें[5]. ॥ २३
द्यूतांत पर[6]स्वपण स्थापाया[7] नि:स्व[8] जन नव्हे शक्त, ।
स्त्रीचें भर्तृवशत्व[9] हि पाहोनि[10] न मी वदों शकें व्यक्त[11]." ॥ २४
कुरुवृद्ध[12] असें बोले, उपहासें ताप ते कितव[13] देती. ।
सभ्यांसि निर्णयार्थ प्रार्थुनि पुनरपि अशंकित[14] वदे ती[15]. ॥ २५
'द्यूतीं अनतिनिपुणनृप[16] कितवांनीं आणिला बळें चि कसा? ।
दावुनि कर्पूर जसा घालावा लोचनीं खळें[17] चिकसा, ॥ २६
केलें तसें[18] चि; हरिलें कपटें सर्वस्व[19] शेवटील पणें ।
नृप जिंकिला शकुनिनें, याला नरकीं च शेवटीं लपणें. ॥ २७
केलें स्वपरिभवांन्त[20] द्यूत, पुन्हा भूप लाउ[21] दारपण[21], ।
या बुद्धिनें शकुनिनें दाखविलें आपुलें उदारपण[22]. ॥ २८
ऐसें असतां द्यूतीं अजिता मी कीं जिता? करा सवदा[23] ।
पुण्याचा, पुशिलें हें सत्य पहा, जोडिल्यें करास, वदा. ॥ २९

---

१ तुझ्या प्रश्नाचें उत्तर अमुकच होय असें. धर्माची गति सूक्ष्म आहे, त्याचा निर्णय करतां येत नाहीं, म्हणून तुझ्या प्रश्नाचें निश्चित उत्तर देण्यास मी समर्थ नाहीं—असें तात्पर्य. २ कष्टप्रद, खेदकारक. ३ मी जिंकिला गेलों आहें. ४ जिंकिलेली. ५ भासतें, वाटतें. ६ दुसऱ्याच्या स्वाचा (धनाचा) पण. ७ लावण्यास. ८ दरिद्री, निर्धन. ९ पतीच्या स्वाधीन असणें. १० मनांत आणून. धर्म स्वतः जिंकला गेला. ह्यास्तव स्त्रीच्या संबंधानें निःस्वच (निर्धन) झाला. म्हणून द्रौपदी हें दुसऱ्याचें धन पणास लावण्याचा त्याला अधिकार राहिला नाहीं, ह्यावरून पाहतां तूं जिंकली गेली नाहींस असें वाटतें; परंतु स्त्री ही सर्वदा भर्त्याच्या स्वाधीन, तस्मात् भर्त्याची जी गति, तीच तिचीही असावयाची; म्हणून धर्म जिंकला गेला, तेव्हां तूंही जिंकली गेलीस असें वाटतें. ह्यासाठीं अमुकच गोष्ट खरी असें मला स्पष्टपणें सांगतां येत नाहीं-हें तात्पर्य. (नवनीत). ११ स्पष्ट. १२ भीष्म. १३ जुवेबाज, शठ. १४ शंका न धरतां, निर्भीडपणें. १५ द्रौपदी. १६ अन्+अति+निपुण+नृप=फार निपुण नव्हे असा धर्मराज. १७ दुष्टानें, कपटी मनुष्यानें. 'बळें' असें पाठांतर. १८ डोळ्यांत कापूर न घालतां चिकसा (उटणें) घालावा, तसें केलें. चिकसा हा शब्द खानदेशांत रूढ आहे. येथें 'चिकसा=चिकासारखा' असा अर्थ कोणीं कोणीं करितात, परंतु तो आम्हांस इष्ट वाटत नाहीं. १९ सकल धन. (द्रौपदी व द्रव्यादि सर्व). २० आपला परिभव (पराजय) अंतीं आहे असें (द्यूत). २१ बायकोचा पण लावो. (दार=बायको). येथें रा० पराडकर यांच्या प्रतींत 'दावु' असा पाठ आहे. २२ 'तूं आपणास सोडवून घे' (मागें अध्याय ४ गीति ७१) असें शकुनीनें धर्मराजास सांगितलें, तें त्याचें औदार्य. २३ व्यापार. 'सवदा' हा शब्द फारसी आहे.

[1]कुरुगुरुवचन तसें जरि संदिग्ध वदाल तरि [2]न [2]भागावें ।
अजि सभ्य हो! जरि गुरु हि न हरी संदेह, तरि [3]नभा गावें.' ॥ ३०
न वदे कोण्ही हि किमपि दुःशासन [4]घाबरी करी तीतें, ।
'[5]तद्रीति सम' कवि म्हणो '[6]ग्रामहरीच्या [7]बरीक रीतीतें.' ॥ ३१
तें पाहुनि **भीम** [8]म्हणे, '[9]राया! आम्हांसमक्ष **कृष्णेची** ।
हे दुर्दशा [10]बरी कीं? [11]पूर्ति असे कीं न [12]अक्षतृष्णेची? ॥ ३२
आहेत कितव पुष्कळ, पुष्कळ त्यांच्या गृहांत [13]बटकी ही, ।
[14]स्नेहें ते हि न त्यांतें [15]पण [15]करिति, [16]मदुक्ति काय लटकी ही? ॥ ३३
श्री बुडविली [17]महेंद्रश्रीतुल्या, मज [18]ईची नसे परवा, ।
[19]पर [20]वामलोचनेच्या ऐकों न शकें चि या [21]विलाप-रवा. ॥ ३४
या साध्वीस न दुःखद [22]परकर चि, [23]तुझा स्व-कीर्ति-हानि-कर ।
हा [24]निकर पातकांचा; कैसा केला खळें [25]महा-निकर? ॥ ३५
रे सहदेवा! सत्वर पुष्कळसा अग्नि आण, [26]जा च कसा, ।

---

१ भीष्मवचन. २ तसदी घेऊं नका. ३ आकाशाला, शून्याला. नभ आणि शून्य हे शब्द समानार्थक आहेत. गुरूच संदिग्ध बोलून संदेहनिरास करणार नाहीं, तर दुसरा कोणी निर्णय करील ही आशा उरली नाहीं–असें तात्पर्य. ४ पांडवपक्षपाती भीष्मानें जेव्हां संदिग्ध उत्तर दिलें, तेव्हां आपला जय झाला असें मानून दुःशासन अप्रिय, कटु आणि कठोर वचनें बोलून द्रौपदीला घाबरी करी. ५ तद्रीति (त्या दुःशासनाची वागणूक) ग्रामहरीच्या बरीक रीतीतें सम (कुत्र्याच्या मात्र वर्तणुकीसारखी) [आहे असें] कवि म्हणो–असा अन्वय. कुत्रा गरीब शेळ्या किंवा मेंढ्या यांच्या अंगावर भुंकून भुंकून त्यांना भंडावून सोडतो, त्याप्रमाणें दुःशासन द्रौपदीस दुर्वचनें बोलून घाबरी करीत होता–असा इत्यर्थ. ६ (ग्रामसिंह) कुत्र्याच्या. ७ मात्र. ८ अध्याय ६८, श्लोक १–६ पहा. ९ धर्मराजा! १० 'बरी कां' असें पाठांतर. ११ पूर्णता, तृप्ति. १२ द्यूत खेळण्याच्या इच्छेची. १३ दासी. येथें 'सार'लंकार आहे. १४ दया करून. १५ पणास लाविती. १६ माझें भाषण. १७ इंद्राच्या संपत्तीसारखी. १८ 'तिची' असा अन्यपाठ. १९ परंतु. येथें 'दामयमक' आहे. दोन चरणांस जोडणाऱ्या यमकास दामयमक असें म्हणतात. 'परंतु' ह्या शब्दाचे ठिकाणीं 'पर' हा शब्द समंजस लोकांचे बोलण्यांत बहुधा येत नाहीं. अडाणी लोक मात्र या शब्दाचा प्रयोग विशेष करितात. इतर मराठी कवींचे काव्यांतही हा शब्द आढळत नाहीं. असें जरी आहे, तरी पंतांनीं या शब्दाचा पुष्कळ ठिकाणीं प्रयोग केलेला आढळतो. २० वाम (सुंदर) आहेत लोचन (डोळे) जिचे, अशी द्रौपदी, तिच्या. २१ शोकाच्या शब्दाला. २२ परक्याचे (दुःशासनाचे) हात. या साध्वीस परकरचि दुःखद न, (तर आणखी) हा तुझा स्वकीर्तिहानिकर पातकांचा निकर [दुःखद होय]–असा अन्वय. २३ येथें भीम संतापाच्या भरांत धर्माशीं एकेरीवर आलेला दिसतो. 'तुम्हां' असें पाठांतर. २४ समूह. येथें 'दामयमक' आहे. २५ मोठा अनर्थ. २६ लवकर जा कसा पाहूं, जा, जाच एकदम. येथील 'च' आणि 'कसा' हीं अव्ययें आग्रहार्थी आहेत.

जाळूं [१]याचे हे कर, आम्हां हा सोसवेल [२]जाच कसा?' ॥ ३६
[३]श्वेताश्व म्हणे, 'बापा! **भीमा**! [४]जीमाजि वास [५]अ-शिवाचा ।
केवळ बाळपणीं ही वदलासि न तूं कधीं हि असि वाचा. ॥ ३७
द्यूतीं [६]स्वधर्मगौरवधन बहुधा त्वां हि सर्व हारविलें, ।
उक्तींत [७]तें दिसेना लेश, जसें [८]भित्तिचित्र सारविलें. ॥ ३८
[९]क्षात्रव्रत स्मरोनि द्यूतीं पाचारिलें म्हणुनि आला, ।
[१०]व्यंसनी स्वयें नव्हे, हा [११]आर्य, [१२]अतिक्रमिसि कां बुधा! याला? ॥ ३९
[१३]सद्गुण [१४]सुसेव्य हा [१५]गुरुदेवप्रिय यासि, जेंवि [१६]हार [१७]वुनीं ।
घालिसि तापांत कसा? गति कोण पुढें [१८]स्वसत्व हारवुनी? ॥ ४०
आम्हां [१९]व्यसनार्तांची [२०]धर्मस्थिति हे चि [२१]बोंज, पावें गा? ।

---

१ या धर्माचे. 'बाहू ते संप्रधक्ष्यामि सहदेवाग्निमानय' असें मूळांत आहे. (अध्याय ६८ श्लोक १५). या गीतीमध्यें पत्नीप्रेम आणि बंधुद्वेष या दोन विरुद्धभावांचा संधि आहे, म्हणून ही गीति '**भावसंधि**' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. २ त्रास. ३ शुभ्र (श्वेत) आहेत ज्याच्या रथाचे घोडे तो (अर्जुन). ४ ज्या वाचेमध्यें. ५ अकल्याणाचा. ६ स्वधर्म म्हणजे आपला भ्रातृधर्म (बंधूविषयीं पूज्यबुद्धि), त्याविषयीं गौरव (महत्व) हेंच धन. ७ स्वधर्मगौरवधन. ८ भिंतीवरील चित्र. ९ क्षत्रियांचा धर्म. युद्धासाठीं किंवा द्यूतासाठीं कोणीं पाचारण केलें असतां मागें फिरूं नये—असें शास्त्रवचन आहे. ['आहूतो न निवर्तेत द्यूतादपि रणादपि' इति घंटापथटीकायाम्]. १० द्यूतासक्त. ११ हा (धर्म) स्वयें व्यसनी नव्हे, (तर) आर्य (कर्तव्यकर्म करणारा) [आहे]—असा अन्वय. आर्य='कर्तव्यमाचरन् काममकर्तव्यमनाचरन् । तिष्ठति प्रकृताचारे स वै आर्य इति स्मृतः ॥.' तसेंच 'आर्य' कोणाला म्हणावें हें पुढील श्लोकांतही सांगितलें आहे:—'यथाचारं यथाशास्त्रं यथाचित्तं यथास्थितम् । व्यवहारमुपादत्ते यः स आर्य इति स्मृतः ॥' (योगवासिष्ठ—प्रकरण ६।१२६।५५) ह्याचा अर्थ:—वृद्धांचा आचार व शास्त्र यांच्या अनुरोधानें प्रसन्नचित्तानें यथास्थित कर्म करणारा व लौकिक व्यवहारही पाळणारा, त्याला आर्य असें म्हणतात. १२ अवमानितोस. १३ सद्गुण इत्यादि विशेषणें धर्माकडे आणि हाराकडे लागतात, म्हणून श्लिष्ट आहेत. सद्गुण—उत्तमगुणयुक्त; (पक्षीं) चांगल्या दोरीनें (सूत्रानें) तयार केलेला (हार). १४ सेवा करण्यास योग्य; (पक्षीं) सेवन करण्यास योग्य १५ गुरु आणि देव प्रिय ज्याला तो; (पक्षीं) देव आणि गुरु यांस आवडणारा. येथें श्लेषालंकार आहे. १६ पुष्पहार. १७ 'उनीं' असें पाठांतर. वुनीं=उनीं=उन्हांत. १८ आपल्या अंगचा सत्वगुण, आपलें सद्वर्तन. १९ दुःखपीडितांची. २० स्वधर्मानुरोधानें राहणें. २१ खाटलें. हा शब्द पंतांच्या सौप्तिकपर्वांतही आढळतो. (अध्याय २ गीति ३०). ह्या गीतीवर 'निबंधमाला'कार कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा आक्षेप असा आहे:—"अश्लीलत्व म्हणजे प्रौढ काव्यांत न खपण्यासारखा ग्राम्य शब्दांचा प्रयोग, व केवळ व्यावहारिक दाखले हे होत. सत्कवींची शब्दपद्धति व अर्थपद्धति लक्षपूर्वक पाहिली असतां ही

त्वां मोडावें न ईला, स्वस्वास्थ्यसुखार्थ बा! जपावें गा! ॥ ४१
हें काय बरें? या गुरुघातें रिपु परम मुदित होतील; ।
स्वमुखीं विष, अमृतरस व्यालमुखीं, कोण सुज्ञ ओतीलें?' ॥ ४२
भीम म्हणे, 'न विनविते जरि फार असें चि मन हि, कर करुनी ।

गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे, कीं दोहोंमध्यें ग्राम्यतेचा लेशही त्यांस खपत नसतो. नुसती वाक्यरचनाही कवितेंत व्यावहारिक भाषेहून निराळी असावी लागते; आणि त्यांतून शब्द व दृष्टांत हे तर प्राकृत व्यवहारांतले व ग्राम्य भाषेंतले मुळींच उपयोगी नाहींत. काव्याचा उद्देश मनोरंजन हा असल्यामुळें, व जे विषय नेहमींच्या व्यवहारांतले व अत्यंत परिचित त्यांच्यापासून वरील उद्देश साध्य होत नसल्यामुळें, त्यांचे वाचक शब्द व त्यांचे दृष्टांत हे मनास आल्हाद देत नाहींत. उलटें असें सुद्धां होतें कीं, एकादें पद्य सुंदर साधलें असून त्यांत मोठा अर्थ संगृहीत केलेला असतो, पण वरच्या प्रकारच्या एका शब्दानें किंवा दाखल्यानें दुधांत मिठाचा खडा टाकल्याप्रमाणें होऊन जातें. ......[उदाहरणार्थ, प्रस्तुत आर्यैत] 'बाज' शब्द घातला आहे; तो मुळींच शोभत नाहीं; सेतूंची वगैरे उपमा अधिक सरस होती.' (निबंधमाला-अंक ६३ पृ. १४-१५). या आर्येवरील आक्षेपाचें निरसन फार मार्मिकपणानें कै० गणेशशास्त्री लेले यांनीं केलें आहे तें:-[निबंधमालाकारांनीं] मोरोपंतांच्या कवितेवर मुख्यत्वें ग्राम्यत्वाचा दोष दिला. परंतु ग्राम्य म्हणजे नांगरहांके वगैरे हलके लोक; यांच्याच मात्र भाषणांत येणारे जे शब्द, त्यांचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. पण तसें मोरोपंतांच्या कवितेंत आढळत नाहीं. त्या कवितेंत ज्या शब्दांचा प्रयोग केला आहे, ते शब्द सभ्यांच्याही भाषणांत येणारे असे आढळतात, म्हणून तो ग्राम्यत्वरूप दोष आहे असें म्हणतां येत नाहीं. तसेंच सभ्यलोकांच्या व्यवहारांत येणाऱ्या गोष्टी दृष्टांतत्वेंकरून सांगितल्या असतां तोही ग्राम्यत्वरूप दोष नव्हे. तर उलटा अर्थसौलभ्यरूपानें गुणच होय, असें म्हणण्यास बाध दिसत नाहीं......(प्रकृत आर्यैतील) 'बाज' हा शब्द ग्राम्य नव्हे. कारण 'शब्द ब्रह्म जिये बाजे' इत्यादि स्थळीं ज्ञानेश्वरांनीं या शब्दाचा प्रयोग केला आहे. या आर्यैत आर्त म्हणजे दुखणाईत, याला स्वस्थपणाचें सुख होऊन आराम वाटण्यास लोकांत बाज हीच उपयोगांत आणितात, म्हणून व्यसनाच्या योगानें जे दुखणाईत, त्यांस आत्मसुखाचें स्वास्थ्य म्हणजे आराम वाटण्यास, धर्मस्थिती हीच बाज होय, हें रूपक अत्युत्कृष्ट झालें. येथें आर्त म्हणजे दुखणाईत याच्या संबंधानें धर्मस्थितीला बाजेचीच उपमा देण्याची आवश्यकता आहे; येथें सेतु इत्यादिकांची उपमा अगदींच उपयुक्त झाली नसती!" (निबंधमाला-अंक ७०, पृष्ठें २५-२७).

१ या धर्मरूप बाजेला. २ आपल्यास स्वस्थपण आणि सुख असावें, यासाठीं. ३ गुरु म्हणजे पिता, त्यासारखा जो धर्मराज त्याच्या नाशानें. ४ शत्रु. ५ हर्षित. ६ सापाच्या तोंडांत. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ७ कोणीही असें करणार नाहीं-हा इत्यर्थ. हें 'प्रश्ना'लंकाराचें उदाहरण आहे. बोलणारा प्रश्न विचारतो, पण त्याला त्या प्रश्नाचें उत्तर माहीत असून, त्याजविषयीं त्याचा निश्चय अगोदरच झाला असतो, अशा स्थळीं हा अलंकार होतो. ८ 'न विनवितें जरि मनहि असेंचि भस्म कर करुनी। आत्मललाटीं धरितों' असाही पाठ आढळतो. ९ माझें मन मला असें तुझ्या (अर्जुनाच्या) म्हणण्याप्रमाणें वागण्यास न विनवितें, तर (धर्मांचे) कर भस्म करुनी (जाळून) इत्यादि.

भस्म, ललाटीं धरितों, [1]कीं करितों प्रथम बद्ध करकरुनी.' ॥ ४३
निववी असुरांत जसा साधु [2]प्रऱ्हादराय [3]कवि-कर्ण ।
धृतराष्ट्रसुतांत तसा एक चि [4]नयनिपुणनायक [5]विकर्ण. ॥ ४४
भीष्मधृतराष्ट्रविदुरद्रोणकृपनृपांसि बोल[6] तो लावी, ।
'कीं समयीं न वदावी तरि मग केव्हां [7]सदुक्ति बोलावी? ॥ ४५
बोला हो! बोला हो! बोला हो! सर्व सभ्य! बोला हो! ।
[8]असमयमौनें तुमच्या सुज्ञपणाच्या न हानि मोला [9]हो. ॥ ४६
श्रवण तरि करा, मज जें सुचलेंसे तें चि भीड तोडूनी ।
वदतों, [10]पद तों गुरुचें, न शिवों द्यावें [11]शिखीसि, [10]सोडूनी. ॥ ४७
चार व्यसनें मृगया, [12]स्त्री, [13]पान, द्यूत यांत जो सक्त, ।
तो [14]धर्मच्युत [15]तत्कृत [16]सत्कृत न, महाजनांत हें [17]व्यक्त. ॥ ४८
धर्म द्यूतव्यसनीं झाला [18]कितवांसि वश [19]पराभूत, ।
कां हो! भ्रान्त करीना [20]सुमताल्यशुचिक्रियापरा भूत? ॥ ४९

१ किंवा द्यूत खेळण्यापूर्वीं घट्ट बांधून ठेविले असते—असा भाव. २ हिरण्यकशिपूचा पुत्र. ३ कवींचे कान. (हें 'निववी' याचें कर्म). ४ नीतिज्ञजनांत श्रेष्ठ. ५ विकर्ण हा धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांपैकीं एक. हा महारथी असून मोठा न्यायी होता. हा दुर्योधनादिकांस प्रिय नसून पांडवांस प्रिय होता. ६ शब्द, दोष. ७ सत्य भाषण. ८ अवेळीं धरलेल्या मुकेपणानें. ९ होवो. ह्या विषया-संबंधानें वाल्मीकिरामायणांत पुढील वचन आढळतें:—'ये तु सभ्याः सदा ज्ञात्वा तूष्णीं ध्यायन्त आसते । यथाप्राप्तं न ब्रुवते ते सर्वेऽनृतवादिनः. ॥' (उत्तरकांड ७।५९); म्हणजे—जे सभासद (एकादी गोष्ट) माहीत असूनही स्वस्थ बसून राहातात, बोलणें प्राप्त झालें असतांही बोलत नाहींत, ते खोटें बोलणारे होत. १० गुरुचें पद (वडीलपणाची पदवी—योग्यता) सोडूनी (टाकून) [तें गुरूचें पद] शिखीस (अग्नीस) शिवों न द्यावें (शिवूं देऊं नका)—असा अन्वय. तुम्हांला वडीलपणाचें स्थान मिळालें आहे. तरी वडीलपणाला न साजेसें कृत्य करून अगर मौन धरून आपल्या वडीलपणाची राखरांगोळी करूं नका. योग्य गोष्ट स्पष्टपणें बोलून आपला वडीलपणा कायम राखा, व प्रत्ययास आणून द्या—असा स्पष्टार्थ. शिखी म्हणजे ब्राह्मण असा अर्थ आहे. हा अर्थ स्वीकारल्यास ह्या पंक्तीचा अन्वय असा करावा:—गुरुचें पद तों शिखीस सोडूनी [इतरास] शिवों न द्यावें. सारांश—'गुरुरग्निर्द्विजातीनां **वर्णानां ब्राह्मणो गुरुः** । पतिरेको गुरुः स्त्रीणां सर्वत्राभ्यागतो गुरुः ॥' ह्या वचनानुसार ब्राह्मण हे सर्व वर्णांचे गुरु. तेव्हां उपदेश करण्याचा अधिकार फक्त त्यांसच आहे, इतरांस नाहीं. तथापि ह्या सभेंत द्रोणाचार्यादि ब्राह्मणश्रेष्ठ आहेत, त्यांनीं मौनव्रत धारण केल्यामुळें मला योग्य वाटतें, तें मी माझा अधिकार नसतांही स्पष्टपणानें बोलून दाखवीत आहें—असा विकर्णाच्या म्हणण्याचा मथितार्थ. ११ अग्नीला. १२ परस्त्रीभोग. १३ सुरापान, दारू पिणें. (अध्याय ६८, श्लोक २०—२१). १४ धर्म-भ्रष्ट. १५ त्या व्यसनासक्त पुरुषाची कृति. १६ सन्मान्य, मान्य केलेली. १७ स्पष्ट. ही गीति सुभाषितरूप आहे. १८ जुवेबाज शकुनि इत्यादिकांस. १९ पराभव पावलेला असा. २० सु+अमत+अति+अशुचि+क्रियापरा=सज्जनांस अमान्य व अत्यंत अशुद्ध अशा कर्मांत तत्पर झालेल्याला. पंतांच्या काव्यांत भूतपिशाच्चादिसंबंधीं उपमा वारंवार आढळतात. (कर्णपर्व, अध्याय ३४।३६; उद्योगपर्व, अध्याय ५।२२, द्रोणपर्व, अध्याय ९।२० पहा).

धर्म जयाच्या नादीं लावुनि, जिंकूनि शकुनिनें आर्या ।
पण आपण चि [1]करविली [2]पांचांची आपुली सती भार्या. ॥ ५०

[3]अन्यर्त्विगननुमत जें द्रव्य न [4]होता असोन होमुनि तें ।
होइल सभेंत बहुमत तो एकातरि हि काय हो! मुनितें? ॥ ५१

द्यूतीं [5]साधारण धन, पण करुनि, नव्हे चि एक [6]हारविता. ।
गिळिल [7]दुराग्रहराहु, त्यजिना परि मद्विचार हा [8]रविता. ॥ ५२

सभ्यांमाजि वदाया [9]विहितें असें [10]बोलतां चि अजि तत्व, ।
हरि[11]कीर्ति सती हे ही तुल्या, यांचें समान [12]अ-जितत्व.' ॥ ५३

तैं [13]साधु '[14]साधु साधु!' ध्वनि करिती म्हणति, 'बोल[15] [16]कानांहीं ।
[16]प्यावे असे चि, तूं कीं विदुर, [17]तिजा [18]स्पष्ट बोलका नाहीं. ॥ ५४

[19]न्यायमृकंडुसुताच्या [20]दुस्तरधृतराष्ट्रजाब्धिसाधु-वटा! ।
सभ्या! भला भला! [21]विधु लाजेल तुझ्या चि [22]मानसा [22]धुवटा.' ॥ ५५

कर्ण [23]म्हणे, "वाचाळा! रे! [24]सर्वस्वग्लहांत हे[25] आली; ।
अजिता कसी? तुझी मति मतिमंदा! विदुरबुद्धिची [26]आली. ॥ ५६

---

१ 'पण आपणच्चि करविला' असें पाठांतर. २ एकंदर पांचांची. ३ दुसऱ्या ऋत्विजांस अमान्य. (अन्य+ऋत्विग्+अननुमत). ४ जो होता (यज्ञ करणारा) न असोन (नसून) जें द्रव्य (होमद्रव्य) अन्यर्त्विगननुमत (दुसऱ्या ऋत्विजांस अमान्य आहे) तें होमुनि (तें होमद्रव्य हवन करून) तो एका-तरिहि मुनितें बहुमत होईल काय?–असा अन्वय. मान्य होणार नाहीं–हा भावार्थ. ह्या गीतींत 'रूपकातिशयोक्ति' अलंकार आहे. ५ समाईक. (द्रौपदी पांचां पांडवांची भार्या, म्हणून द्रौपदी हें साधारण धन–असा भाव). ६ हरविणारा. ७ दुराग्रह हाच राहु. दुराग्रह राहु गिळील, परि हा मद्विचार रविता त्यजिना–असा अन्वय. शकुनिदुर्योधनादिकांच्या दुराग्रहामुळें माझें भाषण निरर्थक होईल, तथापि माझे योग्य विचार मला बोलून दाखविलेच पाहिजेत–असा भावार्थ. ८ सूर्यपणा. (निःस्पृहपणा). ९ उचित. १० 'बोलतोंच्चि' असें पाठान्तर. ११ पतिव्रता (द्रौपदी). १२ अजितपणा, अजिंक्यपणा. द्रौपदी अजित होय, कारण धर्म व्यसनासक्त, जित, परप्रवर्तित आणि ती स्वतः सामाईक, एकट्याची नव्हे–असा भाव. १३ सज्जन, सभासद. १४ चांगलें चांगलें, शाबास शाबास. १५ भाषण. १६ सादर श्रवण करावे. १७ तिसरा. १८ निःस्पृह वक्ता. १९ न्यायरूप मृकंडुसुताच्या म्हणजे मार्कंडेयमुनीच्या. २० तरण्यास अशक्य अशा धृतराष्ट्रसुतरूप समुद्रांतील उत्तम वटवृक्षा (विकर्णा!). मार्कंडेय जलप्रलयसमयीं समुद्रांत बुडत असतां त्याला एक वटवृक्ष आधार झाला, अशी कथा आहे. धृतराष्ट्रपुत्र न्याय बुडवूं लागले असतां त्याला तारण्यास (वटवृक्षाप्रमाणें, हे विकर्णा!) तूंच एकटा आधार झाला आहेस, अन्य पुत्र त्या न्यायाला तारण्यास समर्थ नाहींत–असा भाव. ह्या गीतींत 'रूपका'लंकार आहे. २१ चंद्र. २२ स्वच्छ (निर्मल) अशा मनाला. २३ अध्याय ६८, श्लोक २७–३८ पहा. २४ सर्व धनाच्या पणांत. २५ द्रौपदी. २६ सखी (मैत्रीण).

वरकड हे काय मुके? वक्ता धर्मज्ञ तूं चि? बैस उगा. ।
न भला स्वभाव, हा तुज बालिशजनपंक्तिला[1] न बैसउ गा! ॥ ५७
न वदति सभ्य[2], न पांडव, जरि हे कृष्णा म्हणे, 'अहो! सांगा.' ।
अजिता असती तरि हे तैसें चि स्पष्ट न वदते कां गा? ॥ ५८
म्हणसील 'सभेंत सती नाणावी[3],' परि सती न[4] हे अ-सती, ।
असतो एक सतीचा उपभोक्ता, पांच हे[5] इला असती[6]. ॥ ५९
आनयन[7] सभेंत इचें, कीं हें एकांबरत्व[8] न विचित्र, ।
नग्नत्व हि नवल नव्हे, न चुना बहु नासिकेसि[9] ज्या श्वित्रं[10]. ॥ ६०
सस्त्रीक[11] सधन[12] पांडव शकुनिजित स्पष्ट, काय बोलसि? रे! ।
दे तो सभेंत लघुता[13], जो स्वाविषयीं[14] बळेंचि बोल शिरे[15]. ॥ ६१
दुःशासना! न याचे ऐकावे फोल बोल; हा बाळ, ।
गीष्पतिपुढें[16] मिरवितो साक्षरता[17] दाखवूनि गबाळ[18]. ॥ ६२
वदतो बुधांत भलतें, बोलाया न स्त्रियांत हि संकोनी[19] ।
हूं, घे पांडववस्त्रें, या दासीचें[20] हि वस्त्र हिसकोनी." ॥ ६३
तें ऐकतां चि वस्त्रें टाकुनि, उघडे चि पांच ही बसले. ।
भीष्म म्हणे, 'हें दुःसह, हृदयांत असा[21] न शरकदंब[22] सले. ॥ ६४
माहात्म्य सतीचें हो, देवा! पावो न आस[23] विलयाला[24]; ।

---

१ मूर्ख जनांच्या रांगेला. २ सभासद. ३ न आणावी. ४ ही पतिव्रता नव्हे. असती=जारिणी. हें पंतांचें मोठें आवडतें यमक दिसतें. (मागें अध्याय १।६१ व अध्याय ४।२९ आणि द्रोणपर्व–अध्याय २०।२५ पहा.) ५ हे (पांच पांडव) उपभोक्ते. ६ आहेत. ७ आणणें. अध्याय ६८, श्लोक ३६. ८ एकवस्त्रता. नाकाला चुना लावणें म्हणजे मोठा अपमान करणें होय. परंतु ज्याच्या आंगावर कोड उठून नाकाला साहाजिकच सफेता लागला आहे, त्याच्या नाकाला चुना लाविला असतां, त्याला अपमान वाटण्याचें कारणच नाहीं; कारण तो चुना कोणाला दिसूं शकणार नाहीं. त्याप्रमाणें एकाद्या स्त्रीला नग्न करणें म्हणजे तिचा भयंकर अपमान करणें होय. पण दासीपणापुढें नग्नत्वाचें भयंकरत्व लोपून जातें. द्रौपदी आतां दासी झाली आहे, तेव्हां तिला नग्न करणें, हा कांहीं लक्ष्यांत घेण्यासारखा अपमान नाहीं. कुलशीलसंपन्न स्त्रीला नग्नत्व अपमानकारक वाटणें योग्य आहे; पण दासीला तसें वाटण्याचें कारण नाहीं–हा भाव. 'नाकाला चुना लावणें' हा शब्दसमूह पंतांच्या द्रोणपर्वांतही आढळतो. (अध्याय २१।५८). १० श्वेतकुष्ठ, पांढरें कोड. ११ भार्येसहित. १२ धनासहित. १३ कमीपणा. १४ स्व(आपला)+अ(नाहीं)+विषयीं=आपला विषय नव्हे त्यांत. १५ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १६ बृहस्पतीपुढें. १७ विद्वत्ता. १८ गदळग्रंथ. हा शब्द पंतांच्या द्रोणपर्वांतही आढळतो. (अध्याय ८।३७). १९ समर्थ होऊन. २० द्रौपदीचें. २१ 'असें न शरकदंब' असें पाठांतर. २२ बाणसमूह. २३ 'सतीचें माहात्म्य होवो' ही आशा. २४ नाशाला.

हे आपणासि म्हणल्ये बाळमृगी[1], स्पष्ट आसविल[2] याला[3].' ॥ ६५
दुःशासन सोडाया झोंबे स्वकुळाहितोदया[4] लुगड्यां[5], ।
तेव्हां स्मरली कृष्णा[6] कृष्णा दीनाचिया दयालु गड्या. ॥ ६६
तो दुर्जन आधीं ही साधूंच्या करुनि हानि रीतीची, ।
नग्न सभेंत कराया पाहे खळ धरुनि हा निरी तीची. ॥ ६७
जैं दुर्दशा कराया दुर्दैवें सिद्ध नीचँ हा केला, ।
तैं दीनबंधुला[8] ती कृष्णा[6] मारी मनीं च हाकेला[9]. ॥ ६८
'हे नाथ! रमानाथ! व्रजनाथ! हरे! मुकुंद! कंसारे[10]! ।
गोविंद! कृष्ण! केशव! दीनार्तिहरस्त्वमेव संसारे[11]. ॥ ६९
काळें[12] हि सख्या! न तुझ्या दासीस पहावयास हि सकावें, ।
त्वद्भगिनीवस्त्र[13] खळें नग्न करायास काय हिसकावें? ॥ ७०
जीहुनि नसे सुभद्रा तुज बहुमान्या, अकीर्ति हे तीची[14] ।
धांव दयाब्धे[15]! होते विश्वांत तुझ्या अकीर्ति हेतीची[16]. ॥ ७१
झालासि त्राता[17] चि, न, होउनि विधिच्या[18] अधीन, होगलिता[19], ।
बिरुदावळी[20] तुझी हे गजवरवरदा[21]! कधीं न हो गलिता[22]. ॥ ७२
'भगिनी' ऐसें वदल्यें, परि फार चि लाजल्यें, न हें लटिकें[23]; ।
प्रभुजी! रक्षा, तुमच्या दासांची मी लहानसी बटिक. ॥ ७३
जिंकिल काय खळा तो[24]? जिंकी द्यूतीं न धर्म जो डावा[25]. ।

---

१ लहान हरिणी (द्रौपदी). २ आस्वल, रीस. ३ दुःशासनाला. ४ आपल्या कुलाच्या नाशाच्या उदयाकरितां. ५ हें पंतांच्या आवडत्या यमकांपैकीं एक आहे. (विराटपर्व-अ० १।९७ पद्य). ६ द्रौपदी. ७ अधम (दुःशासन). ८ अनाथांच्या नाथाला (श्रीकृष्णाला). ९ मनांत धांवा करी. १० हे कंसशत्रो, श्रीकृष्णा. ११ दीनार्तिहरः त्वं एव संसारे=संसारांत दीनजनांचें दुःख हरण करणारा तूंच आहेस. १२ यमानेंही. ह्या गीतींत 'विषमा' लंकार आहे. १३ तुझ्या बहिणीचें लुगडें. १४ त्या तुझ्या बहिणीची (द्रौपदीची-माझी). १५ हे दयासागरा. १६ शस्त्राची. १७ रक्षणकर्ता. १८ ब्रह्मदेवाच्या. विधिच्या अधीन होउनि होगलिता न झालासि, त्राताचि [झालासी]-असा अन्वय. १९ मूर्खपणानें अथवा उधळेपणानें ऐश्वर्य घालविणारा, हारविणारा. ब्रह्मदेवानें गोकुळांतील गोप, गोधनें आणि वत्स यांस धरून नेलें, तेव्हां श्रीकृष्णानें तीं सर्व स्वसामर्थ्यानें पुनः निर्माण केलीं, पण ब्रह्मदेवास शरण गेला नाहीं, या गोष्टीस अनुलक्षून हें वर्णन आहे. २० यशाची पंक्ति. २१ गजेंद्रास वर देणाऱ्या (श्रीकृष्णा). इंद्रद्युम्नराजा अगस्तिमुनीच्या शापानें गजेंद्र झाला होता. त्याला विष्णूनें शापमुक्त केलें, या कथेस अनुलक्षून हें वर्णन आहे. २२ भ्रष्ट. २३ खोटें. २४ धर्मराज. २५ (सोंगट्यांच्या) डावास, फांशांच्या खेळाला.

[1]सुज्ञें [2]पंकपतितपरधेनूद्धरणें हि [3]धर्म [3]जोडावा. ॥ ७४
[4]भागा, या, गाय तसी मी, न धरी [5]अघभयास [6]हा [6]यवन ।
[7]गुरुजनसद पालक, परि झालें या निर्दया सहाय [8]वन. ॥ ७५
[9]कीर्त्यर्थ उद्धरीं मज, उद्धरिलें जेंवि सागरीं [10]महिला. ।
त्वद्दासांची होती त्या [11]अमृतीं, आजि या गरीं [12]महिला. ॥ ७६
बा ! [13]ढळतां तिळ हि पदर [14]भावि [15]व्यजनासि [16]साग [17]रामा जी, ।
[18]ती खळसभेंत उघडी पडल्ये, न पडोनि सागरामाजी. ॥ ७७
भो भगवन् ! भो वत्सल ! भो [19]हतचाणूरमल्ल ! [20]भागावें. ।
[21]विश्वें तुझें चि, दुसरें न, यश [22]श्रीप्राणवल्लभा ! [23]गावें. ॥ ७८
आजि [24]असत्परपुरुषस्पर्श न अपराध अन्य केला हो ! ।

---

१ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २ चिखलांत पडलेल्या दुसऱ्याच्या धेनूचा उद्धार केल्यानें. जरी दुसऱ्याची गाय चिखलांत पडलेली असली, तरी तिला चिखलाबाहेर काढल्याच्या योगानें. ३ पुण्यांश संपादावा. ४ श्रम घ्या, कष्ट करा. मला संकटांतून सोडविण्याची खटपट करा–असा भावार्थ. येथें 'भागाया' असा एक शब्द घेतल्यास 'भागण्यासंबधें, दुःखांत पडून कष्टी होण्याच्या बाबतींत' असा अर्थ करावा. ५ पापभयाला. ६ हा यवनासारखा दुष्ट दुःशासन. अशा प्रकारच्या दृष्टांतांवरून पंतांच्या वेळच्या समाजस्थितीची थोडी कल्पना होते. पंतांनीं असे दृष्टांत अन्यत्रही योजिले आहेत. (१) रायासि बायको मी सांपडलें, जेंवि गाय गा! यवना। (ध्रुवचरित्र). (२) सांपडला त्या असुरां कच, जैसा वत्स एकला यवना. ॥ (आदिपर्व–अध्याय ९।२५). ७ पूज्य लोकांची सभा. 'गुरुजन सत्पालक परि झाले या निर्दया सहाय वन' असाही पाठ आहे. ८ अरण्य. निर्दया (क्रूर मनुष्याला) वन साहाय्य होतें, त्याला अरण्यांत वाटेल तें दुष्कृत्य करितां येतें, त्याप्रमाणें. ९ कीर्तीसाठीं. १० पृथ्वीला. कथासंदर्भः–ब्रह्मदेवाच्या नासिकेंतून उत्पन्न झालेल्या हिरण्याक्ष नामक दैत्यानें पृथ्वीला पाताळांत घातलें होतें. म्हणून विष्णूनें त्या दैत्याच्या वधार्थ वराहरूप घेऊन समुद्रांत एक हजार वर्षें त्याच्याशीं युद्ध केलें व त्यास मारून, त्यानें पाताळांत घातलेली पृथ्वी दाढेच्या अग्रभागानें उचलून पूर्वस्थानीं स्थित केली–अशी कथा आहे. ११ तशा विलक्षण सुखांत. त्वद्दासांची (तुझ्या दासांची, पांडवांची) महिला (भार्या, मी द्रौपदी) [आजपर्यंत] त्या अमृतीं (मोठ्या आनंदांत) होती, [परंतु] आजि (आज) अशा गरीं (विषासारख्या असह्य विपत्तींत) पडली आहे–असा अन्वयार्थ. १२ भार्या. १३ सरकला असतां. १४ मानी, गणी. १५ पंख्यास. १६ अपराधी. (स+आग=अपराधासह). १७ सुंदर स्त्री. १८ पंख्याच्या वाऱ्यानें आंगावरचा पदर किंचितही सरकला, तर जिला त्या पंख्याचा मोठा अपराध झाला असें वाटावें आणि राग यावा, ती मी (द्रौपदी) आज दुष्टजनांच्या सभेंत अगदीं उघडी पडत आहें, ह्यापेक्षां समुद्रांत बुडतें तर कांहीं वाईट झालें नसतें–असें तात्पर्य. गीति ७६।७७ यांत 'विषमा'लंकार आहे. १९ मारला आहे चाणूरमल्ल ज्यानें. चाणूर हा कंससभेंतील एक बलाढ्य मल्ल; धनुर्यागनिमित्तानें कृष्ण मथुरेस गेला होता, तेव्हां त्यानें या मल्लास मारिलें. (भागवत–स्कंध १० अध्याय ४४). २० कष्टी व्हावें, तसदी घ्यावी; अर्थात् धांवून यावें, पळत यावें. २१ जगानें. 'विश्वीं' असें पाठांतर. २२ हे लक्ष्मीच्या प्राणप्रियकरा! २३ लोकांनीं गावें. २४ दुष्ट परकी पुरुषाचा स्पर्श.

झांका प्रसादपदरें न [1]कुजनदृक्स्पर्श [2]कन्यकेला [3]हो.' || ७९
अवतरला उतराया जो दुःसह [4]दुष्टभार [5]महिवरला, |
[6]अहिवरलास्यपटु प्रभु [7]करुणोक्तें द्वारकेंत गहिवरला. || ८०
परमेश्वर रूप धरी [8]स्वपरजनहितोदया [9]लुगडियांचें, |
निववाया सभ्यांसह नयन मन हि तो दयालु [10]गडियांचें. || ८१
हा [11]अंबरावतार [12]श्रितलज्जारक्षणार्थ [13]अकरावा. |
प्रभुमत असे, '[14]सदवनीं आग्रह [15]वेषीं कदापि न करावा.' || ८२
शेले, शालू, साड्या, [16]क्षीरोदक, लांब रुंद [17]पाटावें, |
झाला अनंत वस्त्रें, कीं, तीस अनाथसें न वाटावें. || ८३
[18]पदसेवार्थ चि भजती [19]अनवरत [20]महाविभूति [21]ज्या [22]निपटें, |
तो [23]कृष्णावपु झांकी होऊनि [24]महाविभूतिजानि [25]पटें. || ८४
पहिलें [25]वसन [26]व्यसनप्रतिपादनपटु करें [27]कुमति सोडी, |
तों दुसरें आहे चि [28]प्रथमाधिक वस्त्र, त्यास ही ओढी. || ८५
[29]कृष्णादेहसद[30]म्बररत्नाकर त्यासि [31]खळभुजा [31]टिटवी |
उपसी, परि [32]गांभीर्यें आपण न '[33]उंहूं' म्हणोनि [34]तो [35]विटवी. || ८६

---

१ दुर्जनाच्या दृष्टीचा स्पर्श. २ 'क' ह्या प्रत्ययाचे योगानें वात्सल्य, अनुकंपा व अल्पत्व यांचा बोध होतो. ३ होवो. ४ दुष्टांचा भार. ५ पृथ्वीवरचा. ६ अहि (सर्प)+वर(श्रेष्ठ)+लास्य (नृत्य)+पटु (कुशल)= सर्पश्रेष्ठ जो कालिय, त्याच्या फणांवर नृत्य करण्यांत कुशल असा. ७ द्रौपदीच्या करुणापर भाषणानें. ८ आपल्याविषयीं तत्पर अशा स्वभक्तांचें हित व्हावें म्हणून. ९ लुगड्यांचें, वस्त्रांचें. १० मित्रांचें. पांडवांचे नयन व मन शांत करण्याकरितां परमेश्वर वस्त्रावतार धरी. ११ वस्त्ररूप अवतार. १२ आश्रितजनांच्या लज्जेचें रक्षण व्हावें म्हणून. १३ मत्स्य, कूर्म, वराहादिक दहा अवतार आहेत, म्हणून हा वस्त्रावतार अकरावा. १४ साधूंच्या रक्षणार्थ. (सत्+अवन=रक्षण). १५ वेष धारण करण्याविषयीं; अमुक वेष धारण करावा आणि अमुक वेष धारण करूं नये असा. येथें 'अर्थान्तरन्यासा'लंकार आहे. १६ पांढरें पातळ. १७ चित्रविचित्रांकित रेशमी वस्त्रें. १८ पदसेवा घडावी म्हणून. १९ नित्य, अखंड. २० मोठे ऐश्वर्यवंत, महाविभूति ज्यांची ते. २१ श्रीकृष्णाला. २२ केवळ. २३ द्रौपदीचा देह. ज्या महाविभूति निपट पदसेवार्थंचि अनवरत भजती, तो महाविभूतिजानि पट होऊनि कृष्णावपु झांकी–असा अन्वय. २४ महाविभूति (लक्ष्मी) आहे जाया ज्याची, तो (कृष्ण). २५ वस्त्र. २६ दुःख देण्यांत कुशल. २७ दुष्टबुद्धि (दुःशासन). २८ पहिल्यापेक्षां जास्त उंची. २९ द्रौपदीचा देह हाच उत्तम वस्त्रांचा सागर. ३० अंबर=वस्त्र. रत्नाकर=सागर. ३१ दुष्ट दुःशासनाचा हात हीच टिटवी पक्षीण. ३२ गंभीरपणानें, (उपमेकरितां) खोलपणानें. ३३ नको. ३४ वस्त्ररूप समुद्र. ३५ त्रासवी, कंटाळवी, जर्जर करी. तो (वस्त्रांचा सागर) आपण, 'उहूं' (मला उपसूं नको) [ असें ] न म्हणोनि [ त्या टिटवीस ] विटवी–असा अन्वय. येथील रूपक अत्यंत सरस व हृदयंगम आहे.

मानिति [1]माया केवळ अल्प सभेंतील भूमितळ पट हो ! ।
म्हणति [2]अदित्यादि सत्या, '[3]या मेल्यांचें समूळ [4]तळपट [5]हो.' ॥ ८७
जें झांकिलें अनंतें दिव्यें भव्यें [6]सुंदबरें [7]सुघडें, ।
तें [8]साधुकाय काय [9]क्षुद्रमति करील नागवें उघडें ? ॥ ८८
[10]तो शतशः पट झटझट फेडुनि [11]भागे, सभेंत वेडावे, ।
किति [12]खळबळ ? जलनिधिचे किति [13]दुस्तरतर [14]तरंग [15]फेडावे ? ॥ ८९
होय सभेंत [16]हळहळा-स्वन, कृष्णेसि प्रशंसिती राजे; ।
'छी !' ते हि खळासि म्हणति, गेले [17]भवनदपरप्रतीरा जे. ॥ ९०
भीम म्हणे, 'राजे हो ! तरि [18]पूर्वजगति न हो मला, [19]परिसों, ।
जरि [20]दुःशासनवक्षःक्षतज न सेवीन मी स्वयें [21]हरि-सा.' ॥ ९१
सभ्य सकळ '[22]साधु !' म्हणति भीमातें; 'धिक्' खळास ही म्हणती, ।
हरि ! हरि ! [23]हरि-हरिणांत चि [24]त्यांची केली च त्या [25]जनें [26]गणती. ॥ ९२
तेव्हां विदुर [27]म्हणे, "हो ! [28]प्रश्नोत्तर द्या, न सत्य बुडवावें, ।
कीं [29]देवभोग्य [30]दाम न [31]बाळें सुज्ञांसमक्ष तुडवावें. ॥ ९३
[32]प्रऱ्हादसुत विरोचन, विप्र सुधन्वा सुशील [33]आंगिरस, ।

---

१ पट माया (मावण्यास) सभेंतील भूमितळ (भूमीचा पृष्ठभाग) केवळ अल्प (असें जन) मानिति-असा अन्वय. २ कश्यपाची भार्या अदिति इत्यादि थोर थोर पतिव्रता स्त्रिया. ३ या हतभाग्य दुःशासनादि दुष्टांचें. ४ सत्यनाश. पंतांच्या विराटपर्वांतही असाच उद्गार आहे:-'कृष्णाहि म्हणे, मेल्या अक्षकरांचें समूळ तळपट हो ।' (अध्याय ६।७८). ५ होवो. ६ सुंदर वस्त्रानें. ७ चतुरें, चांगली घटना (रचना) करणाऱ्यानें. ८ उत्तम देह, द्रौपदीचें पवित्र शरीर. ९ दुष्टबुद्धि, नीच (दुःशासन). १० ह्या गीतींत 'अतिशयोक्ति' नामक अलंकार आहे. ११ थके, दमे. १२ दुष्टाचें सामर्थ्य. १३ तरण्यास अतिकठिण. १४ लाटा. १५ निवारावे, दूर करावे. जणूं काय त्याला समुद्राच्या लाटांचेंच निवारण करावें लागत होतें-असा भाव. १६ हाहाकार, 'हा ! हा !' असा शब्द. स्वन=निनाद, गर्जना. १७ संसाररूप नदीच्या परतीराला. १८ पूर्वजांस मिळालेली गति, पितामहादिकांची गति. (अध्याय ६८ श्लोक ५१-५३). १९ ऐका. २० दुःशासनाच्या उरांतील रक्त. (क्षतज=रक्त). २१ सिंहासारखा. २२ शाबास, चांगलें, वाहवा. २३ सिंह आणि हरिण यांत. २४ भीमदुःशासनांची. (भीम=सिंह; दुःशासन=हरिण). येथें 'यथासंख्य' नामक अलंकार आहे. २५ त्या सभ्य जनांनीं. २६ गणना. २७ अध्याय ६८ श्लोक ५९-८८ पहा. ही विदुरानें सांगितलेली प्रऱ्हादाची कथा अत्यंत मनोरम व बोधप्रद आहे. हींत असत्य बोलण्याच्या संबंधानें कश्यपानें जें सांगितलें आहे, तें लहान मुलांकडून मुद्दाम पाठ करवून घेण्यासारखें आहे. २८ द्रौपदीच्या प्रश्नाचें उत्तर. २९ देवांनीं उपभोग घेण्यास योग्य. ३० माला, फुलांचा हार. ३१ मूर्खानें. ३२ प्रऱ्हाद हा हिरण्यकशिपूचा पुत्र, आणि दैत्यांचा स्वामी. याच्या पुत्रांतील एकाचें नांव विरोचन. ३३ अंगिरा ऋषीच्या पुत्रांतील एक (सुधन्वा).

[1]प्राणपणवृत्त यांचें परिसा हो ! यापुढें अमृत [2]विरस. ॥ ९४
[3]स्वकरग्रहणोद्युक्तां त्या [4]दोघांला हि [5]केशिनी कन्या ।
प्रार्थुनि म्हणे, 'भजेन[6], श्रेष्ठ[6] उभयतांत जो, [6]तया धन्या.' ॥ ९५
'मी वर,' म्हणे सुधन्वा कीं साक्षात् तात अंगिरा ज्याचा; ।
'मी वर,' म्हणे विरोचन कीं तो सुत [7]साधुसंगि राजाचा. ॥ ९६
'श्रेष्ठ नव्हेसा झालों तरि [8]यावज्जीव मी तुझा दास' ।
ऐसा [9]प्राणपण तिहीं केला, हो ! करुनियां [10]विवादास. ॥ ९७
विप्र म्हणे, 'चाल, पुसों दोघे ही हें तुझ्या चि बापाला, ।
मज मान्य [11]तदुक्त असे, कीं तो भीतो [12]अकीर्ति-पापाला.' ॥ ९८
प्रऱ्हादास म्हणे मुनि, 'जें सत्य असेल सांग [13]कविपा ! तें ।
वदतां [14]अयथार्थ तुझा [15]मूर्धा शतधा फुटेल [16]पवि-पातें.' ॥ ९९
[17]जाय पुसाया [17]त्यातें, ज्या [18]सुतपोराशि कश्यपा दास ।
जितसे [19]षडरि भजति, [20]यमनियम हि, होऊनि [21]वश्य पादास. ॥ १००
प्रऱ्हाद म्हणे, 'स्वामी ! वक्ता अस्पष्ट कीं [22]मृषा वक्ता ।
[23]प्रेत्यगति कसी त्याची ? हें सांगावें तुम्हीं मला भक्ता.' ॥ १०१
कश्यप म्हणे, 'कळोनि न बोले जो स्पष्ट त्यास वरुणाचे ।
[24]दशशत पाश करकरुनि बांधिति [25]पापकृददृष्टकरुणाचे. ॥ १०२
जो साक्षी अनृत वदे, वत्सा ! त्याची हि होय ती [26]च [26]गती; ।

---

१ प्राणाचा आहे पण ज्यांत असें वृत्त. २ नीरस, बेचव. ३ आपला विवाह करण्याविषयीं उत्सुक अशांस. ४ विरोचन आणि सुधन्वा यांना. ५ या नांवाची एक राजकन्या. ६ कुलशीलादिकेंकरून जो श्रेष्ठ असेल त्याच्याशीं विवाह करीन. ७ साधूंचा सहवास ज्याला आहे अशा राजाचा (प्रऱ्हादाचा). ८ जिवंत आहें तोंपर्यंत. ९ पराजितानें यावज्जीव जिंकणाराचें दास्य करावें, असा पण. १० विवाद=भांडण, तंटा. ११ त्याचें (प्रऱ्हादाचें) भाषण. १२ दुर्लौकिकरूप पातकाला. १३ कविश्रेष्ठा. १४ असत्य, मृषा. १५ मस्तक. १६ वज्रपातानें. १७ प्रऱ्हाद कश्यपाला पुसावयास जाई. ज्या सुतपोराशि कश्यपा षडरि जितसे दास (जिंकलेल्या दासाप्रमाणें) होऊनि भजती [व] वश्य होऊनि [ज्याच्या] पादास यमनियमहि भजती त्यातें (त्या कश्यपातें) पुसाया जाय—असा अन्वय. १८ उत्तम तपाचा सांठाच असा जो कश्यप त्यास. १९ कामक्रोधमोहादि सहा शत्रु. २० यम=इंद्रियाकलन, नियम=व्रत, धर्माचरण करण्याविषयीं निर्धार. २१ स्वाधीन. २२ असत्य. २३ मरणोत्तरगति. २४ हजार. २५ पापकृत्+अदृष्ट+करुणा=पाप करणाऱ्याविषयीं न पाहिली आहे करुणा ज्यानें अशाचे. (हें वरुणाचें विशेषण). २६ त्यालाही वरुण हजार पाशांनीं बांधितो.

वर्षान्तीं एक[1] सुटे, एवं[2] च सहस्र अब्द[3] ते[4] तगती[5]. ॥ १०३

जेथें धर्मिष्ठाला खोटेपण[6] लावितो स्वयें खोटीं[7], ।
तेथ अवचनें[8], अनृतें[9], संदिग्धें[10], घात[11] होतसे मोटी[11]. ॥ १०४

हें धर्मशल्य[12] दूर न करितां, दुरितार्ध[13]भाग भर्त्याला[14] ।
उरल्या दुरितार्धाचा सभ्यांला[15] पाद[16], पाद कर्त्याला. ॥ १०

भूत[17]पुरुष सप्त, तसे भावी[18] ही सातजण, असे चवदा ।
वदतां[19] अनृत बुडवि[20]तो, याकरितां साधु हो ! खरें च वदा. ॥ १०

हृतधन[21], हृतपुत्र[22], ऋणी[23], व्याघ्रनृपग्रस्त[24], साक्षिहत[25], वा[26] ! हे ।
समदुःख, असी च स्त्री सुतहीना[27] कीं जिला सवत आहे; ॥ १०७

हीं दुःखें पडति गळां त्याच्या, जो पुरुष बोलतो लटिकें; ।
वत्सा[28] ! पळ हि विनोदाकरितां हि तशासमीप तूं न टिकें. ॥ १०८

प्रार्थुनि आज्याला[29], ज्या रायें[30] माजानिसेवकें[31] उक्ती ।
आयकिल्या, त्या वरिल्या[32], भवतारि[33] देवर्षिंच्या[34] जशा युक्ती. ॥ १०९

---

१ वर्ष झालें म्हणजे एक पाश सुटतो. २ याप्रमाणें. ३ वर्षें. (अध्याय ६८ श्लोक ७४-७६). ४ पाश. ५ टिकतात, राहतात. ६ अधर्मत्व. ७ अधार्मिक, अधर्मशील. ८ मुकेपणानें. ९ मिथ्याभाषणानें. १० संशयभूत (अस्पष्ट) अशा वचनानें. ११ मोठें पाप लागतें. जे सभासद अवचनानें, मिथ्यावचनानें किंवा संदिग्धवचनानें धर्मशल्य तोडून टाकणार नाहींत, ते अधर्मविद्ध होतील-असा भाव. १२ धर्माच्या आड येणारें बाधक कृत्य. १३ पापाचा अर्धा वांटा. १४ सभापतीला, सभेच्या अध्यक्षाला, सभासदांतील श्रेष्ठ पुरुषाला. १५ सभासदांना. १६ पाव हिस्सा, चवथाई. १७ मागील सात पुरुष, सात पूर्वज. १८ पुढील सात पुरुष. १९ 'वदता अनृत बुडवितो' असें पाठांतर. २० असत्य बोलणारा, वितथ धर्म सांगणारा. खोटें बोलणाऱ्याला हीच शिक्षा अन्यत्रही सांगितलेली आहे:-'पृष्टो हि साक्षी यः साक्ष्यं जानानोऽप्यन्यथा वदेत्। स पूर्वानात्मनः सप्त कुले हन्यात्तथा परान्. ॥' (आदिपर्व, अध्याय ७।३). २१ ज्याच्या धनाचा कोणी अपहार केला आहे असा. २२ ज्याचे पुत्र मेले तो. २३ कर्जानें पीडलेला. २४ व्याघ्रानें किंवा राजानें ग्रासिलेला. २५ साक्षीदारांनीं ज्याचा घात केला तो. २६ 'वा' असें पाठांतर. वा=किंवा. २७ निःसंतान, निपुत्रिक. २८ हे प्रल्हादा. २९ प्रल्हादाचा आजा जो कश्यपमुनि त्याला. कश्यपाची स्त्री दिति हिच्या ठायीं प्रल्हादपिता हिरण्यकशिपु झाला. ३० प्रल्हादानें. 'राज्या' असा रा० पराडकर यांच्या प्रतींत पाठ आहे. ३१ मा (लक्ष्मी) जाया (भार्या) ज्याची तो विष्णु, त्याचा सेवक (प्रल्हाद) त्यानें. 'जायाया निङ्' (पाणिनि ५।४।१३४) या सूत्रानें 'जाया' शब्दाला बहुव्रीहि समासांत 'जानि' असा आदेश होतो; जसें जानकीजानि (म्हणजे-ज्याची जाया जानकी आहे तो). ३२ स्वीकारिल्या. ३३ संसारसमुद्रामध्यें नौकारूप. ३४ नारदाच्या.

प्रल्हाद म्हणे, 'पुत्रा[1]! आवडतो धर्म, तेंवि तूं न मज; ।
तुजपरिस हा सुधन्वा श्रेयान्[2], स्वमनांत हें बरें समज. ॥ ११०
याचा चि पिता[3] श्रेयान्, न तुझा श्रेयान् पिता, तुझी माता ।
न श्रेयसी तसी, जसि याची माता, यथार्थ हें ताता[4]! ॥ १११
त्वत्प्राणेश[5] सुधन्वा, जा दास्य करीं जपोनि आमरण[6], ।
विप्रचरणपरिचरण[7] चि कामद[8], पुरवील काय काम[9] रण?' ॥ ११२
विप्र[10] म्हणे, 'साधो[11]! त्वां त्यजिला नंदन[12] हि, धर्म न त्यजिला; ।
घे सुत[13] दिला.' तिला कां न जपेल मुकुंद? मान्य सत्य जिला[14]. ॥ ११३
ऐसी कथा[15] असे हो! उपेक्षितां जीवनासि[16] गाय[17] मुके, ।
मौनशिशुचे[18] चि घेतां त्यागुनि सत्यामृतासि[19] काय मुके[20]?" ॥ ११४
आर्येला[21] मानियलें बहु, पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला[22] ।
खळ चि न मानिति जैसे[23], बहुदूषणसज्ज[24] नीच मत्कृतिला[25]. ॥ ११५
कोण्ही हि दयाळु न ती त्या पंकांतूनि गाय[26] काढी गा! ।

---

१ हे विरोचना. २ श्रेष्ठ. ३ अंगिरा ऋषी. ४ अरे बाबा! हे मुला! 'पुत्रे पितरि पूज्ये च तातशब्दं प्रचक्षते' [घंटापथटीका]. बाप तात इत्यादि शब्द जरी जनकवाचक आहेत, तरी त्यांचा प्रयोग 'वत्स' ह्या अर्थीं केलेला आढळतो म्हणून ते शब्द प्रेम, वात्सल्य यांचे दर्शक समजावे. ५ तुझ्या प्राणांचा स्वामी. ६ मरण येईपर्यंत. ७ ब्राह्मणांच्या पायांची सेवा. ८ इच्छा परिपूर्ण करणारी. ९ इच्छा. १० सुधन्वा. ११ हे प्रल्हादा. १२ पुत्र. १३ तुझ्या पुत्राच्या प्राणावरचें स्वामित्व मीं सोडून दिलें—असा भाव. १४ द्रौपदीला. मग द्रौपदीचा पक्ष सत्यास धरून आहे, तिचें दुष्टांपासून संरक्षण ईश्वर कां करणार नाहीं?—असा भावार्थ. १५ विरोचन, सुधन्वा आणि केशिनी यांची कथा महाभारतांतील उद्योगपर्वाच्या ३५ व्या अध्यायांत सविस्तर दिली आहे. १६ जिवाला. १७ ही गाईसारखी दीन द्रौपदी. १८ मौनरूप पुत्राचे. सत्यामृतासि त्यागुनि मौनशिशुचेच्चि मुके घेतां काय?—असा अन्वय. खरें बोलावयाचें टाकून चूप बसणार कीं काय?—असा भावार्थ. १९ सत्यरूप अमृताला. २० चुंबनें. २१ द्रौपदीला. (पक्षीं) पंतांनीं रचिलेल्या आर्यावृत्तांतील ग्रंथांना. २२ भगवंतांनीं वस्त्रें पुरवून केलेल्या चमत्काराला. (पक्षीं) पंतांच्या काव्यांतील अर्थचमत्कार व शब्दचमत्कार यांना. २३ 'तैसे' असें पाठांतर. २४ अनेक दूषणें देण्यास तत्पर. (पक्षीं) साहित्यशास्त्रांत सांगितलेले कवितेंतील दोष काढण्यांत पटाईत. २५ माझ्या (विदुराच्या) मताला; (पक्षीं) माझ्या (मोरोपंताच्या) काव्यकृतीला. ह्या पद्यांत 'श्लेषा'लंकार आहे. द्रौपदीस नग्न करण्याचा यत्न विफळ झाला असतां व वस्त्रपरंपरेचा चमत्कार सर्वांनीं पाहिला असतां सज्जन व दुर्जन यांस कसकसें वाटलें, तें पंतांनीं येथें मोठ्या खुबीनें वर्णन केलें आहे, व त्यांतच आपल्या कवितेच्या दूषकांवरही कोरडा ओढिला आहे. २६ त्या पंकांतूनि ती गाय काढी [असा त्या सभेंत] कोण्हीहि दयाळु न—असा अन्वय. 'चिखलांत पडलेली—रुतलेली—गाय' अनुकंपार्ह असते. 'पंकांत दैवयोगें जी, पावलिया श्रमा, रुते गाय, । तीचा उद्धर्ता जो, त्यासि सकळ लोक मारुते! गाय' ॥ (नामरसायन—गीति ३८).

मी कृष्णा त्या मूर्तीं[1] पापांच्या त्रासदायका ढीगा. ॥ ११६
देवी म्हणे,[2] 'रहा क्षण, करिसी निरयार्थ[3] काय जोडि,[4] खळा ! ।
सभ्योक्त[5] आयकों दे, रे! न शिळेलां[6] अपाय जो डिखळां[7]. ॥ ११७
पुसिलें तें सांगा जी ! अजि सभ्य ! तुह्मांसि विनविलें नमुनी ।
न वदावें हें सद्व्रत,[8] परि यांसि[9] सभेंत आणिती न मुनी.[10]' ॥ ११८
ऐसें वदतां, वोढुनि पाडी,[11] ओढी तशा हि पतितेतें,[12] ।
विषसें गिळिती तीचें पडणें रडणें तदीय पति ते तें. ॥ ११९
कृष्णा[13] म्हणे,[14] 'अहा ! जी ! द्रुपदसुता, धर्मनृपतिची भार्या, ।
श्रीमद्यदुनाथसखी,[15] मानवल्या[16] सर्वदा जिला आर्या;[17] ॥ १२०
तीला खळ ओढितसे वात हि न विशंकें[18] जीस आतळलीं;[19] ।
न व्हता ताप, कटाहीं[20] जरि असता सुचिर काय हा[21] तळला. ॥ १२१
केला तप्त अनघजन[22] तैलाच्या तापल्या हि न कटाहें, ।
कुरुगुरु धन्य ! सहाता न जनें धिक्कारिला हि नकटा[23] हें. ॥ १२२
कष्टें सांचविलें यश बुडवितसे मंद[24] मत्त,[25] पाहूनी ।

---

१ मूर्तिमान् पापांच्या राशीला (दुःशासनाला). 'ढीग' हा शब्द कोंकणांतील कुळंबी लोकांच्या प्रचारांतील आहे. येथील यमक पंतांचें आवडतें दिसतें. (द्रोणपर्व, अध्याय १८।४८). २ अध्याय ६९ पहा. ३ नरकप्राप्तीकरितां. ४ साधन, सिद्धता. ५ सभासदांचें भाषण. ६ दगडाला. मातीच्या डिखळाला अपाय होण्याची भीति असते तशी दगडाला नसते; तेव्हां तुला जर सत्याचें बळ असेल, तर तुला सभासदांच्या भाषणानें भय वाटण्याचें कारण नाहीं. यासाठीं सभासद काय ह्मणतात तें ऐकूं दे तर खरें, त्यांत तुझें नुकसान नाहीं—असा भावार्थ. ७ मातीच्या ढेंकुळाला. ८ मौन धारण करणें हें उत्तम व्रत आहे खरें, तथापि मुनी तें व्रत सभेंत पाळीत नाहींत. (भाषण करितात)—असा भावार्थ. ९ या मौनव्रतास. १० मौनी, मौनव्रताचारी तपस्वी. 'मौनान्न न मुनिर्भवति न अरण्यवसनान्मुनिः। स्वलक्षणं तु यो वेद स मुनिः श्रेष्ठ उच्यते ॥ अर्थ—मौनव्रत पाळलें म्हणजे कोणी मुनि होत नाहीं, किंवा अरण्यांत राहिल्यानेंही मुनि होत नाहीं. ज्यानें आत्मस्वरूप जाणलें, तोच मुनिश्रेष्ठ होय. (उद्योगपर्व—अध्याय ४३।६०). ११ दुःशासन द्रौपदीला ओढूनि पाडी. १२ पडलेलीस. १३ द्रौपदी. ही द्रुपदराजाची कन्या. हिला पित्याच्या नांवावरून पांचाळी व याज्ञसेनी अशीं नांवें होतीं. हिची अंगकांति गौरवर्णांत किंचित् श्यामतामिश्रित असल्यामुळें, द्रुपदराजानें हिचें नांव कौतुकानें कृष्णा असें ठेविलें होतें. १४ सभापर्व—अध्याय ६९ श्लोक ४-१३ पहा. १५ श्रीमान् यादवश्रेष्ठ कृष्णाची मैत्रीण. १६ मान देत्या झाल्या. १७ साध्वी स्त्रिया. १८ निःशंकपणें. १९ स्पर्शला. २० कढईंत. २१ हा माझा (द्रौपदीचा). जरि हा काय सुचिर कटाहीं तळला असता, तरि ताप न व्हता—असा अन्वय. न व्हता=न होता, झाला नसता. गीति १२०—१२१ यांत '**विषमा**'लंकार आहे. २२ निष्पाप जन. २३ कानफाट्या, ज्याला अभिमान किंवा अब्रूची चाड नाहीं असा मनुष्य. २४ मूर्ख. २५ माजलेला (दुःशासन).

साहति कसें, नवल हें ज्यांचें तप उग्र मत्तपाहूनी[1] ? ॥ १२३
सांगा यांची[2] दासी ? कीं मी दासी नव्हें ? मता निवडा,[3] ।
श्रवणीं[4] धरूनि सूक्ता[5] राजसभा[6] शोभते न तानिवडा.[7]' ॥ १२४
भीष्म म्हणे, 'गे बाई ! वदलों पहिलें चि, सूक्ष्म[8] धर्म-गती, ।
ज्ञात्यांला हि कळेना, इतरांसि कळेल काय गे ! मग ती ? ॥ १२५
बळवान्[9] वक्ता असतां होय अधर्म हि सुधर्मसा, धन्ये ! ।
दुर्बळ[10] वक्ता असतां, धर्म हि होतो अधर्मसा, कन्ये !' ॥ १२६
श्रीभीष्माशय[11] हा कीं, 'अजितीं[12] म्हणतां चि हे अतिक्रुद्धा ।
जाळील कौरवांतें, अन्यायें गांजिली सती शुद्धा. ॥ १२७
द्रौपद्यपमानज[13] कीं कुरुनाशज[14] दोष गुरु[15] ? न हें समजे. ।
कौरवनाशीं[16] चि होतो, उरतात उदंड दुष्ट यांसम जे. ॥ १२८
पांडव अशस्त्र केवळ परदास हि, धार्तराष्ट्र तत्स्वामी[17]; ।
कृष्णेस हि दोषावह तन्नाश[18], नसो कलंक तद्धामीं.[19] ॥ १२९
खळलय[20] होणार चि, मग तप बुडवावें किमर्थ सांचविलें ?' ।
ऐसें चिंतुनि भीष्में, स्पष्ट न बोलोनि, त्यांस[21] वांचविलें. ॥ १३०

---

१ माझ्या तपाहून. २ कौरवांची. ३ निर्णय करा. ४ कानांत. समानार्थक पद्य:—'श्रोत्रं श्रुतेनैव न कुण्डलेन दानेन पाणिर्न तु कंकणेन। विभाति कायः करुणापराणां परोपकारैर्न तु चंदनेन.॥ (भर्तृहरि—नीतिशतक—७२). येथें 'परिसंख्या'लंकार आहे. ५ उत्तम भाषणातें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ६ येथें 'राजसभा' ह्याचा अर्थ 'राजसभेंतील सभासद' असा लक्षणेनें घ्यावयाचा. ७ कर्णभूषणातें. ८ परम गहन. (मागें गीति २२ पहा). ९ कर्णदुर्योधनांसारखा वक्ता. १० दुर्बल पुरुषानें सांगितलेला जो धर्म, तो अधर्मासारखा होतो. (अ० ६९ श्लो० १५). ११ भीष्माच्या मनांतील अभिप्राय. १२ न जिंकिलेली असें ह्मटलें असतां ही द्रौपदी आपला अन्याय नसतां आपल्यास पीडा झाली ह्मणून रागावून कौरवांचा नाश करील. १३ द्रौपदीच्या अपमानानें झालेला. १४ कौरवांच्या नाशापासून झालेला. १५ मोठा. कोणता दोष महान् हें न कळे, कारण धर्मतत्त्व सूक्ष्म आणि दुर्ज्ञेय होय. १६ द्रौपदी क्रुद्ध झाली असतां, आज नुसत्या कौरवांचाच नाश होणार व मग इतर जे दुष्ट व पापी आहेत, त्यांचा नाश व्हावयाचा राहील—असा भाव. १७ त्या पांडवांचे स्वामी धृतराष्ट्रपुत्र. १८ पांडवांचे स्वामी जे कौरव त्यांचा नाश द्रौपदीला देखील दोषावह होय; स्वामिस्वामिनाश होणें हें अत्यंत अकार्य आहे. १९ तिच्या तेजाचे ठिकाणीं. जर द्रौपदीच्या क्रोधामुळें कौरवांचा नाश झाला, तर त्याचा दोष तिच्यावर येईल. म्हणून त्यांचा नाश न होवो व ती निष्कलंक राहो—असा भावार्थ. 'धाम शक्तौ प्रभावे च तेजोमन्दिरजन्मसु' इति विश्वः. २० दुर्योधनादि दुष्टांचा नाश अवश्य होणारच, मग तपोव्यय काय म्हणून करावा ? २१ कौरवांस.

'जें व्यसनीं सद्वृत्त[1] त्यागावें तें च कर्म अति नीच ।
अत्याज्य[2] धर्मपथ, हें तुज कथिलें, न वदतां हि, पतिनीं[3] च. ॥ १३१
वत्से ! सत्सेव्य[4] त्वत्-सत्वा दृग्दोषलव[5] नसो, सकता ।
न सहाया शांत हि या व्यसना, अन्यत्र हे न सोसकता[6]. ॥ १३२
सांगो धर्म जिता तूं कीं अजिता हें, प्रमाण तें चि सती; ।
सत्त्वसुधानदि[7] कृष्णे ! व्यसुसे[8] द्रोणादि सभ्य हे दिसती.' ॥ १३३

---

## अध्याय संहावा[9].

दुर्योधन हि म्हणे[10], 'गे ! धर्मास 'अनीश[11] अनृत[12]' हे चवघे[13] ।
तव धवें[14] भीमादि मुखें म्हणोत, ऐकोत सभ्य हे अवघे. ॥ १
येणें[15] चि दासभावापासुनि तूं पावसील सुटकेला. ।
अस्मत्प्रसादकारण[16] हें चि, न शतवार[17] पाणिपुट[18] केला. ॥ २
कीं 'मी अनीश्वर[19]' असें धर्म ह्मणो साधुरीतिस त्यजुनी, ।
आवडती[20] तूं चि नवी, बहु नावडती च होय सत्य जुनी. ॥ ३
काय वदतील सभ्य[21] ? व्याकुळ झाले तुझ्या चि तापानें, ।
कीं एकदां[22] चि फुटलें त्वत्पतिपंचककपाळ[23] पापानें.' ॥ ४

---

१ साधुवर्तन. संकट आलें असतां घाबरून कुपथाचें अवलंबन करणें, हेंच मोठें पाप होय–असा भाव. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २ न टाकण्याजोगा. ३ पांडवांनींच. ४ साधूंनीं सेवा करण्यास योग्य असें जें तुझें सत्त्व त्यास. ५ दृष्टीच्या दोषाचा लव. दृष्ट न लागो–असा अर्थ. ६ सोसकपणा, सहनशीलता. ७ सत्वरूप अमृताची नदीच अशा कृष्णे ! ८ प्राणरहित असे. (वि+असुसे). ९ ह्या अध्यायांत मूळांतील ७०–७६ अध्यायांचा सारांश आला आहे. इतकाच कथाभाग मुक्तेश्वरांनीं आपल्या सभापर्वाच्या १५ व्या अध्यायाच्या उत्तरार्धांत व १६ व्या अध्यायाच्या पूर्वार्धांत वर्णिला आहे. १० सभापर्व–अध्याय ७० श्लोक ३–६ पहा. ११ हा आमचा नाथ (ईश=स्वामी) नव्हे असें. १२ असत्यवादी असें. १३ भीम, अर्जुन, नकुळ, सहदेव. १४ पति. १५ या अशा भाषणानें. १६ भीमादि चौघांनीं धर्म आमचा स्वामी नव्हे व तो खोटा आहे, असें ह्मणावें हेंच (ही गोष्ट) आमची (तुजवर) कृपा होण्यास कारण आहे; परंतु शंभर वेळ हात जोडिल्यानें आमचा प्रसाद व्हावयाचा नाहीं. १७ शंभर वेळ जरी हस्तपुट केला, तरी आमच्या प्रसादास हेतु नव्हे–असा भाव. १८ पाणिपुट करणें=हात जोडणें. पुट=कोणत्याही वस्तूचा द्रोणाच्या आकारासारखा आकार करितात तो. जसें:=अंजलिपुट, श्रवणपुट, कर्णपुट, पर्णपुट. १९ अनाथ. २० तूं (द्रौपदी) नवीन म्हणून आवडती व साधुरीति जुनी ह्मणून नावडती होईल, अर्थात् धर्म साधुरीति सोडून, तुझा स्वीकार करील–असा भाव. हें भाषण औपरोधिक आहे. २१ सभासद. २२ एकदम, एकाच वेळीं. २३ तुझ्या पांच पतींचें कपाळ (दैव.)

त्या दुर्योधनवचनें [1]खळबळलें [2]तदनुजादिखळबळ तें, ।
जैसें श्रवणीं पडतां साधूक्त [3]पिशाचकटक खळबळतें. ॥ ५

**धर्मा**कडे चि पाहत होते ते सुजन कुजन ही, परि तो ।
किमपि न वदला, बहुधा [4]समयीं [5]समयज्ञ मौन ही धरितो. ॥ ६

**भीम** म्हणे, '[6]अस्मदसुप्रभु **धर्म**, नृपेंद्र हा नव्हे लटिका, ।
नसतें [7]असें, तरि मला तुमच्या [8]मथना न लागती घटिका. ॥ ७

कपटद्यूतीं अजित हि नृप जरि जित आपणासि मानील, ।
[9]मानूं तसें चि आम्ही, [10]अस्मद्रीतीस विश्व वानील. ॥ ८

हे **कृष्णा** तों अजिता, ऐसें हि असोनि साहतों [11]अ-नया ।
[12]गुरुवश नसतों तरि [13]अरिरुधिरांच्या कां विनिर्मितों न [14]नया ? ॥ ९

[15]हे काय अशक्त ? पहा या माझ्या वज्रतुल्य बाहूंतें, ।
यांच्या आकृतिला जें उचित, [16]भुजगराजतेज [17]बाहूं तें. ॥ १०

माते ! [18]क्षमे ! म्हणों दे या [19]त्वद्वशगा [20]मनुष्यदेवा 'हूं, ।
हो **भीम** पळ [21]विशृंखळ, खळखळ खळरक्तपूर दे वाहूं.' ॥ ११

[22]गुरु आज्ञा देता, तरि [23]अरिकरिहरि मी [24]सपत्न-शशकांतें ।
वधितों, काय श्रम मज मथितां या [25]धार्तराष्ट्र-मशकांतें ? ॥ १२

---

१ क्षुब्ध झालें. २ दुर्योधनाच्या अनुजादिकांचें (धाकट्या भावांचें) खळबळ (दुष्ट मंडळ). ३ भूतसैन्य, भूतांचा समूह. साधूचा शब्द ऐकिल्याबरोबर पिशाच्चाचा क्षोभ होऊन तें ज्याप्रमाणें खेळूं लागतें, त्याप्रमाणें दुर्योधनाचे भाषणानें दुष्टमंडळीस स्फुरण चढलें–असा भावार्थ. ४ संकट-समयीं. हा चरण सुभाषितरूप आहे. ५ कोणत्या वेळीं कसें वागावें हें ज्यास समजतें तो. 'मौनं सर्वार्थसाधकम्' 'मौनमुन्नतिकारकम्' अशीं सुभाषितवचनें आहेत. ६ आमच्या प्राणांचा स्वामी. ७ धर्म हा आमचा प्रभु नसता तर. ८ मर्दना, नाश करण्यास. ९ 'मानूं असेंचि' असें पाठांतर. १० आमच्या वर्तनास. 'अस्मद्धीतीस' असें पाठांतर. ११ अन्याय. १२ धर्माधीन. १३ शत्रूच्या रक्ताच्या. १४ नद्या. नदी=नही=नई. 'नई' हा शब्द वऱ्हाडांतील व मध्यप्रदेशांतील अशिक्षित लोक उपयोगांत आणितात. हा शब्द **पं**तांच्या द्रोणपर्वांत आढळतो. (अध्याय २०।८४). १५ हे बाहु. १६ शेषाचें सामर्थ्य. १७ म्हणूं, उपमा देऊं. या बाहूंच्या तेजाला ज्याची बरोबरी साजेल, तें वासुकि-तेजच म्हटलें पाहिजे. या तेजस्वी (पराक्रमी) बाहूंना केवळ तेजस्वी वासुकीचीच उपमा योग्य होय–असा भावार्थ. १८ हे सहनशीलते. येथें **'चेतनधर्मारोपोक्ति'** अलंकार आहे. (मागें अध्याय ५।१३ वरील टीप पहा). १९ तुला वश असणाऱ्या. २० धर्माला. २१ निर्बंध, उच्छृंखल, पाश-रहित. २२ धर्मराज. २३ शत्रुरूप गजांचा सिंह (भीमसेन). २४ शत्रुरूप ससांना (दुर्योधनादि-कांस). येथें **'रूपका'**लंकार आहे. २५ धृतराष्ट्रपुत्ररूप चिलटांना.

आज्ञा पुन्हा कशाला ? आहे पहिली च [1]गुरु [2]वराज्ञा, ते ।
न पुसति पुनः पुन्हा जे झाले सेवूनि [3]गुरुवरा [4]ज्ञाते.' ॥ १३

**भीष्म द्रोण विदुर** त्या क्रुद्धाला म्हणति, 'बा ! न कोपावें, ।
करिसील सर्व, सं[5]प्रति ह्मणतोसि तसें करूं नको, [6]पावें.' ॥ १४

**कर्ण** [7]म्हणे, 'हे च ति[8]घे [9]धर्मविलंघनसमर्थ, चवथा न, ।
यांसि तसें [10]पतिनिंदाव्यसन, जसें दे मुलांसि चव थान. ॥ १५

इच्छिति [11]मूलच्छेद स्वामीचा, न गणिती [12]महाघातें, ।
[13]व्याकुळ मनीं न होती, सुकृतयशांच्या अशा महा घातें. ॥ १६

**द्रौपदि** ! ऐक [14]मदुक्त [15]छात्र तनुज दास हे अधन; यांत ।
तूं [16]दासधन, **सुयोधन** [17]नाथ तुझा, स्पष्ट हें [18]स्मृति-नयांत. ॥ १७

[19]**दु**र्योधनदारचरणसंवाहननिरतबुद्धि हो भावें, ।
त्वन्नाथ **धार्तराष्ट्र**, न **पां**डव, [20]दीनीं तुवां [21]न [21]लोभावें. ॥ १८

अथवा [22]स्वपतिजयें जरि [22]आत्मजयातें न मानिशी [23]स्वमतें, ।
तरि तूं तरुणि [24]अपतिका, अन्य करीं कान्त हें भलें गमतें ! ॥ १९

---

१ मोठी. २ वररूप आज्ञा. ३ गुरुश्रेष्ठाला. ४ ज्ञानसंपन्न. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ५ सध्यां, विद्यमानकालीं. ६ आह्मांला पाव, प्रसन्न हो, क्षमा कर. ७ अध्याय ७१ श्लोक १-५ पहा. ८ भीष्म, द्रोण आणि विदुर. ९ धर्माचें उल्लंघन करण्यास समर्थ. १० स्वामीच्या (दुर्योधनाच्या) निंदेचें व्यसन. ११ समूळ नाश. १२ मोठ्या पापाला. (महा+अघातें. अघ=पाप). १३ पापाचरणानें व्यथित. १४ माझें वचन. १५ छात्र (शिष्य), पुत्र व दास हे तिघेजण अधन होत, त्यांचें धन असल्यास तें त्यांचें नसून त्यांच्या गुरूचें, पित्याचें आणि धन्याचें यथाक्रम होय. १६ दासाचें धन. (हें धन दासाच्या धन्याचें होय. येथें पांडव हे सुयोधनाचे दास, तेव्हां तोच या धनाचा स्वामी, अर्थात् द्रौपदीचा स्वामी सुयोधन). १७ धनी. १८ स्मृतिशास्त्र आणि न्यायशास्त्र ह्यांमध्यें. याविषयीं स्मृतिवचन आहे तें:-'त्रय एवाधना लोके भार्या दासस्तथा सुतः । यत्ते समधिगच्छन्ति यस्यैते तस्य तद्धनम् ॥.' भावार्थः-भार्या, दास आणि पुत्र हीं तीन लोकांत अधन होत. हीं ज्यांपाशीं असतात त्यांचीं तीं धनें होत. १९ दुर्योधनाच्या बायकोचें चरणमर्दन करण्याविषयीं तत्पर बुद्धि जिची अशी. २० दीन पांडवांविषयीं. २१ लोभ धरूं नको. २२ आपल्या पतीला जिंकल्यामुळें आपल्यालाही जिंकलें असें. २३ आपल्या मतानें. २४ पतिहीना. द्यूतांत तुझ्या पतीचा पराजय झाला; तेणेंकरून तुझाही पराजय झाला, असें जर तूं मानीत नसशील, तर तूं अभर्तृका आहेस, यास्तव अन्य पति कर.

वर्तति [1]मनमानेसें [2]सुरतपरा अपतिका स्त्रिया बटकी, ।
तें तुज विदित असो, गे ! जो तो कामी गळां पडे, [3]हटकी. ॥ २०
तुज [4]परिमितपतिक असा काशाला दारभाव ? सांडावा, ।
[5]अपरिमितपतिक दास्य स्वीकारुनि [6]कामचार मांडावा. ॥ २१
सहदेव नकुळ अर्जुन भीम युधिष्ठिर हि दास हे अवघे, ।
न तुझे पति; तूं दासी, जो तुज मानेल तो सुखें [7]धव घे.' ॥ २२
ऐसें ऐकुनि सोडी [8]अहिपतिसा भीमसेन सुसकारा, ।
[9]बहुधा [10]गुरुसंकोच ग्रासी [11]तन्नामवर्ति [12]सु-'स'कारा. ॥ २३
भीम म्हणे धर्मातें, 'राया ! [13]यां नीच सूततनयांस[13] ।
काय ह्मणों ? '[14]स्वकुलोचित वदतो,' ह्मणतील [15]साधुजन यास. ॥ २४
द्यूत न करितासि जरि, [16]न्यायें जरि वर्ततासि, तरि बापा ! ।
कां होतों दास ? [17]नृपा ! स्वप्नांत हि न करितां किमपि पापा. ॥ २५
कां या सभेंत करिते अरि तेजोभंग[18] ? कां असें वदते ? ।

---

१ मनास वाटेल तसें. २ संभोगसुखेच्छु स्त्रिया. ३ हांका मारितो, बोलावितो. ४ नियमित पति ज्यांत असा. (दारभावाचें विशेषण). अर्थात् पांच पति ज्यांत असा पत्नीभाव. ५ अनेक पति आहेत ज्यांत असें दास्य. ६ यथेच्छ वर्तन. ७ पति. ८ सर्पश्रेष्ठ शेषासारिखा. ९ हें गीत्यर्ध पंतनिर्मित आहे. भीमानें द्रौपदीचें संरक्षण न केल्याबद्दल पंतांनीं त्याचेवर फारच कडक टीका केली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. पतिव्रतेचा छळ झालेला पाहून सज्जनांस संताप येणें साहजिकच आहे. १० धर्माची भीड. ११ भीमसेनाच्या नांवांत असणारा जो उत्तम 'स'कार त्यास गुरुसंकोच (ह्मणजे धर्माविषयीं जी त्यानें भीड धरली होती ती) ग्रासी, तेव्हां शेवटीं 'भीम एन' असें राहिलें. भीम ह्मणजे भयंकर आहे सेना ज्याची असा भीमसेन; पण 'भीम एन' ह्मणजे भयंकर पातक ज्याचें तो, मोठा पातकी. सारांश भीमसेनानें द्रौपदीचें संरक्षण केलें नाहीं, ह्मणून तो मोठा पातकी झाला. गुरुसंकोच धरिल्यामुळें भीमसेन भीम एन (मोठा पापी) झाला, पण गुरुसंकोच न धरिता, तर भीमसेन भीमपराक्रमी होऊन द्रौपदीस अपमानदुःखमुक्त करता—असा स्पष्टार्थ. (एनस्=पातक). १२ अशा शब्दांवर केलेल्या कोट्या पंतांच्या काव्यांत कोठें कोठें आढळतात. 'यन्नामीं आधिं त्रि प्रांतीं टा हा जकार त्यांमध्यें' (दिव्यरामायण) अशा साध्या कोट्यांपेक्षां येथील कोटी ज्यास्त सरस व चमत्कृतिजनक आहे. अशा रचनेमुळें काव्य दुर्गम व क्लिष्टकल्पनामय होतें, यामुळें तें खऱ्या रसिकास रुचत नाहीं. पण प्राकृत जनांस असे प्रकार प्रिय असल्यामुळें पंतांनीं प्रसंगविशेषीं अशा प्रकारची रचना करून आपल्या काव्यास शोभा आणली आहे. १३ कर्णास. १४ आपल्या कुलास उचित. १५ सत्पुरुष. १६ नीतिमार्गानें. १७ धर्मराजा. १८ पाणउतारा, अपमान.

जे शशरवें[१] विरावे[२], देती मृगराजमस्तकीं[३] पद ते!' ॥ २६
तों दुर्योधन बोले 'धर्मा! अजिता जरी द्रुपदतनया ।
तरि वद, वदन वरि करीं, कीं जाणसि सुज्ञ तूं नया अ-नया.' ॥ २७
ऐसें पुसे, कुचेष्टा तो दुर्मद[४] त्या सभेंत ही मांडी[५]. ।
कृष्णेदेखत दावी डावी उघडी करूनियां मांडी. ॥ २८
भीम म्हणे[६], 'जरि समरीं या मांडीवरि गदा न बसवीन, ।
तरि पितृसालोक्यातें[७] क्षण हि न पावेन, नरक वसवीन[८].' ॥ २९
विदुर म्हणे, 'हे अजिता, खळ हो! हें कर्म काय हो! करितां? ।
कैचें कुशल शशांचें, शापुनि[९] समरासि सिंह होकरितां[१०]?' ॥ ३०
पुनरपि सुयोधन म्हणे, "कृष्णे! चौघे 'अनीश[११] धर्म' असें[१२] ।
बोलोत, मुक्त करितों; कीं मत्सदनीं करोनि कर्म असें[१३]." ॥ ३१
जिष्णु[१४] म्हणे, 'यापूर्वी होता हा[१५] ईश आमुचा साचा, ।
आतां प्रभु कोणाचा? न मला संकोच दुष्ट-दासाचा[१६].' ॥ ३२
इतुक्यांत चि धृतराष्ट्रक्षितिपतिच्या अग्निहोत्र-भवनांत[१७], ।
जंबुक[१८] शिरोनि बोले, पितरांच्या[१९] जेंवि वल्लभ[१९] वनांत[१९]. ॥ ३३
तो जंबुक आरडतां, बहु रासभ[२०] दुष्ट[२१] खग[२२] हि आरडले, ।
उत्पातज्ञ[२३] सदय[२४] जन तेव्हां चि मनीं म्हणोनि 'हा[२५]!' रडले. ॥ ३४
तेव्हां धृतराष्ट्रातें गांधारी विदुर अशुभ[२६] कळवीती, ।
त्यातें अतिप्रयासें नानापरि बोध करुनि वळवीती. ॥ ३५

---

१ सशाच्या शब्दानें. २ विरघळून जावे, घाबरून जावे. ३ सिंहाच्या मस्तकावर. (मृगराज=सिंह). ४ दांडगा (दुर्योधन). ५ आरंभी. ६ अध्याय ७१ श्लोक १४ पहा. ७ पितरांच्या सलोकतेस. (सलोकता=वाडवडील ज्या लोकीं राहतात त्याच लोकीं राहणें). ८ नरकांत वसती करीन. मला नरकप्राप्ति होईल–असा भाव. ९ शाप देऊन, अपशब्द बोलून. सशांनीं सिंहास अपशब्द बोलून त्यास युद्धास बोलाविलें, तर ससे सुरक्षित कसे राहणार? त्याप्रमाणेंच कौरवांनीं पांडवांचा अपमान करून, आपणाशीं लढण्याचा प्रसंग त्यांनीं पांडवांस आणून दिला, तर कौरव सुरक्षित राहणें शक्य आहे काय?–असा भावार्थ. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १० बोलाविला असतां. ११ धर्म आमचा स्वामी नव्हे असें. १२ याप्रमाणें. १३ राहें. १४ अर्जुन. १५ धर्म. १६ दुष्टाचा (दुर्योधनाचा) दास जो धर्म त्याचा. १७ होमशाळेंत, गृह्याग्निगृहांत. १८ कोल्हा. कोल्ह्याची कुई अभद्रसूचक होय, अशी समजूत आहे. १९ पूर्वज परम प्रीतीनें ज्या वनांत वास करून राहतात, त्यांत. (स्मशानांत, मसणवटींत). २० गर्दभ. २१ अशुभसूचक. २२ पक्षी. २३ उत्पात जाणणारे. (शुभाशुभ जाणणारे विदुर, द्रोण, भीष्म, इत्यादि). २४ दयाळू, कौरवांविषयीं ज्यांस सहानुभूति होती असे. २५ खेदोद्गार. २६ अरिष्टसूचक वर्तमान.

वृद्ध म्हणे, 'रे मंदा! कां स्वकुळज्येष्ठबंधुभार्येसीं ।
आम्हांसमक्ष करिशी [1]अतिवाद, त्यजुनि लाज, [2]आर्येसीं. ॥ ३६
[3]असकृत् निवारिलें जरि सुज्ञें विदुरें तसें चि [4]मत्तातें, ।
करिसी भलतें चि कसें? अवमानिशि कां सदुक्त? मत्ता! तें. ॥ ३७
वत्से! सति! [5]मतिमति! अतिमान्या मज तूं, क्षमा करीं दे हें, ।
वर माग, राग न धरीं, मत्पुत्रांचीं तुझ्या करीं [6]देहें.' ॥ ३८
सुमति म्हणे, "जरि देतां वर, वचनें स्तवुनियां हि, मामाजी! ।
'धर्म [7]अदास असो,' हा [8]वरपट द्या आजि [9]या हिमामाजी. ॥ ३९
[10]प्रतिविंध्यास म्हणावें, 'हा दासात्मज' असें, न [11]बाळांनीं, ।
अनुचित दाससुतत्व [12]स्कंधीं ज्या [12]वाहिलें नृपाळांनीं." ॥ ४०
भूप म्हणे, 'हें दिधलें, दुसरा मज माग वर सुने!' [13]त्रात्या, ।
ऐसें परिसोनि पुन्हां वर मागे ती सती [14]सुनेत्रा [14]त्यां. ॥ ४१
'[15]सायुध सरथ नकुळसहदेवार्जुनभीम यांस दासत्व ।
न शिवावें, हें द्यावें मज, यांचें स्थिर असो सदा [16]सत्त्व.' ॥ ४२
'माग' म्हणे तिस राजा [17]तिसरा जाया [18]लया तिचा राग; ।
[19]नागवधूतें जाणों पाजी [20]वरदुग्ध करुनियां [21]आग. ॥ ४३
देवी म्हणे, 'उदारा! स्त्री [22]योग्य नव्हे तिजा वर वराया, ।
लोभें [23]आशींची चि न, मणिराशींची बरी [24]वैरव [25]राया! ॥ ४४

---

१ अमर्याद आणि कठोर असें भाषण. २ श्रेष्ठ द्रौपदीशीं. ३ वारंवार. ४ मत्+तातें=माझ्या बापानें (भीष्मानें). ५ हे वुद्धिमति. ६ शरीरें. 'देह' शब्द संस्कृतांत पुंनपुंसक आहे. येथें पंतांनीं 'देहें' असा नपुंसकलिंगी प्रयोग करून, कौरवांविषयीं तिरस्कार दर्शविला आहे, तो पंतांच्या रसिकतेची व चातुर्याची साक्ष पटवितो. ७ धर्म दासपणांतून मुक्त होवो. ८ वररूप वस्त्र. ९ या विपत्तिरूप थंडीमध्यें. येथें 'रूपका'लंकार आहे. १० धर्माच्या पुत्राचें नांव. ११ या बालिश (मूर्ख) कौरवांनीं. किंवा, मुलांनीं (त्याच्या खेळगड्यांनीं). १२ आंगाखांद्यावर घेऊन खेळविलें—असा भाव. १३ त्रात्या=कौरवांचें संरक्षणकर्त्या (धृतराष्ट्राजवळ). १४ त्या सुनेत्रा=त्या प्रज्ञाचक्षूजवळ. प्रज्ञाचक्षुप्रति–पंत. १५ आयुधांसह. १६ तेज, सद्गुणवैभव. (अध्याय ७१ श्लोक ३२). १७ तिसरा वर. १८ नाशाप्रत. १९ नागिणीला. २० वररूप दूध. २१ अपराध. २२ क्षत्रियस्त्री तीन वर मागण्यास योग्य नाहीं. वैश्यानें एक वर मागावा, क्षत्रियस्त्रीनें दोन, राजानें तीन आणि ब्राह्मणानें शंभर वर मागावे; असा नियम आहे. (अध्याय ७१ श्लोक ३५ पहा). सावित्रीनें हा नियम पाळलेला दिसत नाहीं. तिनें पांच वर मागितले, व यमानें ते दिला दिले. (पंतकृत वनपर्व, अध्याय १३ गीति ६५–८२). २३ आशीर्वादांची. द्रव्याचा लोभ शास्त्रनिषिद्ध नाहीं, पण आशीर्वादांचा लोभ धरणें शास्त्रविहित नाहीं–असा अर्थ. २४ सांठा, संग्रह. अयं शब्दः भाषायां संग्रहपर्यायः स्त्रीषु प्रसिद्धः–पंत. (हा शब्द मराठीमध्यें 'संग्रह' शब्दाचा पर्याय असून स्त्रियांच्या भाषणांत नेहमीं येतो). २५ हे धृतराष्ट्रा.

नीचत्वतीर्ण[1] मत्पति हे सुकृतें[2] पावतील कल्याण, ।
येतां सदश्व[3] हाता, दुर्लभ त्याहूनि काय[4] पल्याण[5]?’ ॥ ४५
कर्ण म्हणे, ‘ज्यां व्यसनोदधिमग्नां[6] गुरु, सुमित्र, सुत नुतरी[7], ।
त्यांला झाली भाग्यें प्राप्त, पहा, हे समर्थ सुतनु[8] तरी[9].’ ॥ ४६
‘स्त्री गति[10] पांडुसुतांची, हा दैव!’ असें म्हणोनि भीम कर[11] ।
चोळी, अनुजासि[12] म्हणे, “जिष्णो! यादोगणीं[13] न भी मकर, ॥ ४७
तैसा मी शत्रुगणीं. परि पाश[14] तयासि, तेंवि मज राजा[15], ।
दाखवितों कौतुक, जरि वत्सा! म्हणतासि ‘करुनि गजरा[16] जा[17].’ ॥ ४८
स्त्रीस सभेंत हि शिवला, मग एकान्तीं नसेल कां विट[18] तो? ।
जो शुचि[19] तो स्वप्नीं ही परदारांच्या विलोकनें विटतो[20].” ॥ ४९
कर्णाकडे[21] विलोकुनि हांसोनि म्हणे[22], ‘धनंजया[23]! स्मरतें[24] ।
कंसातें[25] मन, त्या जें ग्रासी[26] तत्काळ तेज तूं स्मर तें.’ ॥ ५०

१ नीचत्वापासून मुक्त झालेले. २ पुण्यकर्मांनें. ३ उत्तम घोडा. ४ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ५ खोगीर. ६ व्यसनरूप समुद्रामध्यें मग्न झालेल्यांस. ७ न उतरी, पार उतरूं देत नाहीं. ८ सुंदरी (द्रौपदी) या पांडवांची विपत्समुद्रपारग नौका (तरी) झाली. ९ नौका. १० संरक्षणस्थान, आधारस्तंभ, तारणारी नौका. ‘**गतिः स्त्री मार्गदर्शयोः**’ इति मेदिनी. (अपत्य, कर्म आणि विद्या या तीन ज्योति (तेजें) जनांस तारणाऱ्या होत, असें देवलऋषीचें मत आहे. या तिघांपासून उत्तम लोकप्राप्ति होते. येथें पांडवांस तारणारी स्त्री झाली आहे, म्हणून खेद दर्शविला आहे. अध्याय ७२ श्लोक ५–७). ११ कर चोळी=हात चोळूं लागला, संतप्त झाला, तडफडाट करूं लागला. येथें ‘**लोकोक्ति**’ नामक अलंकार आहे. १२ अर्जुनाला. १३ जलजंतुसमुदायामध्यें. यादस् (जलजंतु)+गण (समुदाय). १४ फांस. श्वापदांस धरण्यासाठीं दोरीचा करितात तो. १५ धर्म. १६ जयघोष, मोठी गर्जना. १७ शत्रूंशीं लढावयास जा–असा भाव. १८ दुष्ट जार. तो अवश्य पारदारिक असला पाहिजे–असा भाव. १९ पवित्र, सच्छील पुरुष. हें अर्ध सुभाषितरूप आहे. २० मलीन होतो, भ्रष्ट होतो. स्वप्नांत सुद्धां परस्त्री पाहिल्यास पाप लागतें–असा मथितार्थ. २१ गीति ४९–५० ह्यांस अध्याय ७२ श्लोक ७ याजवरील **नीलकंठ**कृत टीकेचा आधार आहे. यावरून **मोरोपंत** हे **नीलकंठाच्या** टीकेस अनुसरून पद्यरचना करीत, असें निष्पन्न होतें. २२ भीम कर्णाच्या ज्ञातीची व उत्पत्तीची निंदा करण्याच्या हेतूनें अर्जुनास म्हणतो. २३ हे धनंजया! माझें मन कर्णाला पाहून कंसातें स्मरतें. कर्णाला पाहून मला कंसाची आठवण होते, कंसाप्रमाणें कर्णही क्रूरकर्म करणारा असल्यामुळें असुरबीजोद्भव सूतपुत्र नीच होय–असा भाव. २४ येथें ‘**स्मरणा**’लंकार आहे. जेथें एकाद्या वस्तूच्या दर्शनानें तत्सदृश पूर्वपरिचित अन्य वस्तूचें स्मरण वर्णिलें असतें, तेथें ‘**स्मरणा**’लंकार होतो. २५ कंसाला. २६ त्या (कंसाला) जें तेज (कृष्णरूप) ग्रासी तें तूं (धनंजया) तत्काल स्मर–असा अन्वय. ज्या तेजानें कंसाला मारिलें त्याचें (कृष्णाचें) स्मरण कर, आणि कर्णाला कंसाप्रमाणें तत्काळ मार–असा भाव. येथें ‘**पर्यायोक्त**’ नामक अलंकार आहे.

जिष्णु म्हणे, 'नीचासीं संतें[1] न वदती, म्हणोनि सुज्ञानें[2] ।
सोसावें, बा आर्या! कीं[3] तूं आहेसि पूर्ण[4] सु-ज्ञानें.' ॥ ५१

भीम म्हणे, "धर्मा! 'हूं' मात्र[5] म्हण, प्राज्य[6] राज्य तूं कर गा! ।
करगा[7] भूमि करीं मग, हरिला, व्हाया सदा मुदाकर[8], गा[9]". ॥ ५२

क्रोधें भीम खवळला कल्पान्त[10]ज्वलनसा च, परि त्यातें, ।
प्रतिबंधक[11]मणि झाला धर्म, रिपुपतंग[12]दाह करित्यातें. ॥ ५३

धृतराष्ट्राप्रति अंजलि करुनि युधिष्ठिर म्हणे, 'अहो तात! ।
तुमचे पाद[13] तसे प्रिय अमृतकराचे[14] हि मज न होतात. ॥ ५४

ईश्वर तूं, त्वद्वचनीं[15] मन्मन[16], जाणोनि परम हित, रमतें, ।
राज्यपदाधिक[17] गुरुपद, वदतों हें गुरुमतें, न इतर-मतें. ॥ ५५

पूर्वी गुरुवचनें[18] जो पी दुग्धरसा गरासहित[19] राया! ।
त्या प्रल्हादातें बुध गाती भवसागरास[20] हि तरायाँ. ॥ ५६

देवा! सांगावेंसें, जें तुज वाटेल, सांग पां[21] यातें, ।
हे[22] वाहतील पांच[22] हि तुझिया प्रीत्यर्थ आंग पायांतें[23]'. ॥ ५७

धृतराष्ट्र म्हणे, 'धर्मा! आलासि तसा चि त्या नवें[24] पुरा[24] जा, ।
रक्षार्ह[25] शीलें[26] रक्षीं, रक्षो हें[27] च स्वयें, न वपु राजा. ॥ ५८

---

१ साधुजन. २ पंडितानें, शहाण्यानें. ३ कारण. 'कीं' याचे विकल्प, प्रश्न, आधार, कारण–असे अर्थ आहेत. ४ उत्तम ज्ञानसंपन्न. ५ अतिवाद करण्याचें कारण नाहीं, एकाच शब्दानें आज्ञा दे–असा भाव. ६ पुष्कळ. ७ हस्तगत. येथें 'दामयमक' आहे. ८ मुद् (आनंद)+आकर (खाण)=हर्षाची खाण, आनंदित. ९ गायन कर. १० प्रलयकालच्या अग्नीसारखा. ११ अडथळा करणारा मणि असा धर्मराजा झाला. एक जातीचा मणि आहे, त्याच्या योगें अग्निभयाचें निवारण होतें; अशी समजूत आहे. १२ शत्रुरूप पतंगाचें दहन करणाऱ्या (भीमाला). ह्या गीतींत 'रूपका'लंकार आहे. १३ ह्या शब्दावर श्लेष आहे. पाद=पाय; (पक्षीं) किरण. १४ चंद्राचे. १५ तुझे भाषणीं. १६ माझें मन. १७ गुरुपदाचें महत्व पंतांच्या काव्यांत वर्णिलेलें ठिकठिकाणीं आढळतें:–'स्वर्गपद, ब्रह्मपदहि किंबहुना मोक्षपदहि, सोडावें । श्रीगुरुपदचि म्हणति कवि सर्वस्वार्पण करूनि जोडावें. ॥' (द्रोणपर्व–अध्याय २२।१५). तसेंच उद्योगपर्व, अध्याय १३।१५० व १५२; भीष्मपर्व अध्याय १।६८ व ९५ पहा. १८ पित्याच्या आज्ञेनें. १९ विषासहित. २० संसार-समुद्र तरून जाण्यासाठीं. २१ पां=कवितेंत येणारें पादपूरणार्थक अव्यय. २२ आम्ही पांच पांडव. २३ पायांतें आंग वाहतील=तुझ्या पायांवर लोटांगण घेतील. २४ नूतन नगरास (इंद्रप्रस्थास). २५ रक्षण करण्यास योग्य. २६ सदाचरण, सुवृत्त. २७ शील.

वत्सा! अजातशत्रो[1]! तूं बंधुकृतापराधविसरा[2] या ।
अंध स्थविर[3] गुरुंकडे[4] पाहुनि आहेसि योग्य विसराया[5]. ॥ ५९
अतिशुद्ध बुद्धिचें फळ शांति, भले सहनशील, बापा! हें ।
सर्व तुला विदित असे, आम्हां[6] वृद्धांकडे चि बा! पाहें[6]. ॥ ६०
सुकृतातें[7] चि स्मरति, न कुकृतातें[8], या चि साधु-रीतीची ।
रुचि[9] रसिका, न सुधेची, कीं केवळ अल्प माधुरी तीची[10]. ॥ ६१
हें[11] म्यां उपेक्षिलें[11] कीं पुत्रबळाबळ[12] मला विदित व्हावें, ।
द्यूतविलोकनकौतुकमिलिताप्त[13] हि भेटतील या भावें[14]. ॥ ६२
कळलें पुत्रांत तुम्ही श्रेष्ठ भले, जा स्वराज्य[15] सांभाळा; ।
बुडतां असदनुसरणें[16], लावावा[17] शब्ददोष कां भाळा[18]?' ॥ ६३
नमुनि पित्यासि निघाला तो व्यसनोन्मुक्त[19] सस्वजन[20] पार्थ[21], ।
सुजनासि गमे ज्याच्या कीर्तिश्रवणें चि जन्म[22] अनपार्थ[23]. ॥ ६४
दुःशासन, कर्णशकुनिदुर्योधन हे जया स्थळीं होते, ।
तेथें जाउनि सांगे, शक्रप्रस्थासि चालिले हो! ते[24]. ॥ ६५
सुटले[25] शत्रु; दुखविले अहिसे[26], वधितील हे तुम्हां, तारा ।

---

१ ज्याला शत्रु उत्पन्न झाला नाहीं तो (धर्म). २ बंधु+कृत+अपराध+विसर=दुर्योधनादिक बंधु यांनीं केलेल्या अपराधांच्या समूहाला. विसर=समुदाय. ३ वृद्ध. ४ वडील माणसाकडे. (चुलत्याकडे-मज धृतराष्ट्राकडे). ५ विसरून जाण्यास. ६ आह्मां वृद्धांकडे पाहून शांति धर, दुर्योधनाचे अपराध मनांत आणून आमच्यावर कोप करूं नको-असा भावार्थ. ७ अध्याय ७२ श्लोक ७ पहा. ८ वाईट कृत्यातें. ९ गोडी. १० त्या सुधेची. ही गीति सुभाषितरूप आहे. ११ ह्या द्यूताकडे मीं दुर्लक्ष केलें, ह्या द्यूताची उपेक्षा केली. (अध्याय ७२ श्लोक १३). १२ दुर्योधनादि पुत्रांचें सामर्थ्य किंवा दौर्बल्य. १३ द्यूत पाहण्यासाठीं कौतुकानें मिळालेले आप्तजनही. १४ हेतूनें. १५ 'स्वराष्ट्र' असें पाठांतर. १६ दुष्टांचें अनुसरण केल्यानें. १७ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १८ कपाळास, दैवास. १९ संकटांतून मुक्त झालेला (धर्म). २० द्रौपदी व भीमादिक बंधु यांसह इंद्रप्रस्थास जाण्यास निघाला. २१ 'पार्थ' हें विशेषतः अर्जुनालाच नांव देतात, पण हें येथें धर्मास लाविलें आहे. पार्थ=पृथेचा (कुंतीचा) पुत्र. (गीति ८९ पहा). २२ येथें सभापर्वांतील द्यूतपर्व संपलें. येथून अनुद्यूतपर्वाला आरंभ होतो. २३ न व्यर्थ, सफळ. (अन्+अप+अर्थ), दोन 'न'कार मिळून एक 'हो'कार होतो, ह्या नियमाचें हें उदाहरण आहे. 'संभाव्यनिषेधनिवर्तने द्वौ प्रतिषेधौ' इति वामनः. २४ पांडव. २५ ह्याच अर्थाची उक्ति आंग्लकविकुलगुरु शेक्सपियरकृत 'म्याक्बेथ' नाटकांत आहे:—'Macbeth–We have scotched the snake, not killed it'. [Act III–2–13]. २६ सर्पसे.

व्यसनांत आपणातें, न बरा हा नाशहेतु[1] म्हातारा[2]'. ॥ ६६
जाणोनि अत्यनिष्ट[3] क्षिप्र तया आंधळ्यासि भोंदाया[4], ।
धांवुनि गेले शतसुत शोकाजगराननांत[5] कोंदाया[6]. ॥ ६७
त्यातें म्हणे सुयोधन, "केला कीं व्यर्थ यत्न हा तातें, ।
मोहें गमाविलें, जें आलें अहिमूर्धरत्न[7] हाता, तें. ॥ ६८
जों झाले न रणोद्यत[8] सर्वोपायें सपत्न[9] मारावे[10]. ।
यांत चि कुशल[11], स्वाश्रित जन सुज्ञें सर्वथैव तारावे. ॥ ६९
वृत्रारि[12]प्रति वदला गुरु[13] ज्या या भद्रधाम[14] नीतीतें ।
प्रभुवर्या! अवमानुनि करिसी बहु खिन्न कां मनीं तीतें? ॥ ७०
द्यूत[15]जितप्रचुरधनें पूजुनि नृप सर्व, करुनि[16] वश[16], अरि ते ।
मारावे, हें मन्मत[17]; कीं न भले वृत्तिचें[18] हरण करिते. ॥ ७१
पांडव न सोडिले ते, दुखउनि अत्यंत उग्र अहि[19] तातें[20]. ।
नीतिज्ञ कोण दुसरा आत्मसुतांच्या करील अ-हितातें[21]? ॥ ७२
येतील कटक[22] घेउनि, आम्हां वधितील, राज्य हरितील, ।
दयितेच्या[23] क्लेशातें चिंतुनि ते काय गा! न करितील? ॥ ७३
आझुनि तरि सावध हो, द्यूतार्थ फिरोनि येतसे[24] कर गा! ।
करिल पुन्हा मन्मातुळें[25] शत्रूंच्या[26] राजसंपदा कर-गा[27]. ॥ ७४
द्यूतीं असा करूं पण 'करणें वनवास अब्द[28] बारा,' हे ।

---

१ नाशास कारण. २ येथें दुःशासनाचे तोंडीं 'म्हातारा' (थेरडा) हा शब्द घालून पंतांनीं त्याच्या उच्छृंखळ वृत्तीचें सुरेख चित्र रेखाटिलें आहे. ३ अत्यंत अहितकर. ४ फसवाया. ५ शोकरूप अजगराच्या (मोठ्या सर्पाच्या) मुखांत. अजगर=अजं गृणाति गिरति वा सः=सबंध शेळी अथवा बकरा गिळणारा साप. 'रूपका'लंकार. ६ भराया, कोंबावयास. शोकाला अजगराची उपमा पंतांनीं कर्णपर्वांतही दिलेली आढळते. (अध्याय १ गीति ४). ७ सर्पाच्या मस्तकावरील मणि. ८ युद्धाविषयीं उद्युक्त. ९ शत्रु. १० अध्याय ७४ श्लोक ८ पहा. ११ कल्याण. 'त्यांतञ्चि कुशल' असें पाठांतर. 'आहे' हें क्रियापद येथें अध्याहृत आहे. १२ वृत्रासुराचा शत्रु (इंद्र) त्याप्रत. १३ देवपुरोहित, बृहस्पति. १४ कल्याणाचें गृहच अशा. १५ द्यूतांत जिंकून घेतलेल्या विपुल धनानें. १६ जिंकून. १७ माझा विचार. 'वधमेव प्रशंसन्ति शत्रूणामपकारिणाम्' (आदिपर्व, अध्याय १४०।१०). म्हणजे—अपकार करणाऱ्या शत्रूंचा वधच करणें प्रशस्त मानतात. हें राजनीतिशास्त्रांतील एक महत्वाचें तत्व आहे. १८ उपजीविकासाधनाचें. पांडव हे आमच्या वृत्तीचे (वतनाचे) हरणकर्ते आहेत म्हणून ते भले नव्हेत, शत्रूप्रमाणेंच आहेत—असा भावार्थ. १९ सर्प. (अ० ७४ श्लो० ११). २० धृतराष्ट्रानें. हें **'अपन्हुति'** नामक अलंकाराचें उदाहरण होय. २१ अकल्याणातें. २२ सैन्य. २३ प्रियभार्या जी (द्रौपदी) तिच्या. २४ 'ये तसें' असें पाठांतर. २५ माझा मामा (शकुनि). २६ पांडवांच्या. २७ हस्तगत. २८ वर्षें.

होतां, '[1]अज्ञातवसति वत्सर,' आइक, उगा चि बा! राहें. ॥ ७५
अज्ञातवास [2]अंतीं करणें जो काय तो [3]समानजनीं, ।
जरि [4]उमगले, वसावें द्वादश वर्षें पुन्हां तसें चि वनीं. ॥ ७६
[5]सिद्धिद मामा, '[6]मा मा' न म्हण, [7]मदिष्टार्थ तप नको कांहीं. ।
[8]प्रार्थावा पुत्रांहीं स्वपिता स्वसुखार्थ, [9]तपन [10]कोकांहीं. ॥ ७७
होवूनि [11]बद्धमूल, [12]स्वसहाय करूं [13]समस्त-नृप-कटक, ।
मग मज भक्ष्य, व्यसनीं तरले ही अरि, जसे घृतीं [14]वटक. ॥ ७८
व्यसनीं [15]सरंध्र हि उरे, जोंवरि [16]राहे धरूनि [16]तळ उगला, ।
भक्ष्य चि इतर [17]सुवृत्त हि वटक [18]कटाहीं तरोनि जो फुगला." ॥ ७९
अंध [19]म्हणे, 'हूं, [20]फिरवा, जाऊं द्या [21]जवन दूत, नंदन हो! ।
देवा! युधिष्ठिराचा तो द्यूतोत्साह लेश [22]मंद [22]न [22]हो'. ॥ ८०
[23]द्रोणादि सुज्ञ वारित होते, परि न वळला चि तो कांहीं, ।
[24]भरला [24]भरीं, भुलविला, दावुनि धनलोभ दुष्ट [25]तोकांहीं. ॥ ८१
[26]लोभांध गुरु न, हो! तो [27]आत्मारि [28]तथा निजानुगांधारी, ।
[29]आंत हि जो [30]अंध [31]तयां बोध किती हो! करील गांधारी? ॥ ८२

---

१ कोणास माहीत नाहीं असें राहणें. वसति=वास. २ वनवास संपल्यावर. ३ आत्मसदृश जनांत, समयोग्यतेच्या लोकांत. ४ ओळखले गेले. ५ सिद्धि देणारा मामा (शकुनि) आहे, कारण तो अक्षवशीकरणविद्येंत निपुण होता. ६ नको, नाहीं. ७ माझें इष्ट (कल्याण) करण्यास. ८ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ९ सूर्य. १० चक्रवाकपक्ष्यांनीं. या जातीच्या नरमादींचा रात्रीं नित्य वियोग होतो आणि तेणेंकरून त्यांस अत्यंत दुःख होतें, पण सूर्योदय होतांच त्यांची भेट होते. म्हणून ते पक्षी सूर्योदयाची वाट पहात असतात, आणि तो व्हावा म्हणून प्रार्थना करितात—अशी समजूत आहे. ११ ज्यांचें मूळ (पाया) बद्ध (दृढ) झालें आहे असे. १२ आपलें सहाय्य करणारें, आपलें मित्र असें. १३ सकल राजांचें सैन्य. १४ वडे. जसे घृतीं [तरलेले] वटक (वडे) भक्ष्य (खाण्यास योग्य), [तसे] व्यसनीं तरलेही (संकटांतून पार पडलेले सुद्धां) अरि (शत्रु, पांडव) मज भक्ष्य (जिंकण्यास योग्य)—असा अन्वय. १५ रंध्र म्हणजे छिद्र (भोंक); (पक्षीं) उणेपणा, न्यून. १६ कढईच्या तळाशीं असतो; (पक्षीं) आपल्या ठिकाणीं हालचाल न करितां राहतो. १७ चांगला वर्तुलाकार; (पक्षीं) सद्वर्तनसंपन्न, चांगल्या चालीचा. १८ कढईमध्यें. ही गीति सुभाषितरूप आहे. १९ अध्याय ७४ श्लोक २४ पहा. २० दूर गेलेल्या पांडवांस परत आणा. २१ अतिवेगवान्. २२ कमी न होवो. २३ द्रोण, विदुर, भीष्म, युयुत्सु, द्रोणपुत्र इत्यादि ज्ञाते द्यूत करूं नका, असें म्हणत होते. (अ० ७४ श्लोक २५–२७). २४ ईर्ष्येस चढला. २५ अपत्यांनीं. २६ तो गुरु (धृतराष्ट्र) लोभांधच नव्हता, तर आणखी आत्मारि (आत्मघातक) व त्याप्रमाणें निज (आपल्या) अनुग (मागून येणाऱ्या, तंत्रानें चालणाऱ्या) अंध (आंधळ्यांचा, स्वतः विचार न करणाऱ्या मनुष्यांचा) अरि (शत्रूसारखा नाश घडवून आणणारा) होता—असा भावार्थ. २७ आत्मघातक. २८ त्याप्रमाणेंच. २९ अंतःकरणांत. ३० ज्ञानरहित, मूर्ख. ३१ त्या धृतराष्ट्राला.

'नरकीं बुडवील, न हा[1] पुत्र[2], त्याग चि बरा, न अ-त्याग[3], ।
बांधा, वधा खळाला, स्नेहें घडतें तुम्हांसि अत्याग[4]. ॥ ८३
क्षणभरि मात्र खळतनुजविरहातें[5], मन करूनि गाढ, वहा[6], ।
राजगृहीं न वसावा, भ्रमलासि, नव्हे सदश्व[7], गाढव हा[8]. ॥ ८४
एकैक शतसुताधिक ते[9] सुत, यांहूनि काय हो! ऊन[10]? ।
सन्मणि टाकुनि घेतां काच कसे सुज्ञराय[11] होऊन?' ॥ ८५
भूप म्हणे, 'बहुधा कुळ बुडतें, वारावयासि मीं न शकें, ।
गरुडास हि लंघ्य न जें, लंघावें दैव तें कसें मशकें[12]? ॥ ८६
गांधारि[13]! उगी च रहा, होऊं दे द्यूत, औरसा मान्य ।
श्रुति म्हणति, न इतराला; त्या मानिसि केंवि पौर सामान्य?' ॥ ८७
ऐसें वदोनि भूपें पाठविला प्रातिकामि सूत बळें; ।
तेव्हां स्तविति खळ[14] खळां, गळति खळखळां सु-साधु-नेत्र-जळें[15]. ॥ ८८
तो सूत दूर धांवत जाउनि गांठी पथांत पार्थातें[16], ।

---

१ दुर्योधन. २ जो सदाचरणानें वागून पितरांस आनंद देईल तो पुत्र ('यः प्रीणयेत्सुचरितैः पितरं स पुत्रः' नीतिशतक–६८). पण दुर्योधन दुराचारी आहे, तेव्हां त्यास पुत्र कसें म्हणावें–असा भाव. मागें अध्याय ४ गीति १३ व तीवरील टीपा पहा. ३ न टाकणें बरें नव्हे, टाकणें हेंच उचित. ४ मोठा अपराध. (अति+आगस्=अपराध). ५ दुष्ट मुलाच्या वियोगातें. ६ मन गाढ (घट्ट) करुनि तनुजविरहातें वहा (सहन कर)–असा अन्वय. ७ उत्तम घोडा. ८ हा दुर्योधन. ९ पांडव. पांडवांपैकीं प्रत्येक आपल्या शंभर पुत्रांपेक्षां सर्वतोपरी श्रेष्ठ आहे, तेव्हां ते ह्या दुर्योधनापेक्षां कमी आहेत कीं काय? दुर्योधनाचा त्याग करून पांडवांचा स्वीकार केल्यास आपली यत्किञ्चितही हानि नाहीं, असा भावार्थ. १० कमी. ११ बुधश्रेष्ठ. १२ चिलटानें. होणारापुढें बळवानाचेंही कांहीं चालत नाहीं, मग दुर्बळाचा तो पाड काय?–असा भावार्थ. १३ हे गांधारि! तूं स्वस्थ राहा. द्यूत होणारच, माझा उपाय चालत नाहीं, तें होऊं दे. माझ्या शंभर पुत्रांपेक्षां एकेक पांडव श्रेष्ठ आहे, असें तूं म्हणतेस. पण श्रुतीच्या (शास्त्राच्या) म्हणण्याप्रमाणें औरस पुत्र (स्वतःचा मुलगा) मात्र मान्य आहे. इतर (अनौरस) पुत्र शास्त्राला मान्य नाहीं. तूं 'त्याला बांधा, व त्याचा वध करा' (गीति ८३ पहा) असें म्हणतेस, तर तो कोणी सामान्य पौरजनांपैकीं का आहे? तो माझा प्रत्यक्ष पुत्र आहे, त्याचा वध कसा करूं?–असा धृतराष्ट्राचें भाषणाचा मथितार्थ. १४ दुष्ट लोक दुष्टांची स्तुति करूं लागले. ह्या अर्धांत 'छेकानुप्रास' आहे. येथील 'ळ'काराची आवृत्ति चमत्कृतिजनक असून वाचकांच्या डोळ्यांतून अश्रु टपटप गळल्याखेरीज राहणार नाहींत, अशी ही पंक्ति आहे. कवितेचा ध्वनि कवितेच्या अर्थाचा प्रतिध्वनि असावा, हें पाश्चात्य कविजनांचें मत पंतांसही मान्य होतें असें दिसतें. १५ थोर सज्जनांच्या नेत्रांतून उदकें. १६ पृथा (कुंती) हिचा जो पुत्र धर्मराज, त्यास.

ठकवुनि लुटावया पटु ठक जेंवि स[1]-सार्थवाह-सार्थातें. ॥ ८९
'द्यूतार्थ बाहतो[2] तुज तात, युधिष्ठिर! नराधिपा! परत'।
ऐसें तो सूत म्हणे; दे श्रवणें दुस्तराधि[3] पाप[4]-रत. ॥ ९०

धर्म म्हणे, 'क्षम[5] नाहीं लंघाया[6] सुज्ञ ही नर कपाळा[7], ।
[8]स्तुत होय स्व[9]:पाळा, केव्हां 'जी! जी!' म्हणे नरक[10]-पाळा. ॥ ९१
द्यूतें क्षय हें कळतें, परि फिरतों[11]; लंघ्यें[11] काय हो तात? ।
पितृ[12]वचनकर निरुपम श्रीकीर्तींचे निकाय[13] होतात.' ॥ ९२
द्यूतासि पुन्हां सेवी गुर्वाज्ञेकरुनि शिशु जसा गरळीं[14]. ।
किंवा परार्थ[15] जेंवि प्राशी श्रीकंठ[16] नीरसा गरळा[17]. ॥ ९३

बसले सभेंत पांडव, शकुनि म्हणे, "गा युधिष्ठिरा! जरि तें ।
जितधन[18] दिधलें, देवू, वृद्ध[19] करू सर्व गेह आज रितें[20]. ॥ ९४
राया! आतां द्यूतीं एक चि आम्ही तुम्ही करूं पण हो! ।
'सर्वस्व[21] हारवावें कीं जिंकावें' न भीरु तूं पण[22] हो. ॥ ९५
द्यूतीं निर्जित[23] झालों[23], तरि आम्ही रौरवाजिनें[24] धरुनी ।
द्वादशवत्सर व्हावें वनवासी सुमुनिवृत्तिला वरुनी; ॥ ९६

---

१ सार्थवाहासह (व्यापारी जनाच्या नायकासह) सार्थाला (व्यापारी जनाला). 'सार्थो वणिक्समूहे स्यादपि संघातमात्रके' इति मेदिनी. २ बोलावितो. ३ तरण्यास कठीण अशी चिंता (आधि). ४ दुष्कर्मासक्त (दुर्योधन). ५ समर्थ. ६ टाळाया, उल्लंघून जाण्यास. ७ दैवाला. ८ [नर] स्तुत होय–असा अन्वय. ९ स्वर्गपालास (इंद्राला). १० यमाला. दैवाचा प्रभाव असा कांहीं विलक्षण आहे कीं, कधीं एकाद्याची इंद्र प्रशंसा करितो; व दैव उलट फिरलें म्हणजे त्यालाच यमापुढें हात जोडावे लागतात–असा भावार्थ. ११ परत जातों, कारण वडिलांची अवज्ञा करावयाची कीं काय? १२ पितरांची आज्ञा पाळणारे. पितरांची व गुरूंची आज्ञा पालन करणाऱ्यांचें कल्याण होतें, असें पंतांनीं वारंवार सांगितलें आहे. तें तरुण पिढीनें लक्ष्यांत ठेऊन, त्याप्रमाणें वागणें अत्यंत आवश्यक आहे. (अध्याय १।५१, ५२; अ०३।५९, अ० ४।१०६, अ० ६।७७, ९२ पहा). १३ राशी, भांडार. १४ आई विड्यामध्यें अनेक औषधें घालून चावून त्याचा जो रस तान्ह्या मुलांस पाजिते तो (त्यास). मातृचर्वितौषधरसः–पंत. १५ परोपकारार्थ. १६ शंकर. १७ विषाला. (समुद्रमंथनकाळीं उत्पन्न झालेल्या हालाहाल विषाचें शंकरानें प्राशन केलें, या कथेला उद्देशून हें वर्णन आहे). १८ तुमचें आम्हीं जिंकून घेतलेलें द्रव्य जर धृतराष्ट्र तुम्हांस देत असेल तर देवो, अथवा घरांतील सर्व धन तुम्हांला देऊन जर घर रिकामें करीत असेल तर तो खुशाल तसें करो. १९ धृतराष्ट्र. २० रिकामें. (पृष्ठ ५२ टीप २ पहा). २१ सगळें द्रव्य. (स्व=धन). २२ परंतु. २३ जिंकिले गेलों, हरलों. २४ मृगचर्मे. (रुरु=कृष्णमृग, काळवीट; त्याचीं अजिनें=चर्मे).

अज्ञातवास [१]सजनीं परि वत्सर एक मग करावा हो! ।
होतां चि [२]ज्ञात, पुन्हां पहिला वनवासपथ धरावा हो! ॥ ९७
जित होतां वर्तावें या चि न्यायें तुम्हीं [३]सदारानीं, ।
सजनीं वर्षभरि वसा, द्वादश वर्षें वसा सदा रानीं. ॥ ९८
तेरा वर्षें ऐसीं क्रमिल्यावरि लागतां चि चवदावें ।
राज्य करावें आपण, हा पण; कोण्हीं असत्य न वदावें." ॥ ९९
सभ्य म्हणति, '[४]अक्षग्रह [५]घौतभ्रमकर, नसे असा [६]धुतरा. ।
[७]कौरव हो! गौरव हो सुजनीं, न करुनि असें [८]असाधु, [९]तेरा. ॥ १००
अन्योन्यकरें तुमचा बुध हो! समरांत न सहसा वध हो, ।
धर्मा! तूं तरि आइक, देती [१०]भयलक्ष अक्ष, सावध हो.' ॥ १०१
धर्म [११]म्हणे, "न [१२]व्यसनी, मीं त्यजितां परि निज प्रतिज्ञा ते, ।
जे सुप्रसन्न मजवरि केवळ विटतील[१३] संप्रति ज्ञाते. ॥ १०२
शकुने! खेळ यथेष्ट, द्यूतीं म्यां मांडिला त्वदुक्त[१४]पण, ।
'[१५]छद्में कल्याण नसे', ऐकावें प्रथम हें [१६]मदुक्त पण." ॥ १०३
पूर्वोक्त पणो[१७]च्चारण करुनि, सभेमाजि शकुनि [१८]अक्षांतें ।
टाकुनि, 'जितं' म्हणे, खळ कपटें जिंकी खळान्ते[१९]-दक्षांतें. ॥ १०४

---

## अध्याय [२०]सातवा.

[२१]अजिनें नेसुनि झाले पांडव [२२]वनवासदीक्षित, तशांतें ।
दुःशासन बहु हांसे, गावें ज्यांच्या [२३]सुधोत्तमयशांतें. ॥ १

---

१ लोकवस्तीच्या प्रदेशांत. २ प्रकट, ओळखलेले. ३ स्त्रीसहवर्तमानांनीं (तुह्मी). ४ द्यूत खेळणें, फांसे हातांत धरणें, द्यूतक्रीडा. ५ घात करणारा व बुद्धीला मोह उत्पन्न करणारा. ६ धोतऱ्याचें फळ. धोतऱ्याचा दृष्टांत पंतांनीं अन्यत्र दिला आहे. (मंत्रभागवत, स्कंध १०।६७). धोत्र्याच्या बिया, फूल किंवा पाला हीं क्रमानें कमी कमी मादक आहेत. हीं पोटांत गेल्यानें भ्रमिष्टपणा येतो. ७ कौरव हो! [तुमचा] सुजनीं गौरव हो (होवो). असें असाधु (दुष्कर्म) न करुनि तरा (तुम्ही आपलें कल्याण साधा)–असा अन्वय. ८ वाईट. ९ स्वकल्याण साधा. १० लाखों भयें. ११ सभापर्व–अध्याय ७६ श्लोक २० पहा. १२ व्यसनासक्त, जुवेबाज. अध्याय ५ गीति ३९ पहा. १३ रागावतील, नाराज होतील. १४ त्वत्+उक्त+पण=त्वां बोलिलेला पण. १५ कपटें. १६ माझें भाषण. 'सदुक्त' असें पाठांतर. १७ पणाचा उच्चार. १८ फांशांतें. १९ खळांचा अंत करण्यांत जे दक्ष, त्या पांडवांतें. येथें 'अनुद्यूतपर्व' समाप्त झालें. २० ह्या अध्यायांत मूळांतील ७७ व्या अध्यायापासून अखेरच्या म्हणजे ८१ व्या अध्यायांतील कथाभाग वर्णिला आहे. मुक्तेश्वरांनीं हा सर्व कथाभाग आपल्या सभापर्वाच्या सोळाव्या अध्यायाचा उत्तरार्ध व सतरावा अध्याय यांत वर्णिला आहे. २१ हरिणचर्में. २२ वनवास करण्याची दीक्षा (व्रत) ज्यांनीं घेतली ते. (दीक्षा=व्रतग्रहण). २३ अमृताहून उत्तम अशा यशास.

“[1]आजि, पराजि[2]पराजित नव्हते जे, ते च हे पराजित कीं. ।
आम्हां सुखें चि तितकीं, दुःखें जीं आमुच्या [3]परा जितकीं. ॥ २
आजि [4]अकंटक केलें [5]नृपनयनिपुणें सुयोधनें राज्य, ।
[6]प्राज्य प्रीति[6]दें झालें सुहृदांला, [7]गाळिलें जसें [8]आज्य. ॥ ३
तात म्हणे, ‘नित्य असो या धर्मा [9]भव्य [9]भाग्य [10]मत्तनया; ।’
ते हे आम्हां [11]हांसत [11]होते, रक्षी न [12]भाग्यमत्त [13]नया. ॥ ४
हे पंडित, [14]परि पांडव नरकीं श्रीमद धरूनि कां पडले? ।
[15]कैवर्तांस [16]अदीक्षित [17]अजिनधर वनांत [18]बंधु सांपडले! ॥ ५
आपण [19]षंढ [19]तिळ असें निःसंशय जाणतील हे आतां, ।
गर्वें फुगले होते [20]फुगवूनी स्वगुण [21]गायकीं गातां ॥ ६
क्लीबांसि सुता देउनि, सुमति परि द्रुपद फार चुकला हो! ।
[22]यमभट हो! बळकट [23]या [24]स्वापत्यविडंबकासि [25]बुकला हो! ॥ ७
द्रौपदि! हे कुरु [26]दान्त [27]क्षान्त सधन, यांत [28]कान्त जोडावा; ।
लाभ नसे, ताप वसे ज्यामध्यें, तो कुसंग [29]सोडावा. ॥ ८
[30]षंढ तिल, [31]चर्ममय मृग, [32]काकयव, जसे तसे चि [33]फटकळ गे! ।

---

१ ही दुःशासनाची उक्ति आहे. २ पर+आजि+पराजित=शत्रूकडून युद्धांत पराभव पावलेले. (आजि=युद्ध). ‘आजिपराजित नव्हते झाले जे’ असा अन्य पाठ. ३ शत्रूला. ४ शत्रुरहित. ५ राजनीतिनिपुण अशा. ६ मोठी गोडी देणारें, पुष्कळ आवडतें. ७ निर्मळ, शुद्ध. ८ तूप. ९ उत्तम दैव. १० मत्+तनया=माझ्या मुलास (धर्मास). ११ मयसभेंत दुर्योधन पाण्यांत पडला तेव्हां. (मागें अध्याय ३ गीति १–५ पहा). १२ संपत्तीनें उन्मत्त झालेला पुरुष. १३ नीतीला. १४ ‘तरि’ असाही पाठ आहे. १५ कोळ्यांस. १६ ज्यांनीं यज्ञाची दीक्षा घेतली नाहीं असे. यज्ञाची दीक्षा घेतली असतां मृगाजिनें परिधान करण्याची चाल आहे. पण पांडवांना यज्ञाची दीक्षा वगैरे न घेतां चर्मांबरें धारण करावीं लागलीं होतीं. १७ कृष्णमृगचर्मधारी. १८ मित्र. जणूं काय कोळी, भिल्ल वगैरे रानटी लोकांस हे मित्रच भेटले. ही पांडवांची थट्टा आहे. १९ नपुंसक. (अफल आणि निर्वीर्य तिळांप्रमाणें). २० भाटांनीं आपल्या गुणांची फाजील स्तुति केली असतां. २१ गायक=भाट, स्तुतिपाठक. ‘काय कीं’ असाही पाठभेद आढळतो. २२ यमाच्या सैनिकांनो! ‘भटस्यात्पुंसि वीरे च विशेषे पामरस्य च’ इति मेदिनी. २३ द्रुपदा. २४ आपल्या अपत्याची (द्रौपदीची) विटंबना करणारास. अपत्य=मूल, लेंकरूं. [अपत्य=न पतन्ति पितरोऽनेन इति अपत्यम्. ज्याच्यामुळें पितर (नरकांत) पतन पावत नाहींत तें अपत्य, अशी ह्या शब्दाची व्युत्पत्ति आहे]. २५ बुक्या मारून ठार करा. २६ इंद्रियनिग्रह ज्यांनीं केला ते. २७ सहनशील, क्षमाशील. २८ पति. २९ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ३० सभापर्व–अध्याय ७७ श्लोक १३ पहा. ३१ चामड्याचे केलेले मृग (हरिण). ३२ ज्यामध्यें तंदुल वगैरे धान्य नसून बाह्यतः धान्यासारखें दिसते, तें काकयव नामक धान्य; धान्याचें वांझें कणीस; निष्फळ तृणधान्य. ३३ फटकळ=फटकाळ=दुर्भाषण करणारा. (पंतकृत द्रोणपर्व–अध्याय १६।११४ पहा).

हे व्यर्थ, कांकणाचे दाविति ल न [१]समरसिंधुतट [२]कळगे. ॥ ९
कृष्णे! [३]काडी मोडीं, कार्य[४] तुला दीन मानले [५]शवसे? ।
जे राज्यभ्रष्ट कित[६]व, ज्यांचा[७] ठायीं न मानलेश वसे." ॥ १०
भीम म्हणे, 'रे कोल्ह्या[८]! याचा घेईन सूड जाण खरें, ।
हाणीन बाण वर्मीं, हाणिसि वचनें जसींच [९]बाण-खरें. ॥ ११
[१०]कांळातिथिमधुपर्कीं जे पांडवपशु [११]निवेदिले होते, ।
जाणों न मारिले, [१२]वधकातर सोडोनियां दिले हो! ते.' ॥ १२
'[१३]गौगौः' असें म्हणे खळ दुःशासन, अति [१४]असंत तो नाचे, ।
किति वर्णावे सद्गुण [१५]सन्नीतिकरूनि संततो[१६]नीचे! ॥ १३
दुर्योधन आपण [१७]मतिवेश्येचा जरि नवा [१८]ढवा, [१९]यांला ।
हांसे [२०]गत्यनुकारें, [२१]बाळ न भी [२२]ज्वलन वाढवायाला. ॥ १४

---

१ युद्धरूप समुद्राचें तीर. पांडव बांगड्यांच्या कळग्यां (तुकड्यां) सारखे निरुपयोगी आहेत, व त्यांच्यांत शौर्याचा लेश सुद्धां नाहीं–असा भावार्थ. ह्या गीत्यर्धांचा समाधानकारक अर्थ लागत नाहीं. हे कांकणाचे कळगे सिंधुतट दाविति ल, समर(तट) न (दावितील)–असा अन्वय केला, तरी पंतांचें ह्रद्गत नीटसें लक्ष्यांत येत नाहीं. २ कांकणांचा चुरा (कळगा), 'कळगे' हें बहुवचनी रूप आहे. ३ काडी मोडणें=विवाहसंबंध तोडणें, विवाहसंबंधमोचन करणें. ह्याच अर्थी 'पदर फाडून देणें, पालव कापून देणें' असे भाषणसांप्रदाय रूढ आहेत. ४ दीन व शवसे [पांडव] तुला कसे मानले? (मान्य झाले, पसंत पडले?)–असा भाव. ५ प्रेतासारखे. ६ जुगार खेळणारे. ७ ज्यांचा=ज्यांच्या. ८ कोल्हा मोठा धूर्त व कपटी असतो, अशी प्रसिद्धी आहे. ९ बाणासारखीं तीक्ष्णें. १० काळरूप अतिथीची मधुपर्क पूजा करतेवेळीं. मधुपर्क हा एक प्रकारचा पूजाविधि आहे. कोणी प्रतिष्ठित पाहुणा (अतिथी) घरीं आला असतां, हा विधि करीत असत. गाय अथवा बैल मारून त्याच्या कातड्यावर ज्या पाहुण्याला मधुपर्क द्यावयाचा असेल, त्याला बसवावें आणि दहीं, दूध, मध इत्यादि अर्पण करून स्वागत करावें, असा पूर्वीं प्रचार होता. हल्लीं विवाहसमयीं वराला आणि पूजासमयीं देवाला मधुपर्क देतात. तथापि त्यांत मांसाबद्दल दहीं व मध यांची योजना करण्याचा प्रघात आहे. या स्थलीं काल हा पाहुणा आणि पांडव हे मधुपर्कासाठीं दिलेले पशु असें समजावें. ११ उच्चारिलेले. मधुपर्कसमयीं 'गौर्गौर्गौः' असें त्रिवार उच्चारण करून गाईचा वध अथवा उत्सर्ग करीत असत. १२ वधाविषयीं भितरे. १३ 'गाय रे! गाय' (अत्यंत दीन) असें दुष्ट दुःशासन म्हणे. मधुपर्कांतील पशूप्रमाणें मारण्यास योग्य–असा भाव. या दुःशासनाच्या दुर्भाषणाचा सूड पुढें भीमानें घेतला आहे. (मोरोपंतकृत कर्णपर्व अध्याय ४५ गीति २३–२४ पहा). गाय ही स्वभावतःच गरीब असते पण तीस मारावयाचे वेळीं ती अगदीं दीन होते. त्या गाईप्रमाणें पांडव झाले–असा भावार्थ. १४ असाधु, दुष्ट. १५ सन्नीतीला धरून, सदाचरणाच्या नियमांस अनुसरून. १६ निरंतर जो हीन (नीच) त्याचे. १७ बुद्धिरूप वेश्येचा. जरि=जणूं काय. १८ वेश्येच्या मागें पखवाज वाजविणारा साजिंदा. (हा निंदाव्यंजक शब्द आहे). १९ भीमाला. २० येथें 'गति' शब्दावर श्लेष आहे. ढवा (साजिंदा) हा नायकिणीच्या गतीची वाद्यावर साथ करून व तिच्याबरोबर पुढें मागें सरून हांसत असतो. येथें दुर्योधन ढव्याप्रमाणेंच सभेंतून जाणाऱ्या भीमाच्या गतीचें (चालण्याच्या तऱ्हेचें) अनुकरण करून हांसत होता. एकंदरींत दुर्योधन हा एखाद्या हलकटाप्रमाणें बालिशपणा करीत होता. (अध्याय ७७ श्लोक २३ पहा). २१ मूर्ख (दुर्योधन). २२ अग्नि. (वैर). येथें 'दृष्टांता'लंकार आहे.

हंसखगा काक[1] जसा, कीं धुतरा पुष्पकुळवरा कमळा, ।
वेडावी, लावाया वांच्छी अर्कीं[2] हि तो वराक[3] मळा[4]. ॥ १५
तें[5] अवलोकूनि म्हणे त्यासि निर्वृत्तार्धकाय[6] भीम असें:– ।
'मंद[7]! रहा, मंदर हा मी भीम खळाब्धिमथनयोग्य[8] असें[9]. ॥ १६
मी या सुयोधनाचा हन्ता, जन्हि मन्मनांत अनहंता[10], ।
सहदेव या शकुनिचा, कर्णाचा जिष्णु[11] दुष्ट-जन-हन्ता.' ॥ १७
जिष्णु म्हणे, 'कर्तव्य प्रकट न करिती निजाननें[12] आर्य[13]. ।
पाहूं तें, चवदाव्या अब्दीं[14] यावरि घडेल जें कार्य.' ॥ १८
भीम म्हणे, 'दुर्योधनदुःशासनकर्णशकुनि-रक्तानें ।
भू[15] त्वां तृप्त करावी, ऐकावें गुरुवचोनुरक्तानें[16].' ॥ १९
पार्थ म्हणे, 'करिन, तुझें जें प्रिय, तें चि, प्रसाद जोडाया[17], ।
हें किति? मज उशिर नसे त्वत्प्रतिकूल स्वबाहु[18] तोडाया. ॥ २०
अनुगांसह कर्णातें मारुनि मी हर्षवीन आर्यातें, ।
तोडीन स्वभुज हि जरि, हे न तुझ्या साधितील कार्यातें, ॥ २१
परि अरि राज्य न देइल, जरि हायन[19] लागतां चि चवदावें. ।
गुरुसीं वाक्य, प्रथम चि सुविचार बरा करूनि च वदावें.' ॥ २२
सहदेव[20] म्हणे, 'शकुने! अक्ष म्हणसि; परि नव्हेत हे अक्ष[21]; ।
मूढा! सहदेवाचे त्वां वरिले शर रणीं स्व-वध[22]-दक्ष. ॥ २३

---

१ हंसपक्ष्याला कावळा जसा वेडावी. २ सूर्याचे ठिकाणीं. ३ नीच. ४ दोष, डाग. ५ तें अनुकरण. ६ मागें फिरविला आहे शरीराचा अर्धा भाग ज्यानें असा. ७ अरे हतभाग्या! 'मंदोऽतीक्ष्णे च मूर्खे च स्वैरे चाभाग्यरोगिणोः। अल्पे च त्रिषु पुंसि स्याद्धस्तिजात्यन्तरे शनौ. ॥' इति मेदिनी. ८ दुष्टजनसागराचें मथन करण्यास समर्थ असा मंदर पर्वत. पूर्वीं अमृताच्या प्राप्तीसाठीं देवदैत्यांनीं मंदरगिरीचा मंथनदंड व वासुकी नागाची रज्जु करून क्षीरसागराचें मंथन केलें, अशी कथा आहे. तीस उद्देशून येथील शब्दयोजना आहे. ९ आहें. १० अहंकाराचा अभाव. (अन्+अहंता). ११ दुष्टजनहन्ता जिष्णु कर्णाचा हन्ता–असा भावार्थ. (अध्याय ७७ श्लोक २६-२९). १२ आपल्या मुखानें. अर्थसादृश्यः—(१) गर्जन्ति न वृथा शूरा निर्जला इव तोयदाः ॥ (रामायण); (२) पौरुषं दर्शयन्ति स शूरा न बहुभाषिणः ॥ (भागवत). १३ श्रेष्ठजन. 'आर्यः साधुकुलीनयोः.' इति विश्वः. (मागें पृष्ठ ५५ टीप ११ पहा). १४ वर्षीं. (श्लोक ३०). १५ भूमि. १६ वडिलांची आज्ञा पाळण्याविषयीं तत्पर अशानें. १७ अध्याय ७७ श्लोक ३२-३६ पहा. १८ तुझ्या आज्ञेप्रमाणें न करणारे असे माझे हात. १९ वर्ष. परि=पण. २० अध्याय ७७ श्लोक ३९-४१ पहा. २१ फांसे. ह्या गीत्यर्धांत **'अपन्हुति'** अलंकार आहे. 'एका वस्तूच्या स्वरूपाचें गोपन व दुसऱ्या वस्तूच्या स्वरूपाचें प्रकटीकरण, हेंच सामान्यपणें अपन्हुतीचें लक्षण होय.' [ अलंकारप्रकाश ]. २२ आपल्या वधाविषयीं तत्पर.

कार्यें उरकुनि घे, रे! तेरा वर्षें चि राहिलें आयु, ।
होतिल चतुर्दशाब्दीं माजे शर सर्प, असु तुजे वायु[1]. ॥ २४
पोषी[2] जशी पतिशुभाशुभभवमुदमुद्भरें[3] पुलकें[4] लंका, ।
गांधारराजधानी[5] पोषू तैसी च रे! कुल-कलंका[6]!' ॥ २५
नकुळ म्हणे, 'व्याघ्रशिरीं दिधला हा वाम पाद ओतूनीं[7], ।
हा! तापविली दयिता[8] कर्णीं परुषोक्तिगरळ[9] ओतूनी. ॥ २६
कृष्णेसि रुक्ष वदले जे जे, मरतील ते समस्त रणीं ।
खळबळनकुळ तसे, तृणदव[10] कीं, किंवा जसे तमस्तरणी[11].' ॥ २७
एवंविधें[12] प्रतिज्ञा करुनि, महासत्त्व[13] पांडुसुत राया ।
धृतराष्ट्रा पुसति नमुनि, त्यां[14] 'धर्में[14] आपदब्धि[15] उतराया. ॥ २८
धर्म पुसे ज्यांज्यांतें, मागे जाया वनासि आज्ञा, ते ।
भीष्म द्रोण कृप विदुर होवूनि उदश्रु[16] म्हणति 'हा!' ज्ञाते. ॥ २९
त्यां हि पुसे, स्वाहित[17] जे वाजविती, न धरुनि त्रपा[18], टीर[19], ।
धर्मासि एक साजे सदसत्समशील[20] मित्र पाटीर[21]. ॥ ३०

---

१ प्राणवायु. माझे बाणरूप सर्प तुझे प्राणवायु भक्षण करितील. सर्प वायुभक्षण करून जगतात, अशी समजूत आहे. म्हणून येथें बाणांस सापाची व प्राणांस वायूची उपमा दिली आहे. २ धारण करी. ३ पति (रावण)+शुभ+अशुभ+भव(होणारा)+मुद्(आनंद)+अमुद् (दुःख)+भरें (अतिशयानें)=रावणाच्या शुभाशुभ कर्मांपासून होणारा जो हर्ष किंवा दुःख, त्याच्या भरानें. ४ रोमांच. ५ गांधार देशाची प्रधाननगरी तक्षशिला. पंजाबाच्या उत्तरेस सिंधु नदीच्या पूर्वपश्चिम भागाला गांधारदेश असें म्हणत. याचा कांहीं भाग हल्लीं अफगाणिस्थानांत मोडतो. गांधार देशाला कंदाहार हें अर्वाचीन नांव अपभ्रंश होऊन पडलें आहे. ६ कुलास दोष लावणाऱ्या (शकुने). रे=अरे. 'रे' इति हीनसंबोधने अधमामंत्रणे वा. ७ मार्जारांनीं. येथें '**निदर्शना**'लंकार आहे. 'दोन भिन्न वाक्यार्थांचें उपमेमध्यें पर्यवसान झालें असतां निदर्शना अलंकार होतो.' (अलंकार-प्रकाश). ८ प्रियभार्या (द्रौपदी). ९ निष्ठुर भाषणरूप विष. (परुष+उक्ति+गरळ). १० गवत आणि वणवा. ११ अंधकार आणि सूर्य. अंधकाराला जसा तरणि (सूर्य) तसा दुष्टांच्या बळाला (सामर्थ्याला किंवा सैन्याला) नकुळ घातक आहे–असा भाव. येथें '**परंपरितरूपक**' आहे. '**तमो** ध्वान्ते गुणे शोके क्लीबं, वा ना विधुंतुदे' इति मेदिनी. १२ अशा प्रकारच्या. १३ मोठे धैर्यशाली. १४ वडिलांना मान देणें हा धर्म, त्याच्या योगानें. १५ आपत्तिरूप समुद्र, दुःखसागर. १६ नेत्रोदक-युक्त, साश्रु. १७ स्व+अहित=स्वशत्रु. १८ लज्जा. त्रपा न धरुनि (निर्लज्जपणानें) टीर वाजविती (टिऱ्या बडविती) [असे] जे स्वाहित (आपले शत्रु) त्यांहि (त्यांना सुद्धां) पुसे (जाते वेळीं भेटे)–असा अन्वय. १९ कुल्ला, नितंब, टेरी. 'टीर' हा शब्द 'कटीर' ह्या संस्कृत शब्दापासून झाला आहे. **टीर** वाजविणें=टिऱ्या बडविणें, कुल्ला थोपटणें, आनंद प्रदर्शित करणें. ग्राम्यजन टिऱ्या बडवून आनंद प्रदर्शित करितात व सभ्यजन आनंदप्रदर्शनार्थ टाळ्या वाजवितात. २० सद् आणि असद् म्हणजे चांगलें आणि वाईट यांच्या ठायीं सारखाच आहे स्वभाव ज्याचा तो. २१ चंदनवृक्ष.

छळकासि कवि न शापिति, देतें जड कनक काय हो! [१]गाळी? ।
पाळी जो, त्यासि मधुर [२]ईक्षु, तसा त्या हि, अदय जो [३]गाळी. ॥ ३१
विदुर म्हणे, ‘कुंतीचें [४]वपु कोमल, वासयोग्य न वनीं तें. ।
कष्टांत वृद्धदेहें [५]न उरावें, [६]आतपांत [७]नवनीतें. ॥ ३२
[८]सेवाधिकार मज द्या, ठेवा माझ्या गृहीं खमातेतें, ।
[९]दुर्गत बंधु पहातां दुःख जसें, [१०]इतरथा न [११]मातें तें.[१२]’ ॥ ३३
पांडव म्हणति, ‘बहु बरें, पितृतुल्य [१३]पितृव्य तूं, बुधा! [१४]स-रसें ।
[१५]भवदुपदेशें निवतों, [१६]त्वद्भाषण [१७]तापल्यां [१८]सुधा-सर-सें. ॥ ३४
तूं आमुचा [१९]परमगुरु, न त्वत्सम ऐकिला सदय चुलता, ।
[२०]त्वच्छाया नसतां किति आम्ही? या [२१]संज्वरें गिरि हि [२२]उलता.’ ॥ ३५
विदुर म्हणे, ‘बा! धर्मा! व्यसनीं सद्रीतिनीति [२३]नव नौका, ।
करिशील राज्य, झाला काय श्रीराम राय न [२४]वनौका? ॥ ३६
सर्व असा एकमतें, जें युष्मत्प्रिय घडेल सत्वर तें, ।
कोठें हि कधीं हि चिर स्थिर अनुभविलें न दुःख [२५]सत्व-रतें.’ ॥ ३७
[२६]कथिली विदुरें [२७]सन्मति, जाणों दिधली तयां [२८]सिदोरी ती; ।
कीं [२९]व्यसनकूपपतितां [३०]अनुपायज्ञां तयांसि दोरी ती. ॥ ३८

---

१ शिवी. हें ‘प्रश्ना’लंकाराचें उदाहरण आहे. प्रश्न असून उत्तराची अपेक्षा नसते, आणि अर्थगौरव होऊन तो परिपूर्ण असतो, तेव्हां प्रश्नालंकार होतो. २ ऊंस. कल्पनासादृश्यः–‘ना तरी इक्षुदंडु। पाळितया गोडु। गाळितया कडु। नोहेचि जेवीं’.। [ ज्ञानेश्वरी–अध्याय १२।२०० ]. ३ रस काढी. ही गीति सुभाषितरूप आहे. ४ शरीर. ५ जीवंत राहणार नाहीं. ६ उन्हांत. ७ लोण्यानें. ८ चाकरी (शुश्रूषा) करण्याचा अधिकार. ९ दरिद्री. १० अन्यथा, दुसऱ्या प्रकारानें. ११ माजे, वृद्धि पावे. १२ हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १३ चुलता, काका. १४ प्रेमयुक्त. हें उपदेशाचें विशेषण. १५ तुझ्या उपदेशानें. १६ तुझें भाषण. येथें ‘काव्यलिंग’ अलंकार आहे. १७ तप्त झालेल्यांस. १८ अमृताच्या सरोवरासारखें. १९ अध्याय ७८ श्लोक ७-८ पहा. २० तुझी कृपारूपी छाया (सावली). २१ संतापें. २२ फुटून जाता. गिरि=पर्वत. येथें ‘अतिशयोक्ति’ अलंकार आहे. २३ नवीन, धड, मजबूत. २४ वनवासी. (वन=अरण्य, ओकस्=घर; वन हेंच घर ज्याचें असा). २५ सत्वसंपन्न पुरुषानें, सत्वगुण ज्यास आवडतो त्यानें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. २६ अध्याय ७८ श्लोक ९–२३ पहा. यांत विदुरानें केलेला उपदेश आहे. २७ चांगली बुद्धि. ही गीति पंतांनीं दोन ‘उत्प्रेक्षा’ नामक अलंकारांनीं भूषविली आहे. २८ प्रवासांत उपयोगीं पडणारे खाण्याचे पदार्थ. २९ व्यसनरूप विहिरींत पडलेल्या जनांस. ३० जे उपाय जाणत नाहींत त्यांस.

पुत्रवियोगें कुंती बहु तळमळली, म्हणे, 'अहाहा !' तें ।
सांगूं[1], कीं निंदूं त्या, लिहिला जेणें कु-लेख हा हातें ? ॥ ३९
असु[2] जातां तनु[3] विकळा[4], कीं जातां वत्स जेंवि धेनु, संती[5] ।
तेंवि म्हणे "अलिकीं[6] कां लिपि[7] लिहिली अश्रुदा[8] विधे! नुसती ? ॥ ४०
त्यजिली जसी तुम्ही हे,[9] सुत हो! त्यजिली तसी न कां असुंनीं[10] ? ।
हे[11] या संज्वरगेहीं[12] देहीं होतील तप्त कीं असुनीं. ॥ ४१
सुत हो! शुद्धांस कसें आंतळलें[13] व्यसन ? अंकें[14] हा रविला; ।
विपरीत चि हें कुरुकुळदीपानीं[15] स्वप्रकाश हारविला ! ॥ ४२
आलां हतभाग्येच्या पोटाला म्हणुनि भोगितां ताप; ।
[16]संसर्गें भोगावें पुण्य जसें, साधु हो ! तसें पाप. ॥ ४३
तुमचा धन्य पिता, ती माता मांद्री[17] सती हि धन्या हो ! ।
वंध्यत्व बरें परि, मज ऐसी कोणास ही न कन्या [18]हो. ॥ ४४
माझा 'पुत्रस्नेह', त्यजुनि मला, तुजकडे चि आला [19]गे ! ।
स्वव्रतवत् प्रतिपाळीं, रक्षाया[20] अधिक काय या लागे ? ॥ ४५
वत्से ! कृष्णे ! माझा बाळक सहदेव देवसा यास ।
बहु सांभाळीं, व्हावा सुकुमार[21] कुमार हा न सायास[22]. ॥ ४६

---

१ पंत म्हणतात-कुंतीनें जो शोक केला तो वर्णन करूं, कीं ज्या विधात्यानें हें दुःख तिच्या नशिबीं लिहिलें, त्याची निंदा करूं ? हेंच मला कळत नाहीं. कुंतीशोकवर्णन हें प्रस्तुत प्रसंगास धरून आहे. पण तें करीत असतांना पंतांना इतकें भडभडून येत आहे, कीं दुर्विधीची निंदा करण्याला त्यांच्या मनाला सारखी ओढ लागत आहे. एकंदरींत असा दुःखाचा प्रसंग त्या साध्वीवर यावा, ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट होय-असा भाव. २ प्राण. ३ देह. ४ व्याकुळ, व्यथित. ५ शीलाचारवती स्त्री, साध्वी. ६ कपाळीं. ७ लेख. ८ अश्रु उत्पन्न करणारी (लिपी). ९ कुंती. १० प्राणांनीं. संस्कृतांत 'असु,' 'प्राण,' या शब्दांचा प्रयोग बहुवचनांत होतो. ११ प्राण. १२ संतापगृहांत. हें देहाचें विशेषण. १३ शिवलें. १४ कलंक. सूर्याला अंक ( डाग ) असणें हें जसें विपरीत आहे, त्याप्रमाणेंच तुमच्यासारख्या नीतिसंपन्न पुरुषांवर संकट येणें हेंही विपरीतच आहे-असा भावार्थ. वनपर्व-अध्याय २।४७ यांतही याच दृष्टांतानें विपरीतार्थाचा बोध केला आहे. १५ कुरुवंशाला सुप्रकाशित करणाऱ्या पांडवांनीं. ह्या गीत्यर्धांत 'विरोधा'लंकार आहे. १६ संगतीमुळें, सहवासामुळें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १७ सभापर्व-अध्याय ७९ श्लोक १९ पहा. १८ होवो. कल्पनासादृश्यः- 'वंध्यत्व लिहो भाळीं, विधिचें कदपत्य न करकंज लिहो. ॥' (आश्रमवासिकपर्व-अ० २।५३ ). १९ अगे कृष्णे ! २० ह्याचें संरक्षण होण्यास तुझ्या पातिव्रत्यापेक्षां जास्त कशाची गरज नाहीं-हा भाव. २१ नाजूक, कोमल. २२ आयासयुक्त, कष्टी.

म्यां वत्स निरविला तुज हा [1]मंदसुन्यास, यास जतन करीं, ।
विश्वासें दिधलें हें तुझिया [2]जीवनहित स्व-वतन [3]करीं. ॥ ४७

रे वत्सा! **सहदेवा**! जावूं दे **धर्म भीम** वनवासा, ।
जावू **अर्जुन नकुळ** हि, कां बा! झालासि बांधव [4]नैवासा? ॥ ४८

मजविण तुज, तुजविण मज तेरा [5]कल्पान्त, ते न [6]वत्सर, हा! ।
ने मज, [7]नेमें जरि अधिकें, पाहूं तरि दे [8]मुखेंदु, [9]वत्स! रहा. ॥ ४९

हा! **कृष्णा**! जगदीशा! काय वरें दैन्य हें, अगा [10]**धां**ल्या! ।
[11]व्यसना रचीं तराया सेतु जसा सागरा अगाधा त्या. ॥ ५०

**कृष्णा**! [12]श्रितजनसर्वव्यसनघनघनप्रकंपना! बापा! ।
[13]तापाकुळ कुळ **कुरु**चें संरक्षावें हरूनियां पापा. ॥ ५१

[14]गे बाई **कौसल्ये**! संसाराला न हे वृथा आली, ।
झाली [15]तुहिनकरकुळीं उत्पन्न दुजी तुजी **पृथा** [16]आली. ॥ ५२

---

१ माझ्या प्राणांचा ठेवा. (मत्+असु+न्यास). २ वांचण्याविषयीं कल्याणभूत, जीवनाला हितकारक. ३ तुझ्या हातीं. पंतांच्या काव्यांत षष्ठी विभक्ति एकीकडे व तिचा संबंधवाचक शब्द भलतीकडे, असा प्रकार पुष्कळदां आढळतो. पण तो संबंधवाचक शब्द कवितेंत अशा खुबीनें ठेविलेला असतो, कीं षष्ठी विभक्तीचा संबंध इतर शब्दांशीं न लागतां, त्याच दूरस्थ शब्दाशीं लागावा. येथील रचना अशाच प्रकारची आहे. (अध्याय ४।७४,८६; अ० ५।९,३४; अ० ७।८९ पहा). ४ परक्यासारखा. ५ प्रळयकाळ, पृथ्व्यंत. कल्प=ब्रह्मदेवाचें अहोरात्र म्हणजे ४३२०००००० इतकीं सौरमानाचीं वर्षें. प्रत्येक कल्पाचे अखेरीस पृथ्वीचा लय होतो, अशी समजूत आहे. '**कल्पः** शास्त्रे विधौ न्याये संवर्ते ब्रह्मणो दिने' इति मेदिनी. ६ वर्षें. ७ तुझा वनवासाला जाण्याचा निश्चय जर माझ्या म्हणण्यापेक्षां ज्यास्त महत्वाचा असेल, तर मला बरोबर घेऊन चल-असा अर्थ. ८ मुख+इंदु=मुखचंद्र. ९ बाळा सहदेवा! १० विधे. ११ संकटाला. [संकटरूप समुद्राला]. 'व्यसनार्तासि' असाही पाठ आहे. त्या अगाधा सागरा तराया जसा सेतु [रचिला] तसा व्यसना तराया सेतु रचीं-असा अन्वय. रामानें लंकेवर स्वारी करण्यासाठीं सेतु बांधिला-हा कथाभाग प्रसिद्धच आहे. १२ श्रितजनांच्या (आश्रितांच्या) सर्व व्यसन (दुःख)रूप निबिड मेघांस (मेघांस विरवून व निर्दळून टाकणारा) झंझावात (मोठा वारा) अशा कृष्णा. दुःख-नाशका-असा भाव. १३ ताप+आकुल=संताप+पीडित. १४ ही '**परोक्षजनसंबोधनोक्ति**' आहे. 'वर्णनीय विषय एक असून विचाराचे ओघानें अथवा मुद्दाम मध्येंच त्या विषयापासून क्षणभर वळून दुसऱ्याच एकाद्या जवळ नसलेल्या व्यक्तीस संबोधून भाषण जेथें केलेलें असतें, तेथें '**परोक्षजन-संबोधनोक्ति**' अलंकार होतो.' [अलंकारचंद्रिका]. वस्तुतः येथील कथानकाशीं कौसल्येचा कांहीं संबंध नाहीं. परंतु तिला उद्देशून हें कुंतीचें भाषण असल्यामुळें, येथें '**परोक्षजनसंबोधनोक्ति**' अलंकार झाला आहे. १५ चंद्रवंशीं. १६ सखी.

काय करूं ? चुकला [1]विधि भाळीं लिहितां लिहावया मरण, ।
[2]बहुमुखमद्विधितेजें पडलें [3]चतुराननासि विस्मरण.'' ॥ ५३

विदुर तिला समजावुनि, नेउनि सदनीं, म्हणे, '[4]नको चि रडों, ।
जननि ! उगी, धीर धरीं, या [5]चिंतागिरिभरें नको चिरडों. ॥ ५४

सति ! [6]भर आनंदाला जो देतो, तो चि भर विलापाला. ।
[7]बलजलनिधिनें विधिनें श्रीराममुखीं हि भरविला [8]पाला.' ॥ ५५

[9]कौरवपौरवधू बहु रडति, म्हणति, तें [10]कुकर्म परिसून, ।
'वृद्ध श्वशुर [11]च्यवला, न च्यवली गांजिली हि परि [12]सून. ॥ ५६

बाई द्रौपदि ! केली [13]आत्मश्रीची च दुर्दशा कुरुनीं, ।
गुरुनीं न [14]दंडिले कां ? [15]वारावें काय दुर्जना दुरुनी ? ॥ ५७

स्तवितील लोक तुज [16]गुरु [16]सुकृतें व्यसनांत बाइ ! तरलीला, ।
[17]गेयी हे या वंशीं [18]त्वल्लीला, असि नसे इतर लीला. ॥ ५८

[19]स्वकृतानय आठवितां [20]धृति पावे नाश [21]अंधरायाची, ।
आवळिली [22]आधिमहापाशें बांधूनि [23]कंधरा याची. ॥ ५९

[24]उद्विग्नचित्त होवुनि, आणवुनि क्षिप्र [25]सुस्वभावातें, ।
'पांडव वनासि कैसे गेले ?' [26]ऐसें पुसे [27]स्वभावातें. ॥ ६०

'[28]नृप [29]मुख झांकुनि गेला, देता झाला जना न पाहूं [30]तें; ।

---

१ ब्रह्मदेव. 'विधिर्विधायके वाक्ये दैवस्रष्टृविधानयोः' इति मङ्खः. । २ बहुमुख अशा माझ्या दैवाच्या प्रतापानें. माझ्या दैवाचीं मुखें अनेक, पण ब्रह्मदेवाचीं मुखें काय तीं चारच. तेव्हां त्या चतुराननाच्यानें माझ्या बहुमुख दैवापुढें टिकाव न धरवल्यामुळें तो विसरून गेला—असा भावार्थ. ३ ब्रह्मदेवास. ४ नकोच्चि रडों, नको च्चिरडों—हें पंतांच्या शेंकडों ठरींव यमकांपैकीं एक होय. ५ चितारूप पर्वताच्या भारानें. ६ ऊत, अतिशय. ७ बलसागर जो विधि (दैव) त्यानें. ८ वृक्षांचीं पानें. रामाला घडलेल्या वनवासाला उद्देशून हें भाषण आहे. ९ कौरवांच्या आणि पुरवासिजनांच्या स्त्रिया. १० तें दुष्टकृत्य–द्रौपदीचें वस्त्राकर्षण व धर्मादिकांचें वनांत प्रेषण. ११ भ्रष्ट झाला. १२ पुत्राची स्त्री (द्रौपदी). १३ आपल्या राज्यलक्ष्मीची. १४ शासित केले. 'गुरुंनीं न दंडिलें कां' असा अन्य पाठ. १५ दुर्जनाचें निवारण नुसतें दुरूनच करावें कीं काय? असा अक्षम्य अपराध कौरवांचे हातून घडण्यापूर्वींच गुरुजनांनीं त्यांस शिक्षा करून, त्यांचा प्रतिकार कां केला नाहीं?–असा भाव. १६ थोर पुण्यानें. १७ गाण्यास योग्य अशी, स्तुत्य. १८ तुझी लीला, आचरण. १९ आपण केलेला अन्याय. २० धैर्य. २१ धृतराष्ट्राची. २२ मानसिक चिंतेच्या जबरदस्त पाशानें. २३ मान. २४ शोकव्याकुल. २५ चांगला स्वभाव आहे ज्याचा अशाला (विदुराला). २६ अध्याय ८० श्लोक १-३ पहा. २७ स्वबंधूला. २८ धर्मराजा. २९ हें विदुराचें धृतराष्ट्राला उत्तर आहे. ३० मुख.

पाहत होता जातां विपिनासि[१] वृकोदर[२] स्वबाहूंतें. ॥ ६१
जो सर्वशिष्यवृंदीं द्रोणाला परमतोषकर[३] सिकता,[४] ।
त्याचा वनासि जातां पेरितें[५] होतों पथांत कर सिकता.[६] ॥ ६२
नकुळ रजांहीं[७] मळवुनि सर्वांगाला वनासि गेला हो ! ।
सहदेवें ही जातां सारवुनि मुखेंदु[८] मलिन केला हो ! ॥ ६३
केशानीं मुख झांकुनि, गेली रोदन करीत तव[९] सून,[९] ।
द्रुपदें विलोकिली जी कन्या देवव्रजासि[१०] नवसून.[११] ॥ ६४
कुशदर्भपाणि[१२] भगवान् धौम्य 'परे[१३] गात गात गेला हो!' ।
क्षत्ता[१४] म्हणे, 'तुम्हां म्यां श्रुत तद्गमनप्रकार[१५] केला हो!' ॥ ६५
अंध म्हणे, 'गा ! माझ्या चतुरा चतुरास्यसुज्ञ[१६] भावा[१६] ! तें ।
रूप तसें विविध[१७] तिंहीं कां केलें ? स्पष्ट सांग भावातें.[१८]' ॥ ६६
क्षत्ता म्हणे, "युधिष्ठिर[१९] करिता झाला स्वदृक्पथा[२०] पिहितें,[२१] ।
यद्यपि भस्म करावे तव सुत, चिंती सदा तथापि हितें.[२२] ॥ ६७
'घालीन गांठि सत्य स्वरिपूंसीं संगरांत बाहूनी,[२३]' ।
समजावी भीम असें, तळमळ करितां मनांत, बाहूनीं.[२४] ॥ ६८
हा भाव अर्जुनाचा कीं, 'शत्रूंसी घडो समर, सिकता[२५] ।
जेंवि अशा इषु[२५] सोडिन, माझी समरीं हरासम[२६] रसिकता.[२७]' ॥ ६९

---

१ वनास. २ भीम. ३ अत्यंत आनंद देणारा (अर्जुन). ४ शिकणारा, शिष्य. ५ फेंकीत होता. ६ वाळू. ७ धुळीनें, मातीनें. ८ मुखचंद्र. ९ द्रौपदी. १० देवसमुदायास. ११ नवस करून. १२ कुश आणि दर्भ हातीं ज्याच्या तो. १३ मृतकर्मांतील मंत्रविशेष. वेदांतील मंत्रांस नांवें देण्याचा परिपाठ आहे. हीं नांवें त्या मंत्रांतील वर्णिलेल्या देवतांवरून किंवा त्यांतील आद्याक्षरांवरून दिलेलीं असतात; जसें-त्रिसुपर्णमंत्र, मृत्युंजयमंत्र, रुद्र, पवमान, पुरुषसूक्त, इत्यादि. 'परे' हें मंत्राचें नांव, त्या मंत्रांतील आद्याक्षरांवरून पडलेलें आहे. 'परेयिवांसं' असा या अंत्येष्टिकर्ममंत्राचा प्रारंभ आहे, म्हणून याचें 'परे' असें नांव पडलें आहे. १४ विदुर. १५ त्यांच्या जाण्याच्या वेळच्या तऱ्हा. १६ ब्रह्मदेवाप्रमाणें जाणत्या बंधो. १७ नाना प्रकारचें. १८ अभिप्रायातें, हेतूतें. १९ अ० ८० श्लो० १०-१२ पहा. २० आपल्या नेत्रमार्गास. २१ आच्छादित. २२ धर्माच्या मनांत तुझें हित करावें असें असल्यामुळें त्यानें आपले डोळे आच्छादित केले. तसें केलें नसतें तर तुझे पुत्र दग्ध झाले असते. २३ बोलावून. २४ भुजांनीं. २५ वाळूच्या कणांप्रमाणें असंख्य बाण शत्रूवर सोडीन. 'इषु' शब्दाचा स्त्रीलिंगी प्रयोग चिंतनीय आहे. हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व स्त्रीलिंगी आहे. २६ शंकराप्रमाणें. २७ आवड, गोडी.

कोण्हीं न ओळखावें [1]हस्तिपुरीं आपणासि, हा नियम ।
करुनि, करिती रजांहीं लिंपूनि [2]स्वस्वरूपहानि [3]यम. ॥ ७०
[4]कृष्णेचा भाव असा, ज्यांहीं मज गांजिलें अति द्वेषें, ।
त्यांच्या स्त्रिया समस्ता चवदाव्या वत्सरीं अशा वेषें, ॥ ७१
देउनि जलांजली स्वप्रियसुतबंधूसि, म्हणुनि 'हा!' रडत, ।
सोडूनि मोकळे [5]कच येतील पथीं अशा चि आरडत.' ॥ ७२
धौम्याभिप्राय हि हा, 'जैं [6]वरिजेतील कुरु [7]परेतत्वें ।
गातील पुढें [8]कुरुगुरु दर्भ धरुनियां करीं 'परे' [9]तत्वें.—" ॥ ७३
ऐसें विदुर वदे तों [10]देवर्षि, त्यजुनियां नभा, उतरे, ।
बोले सभेंत कीं, '[11]हां! लोभीं कविचा हि [12]हा न भाउ तरे; ॥ ७४
दुर्योधनापराधें भीमधनंजयबळें [13]महागर्व ।
हे कौरव चवदाव्या वर्षीं मरतील निश्चयें सर्व.' ॥ ७५
बोलोनि भविष्य असें [14]भरला नारद मुनींद्र [14]गगनीं च. ।
द्रोणासि शरण गेले [15]राज्यनिवेदन करूनि मग [16]नीचें. ॥ ७६

---

१ हस्तिनापुरांत. २ आपल्या लावण्याचा लोप. ३ नकुलसहदेव. ४ गीति ७१-७२ यांचें युग्म आहे. (मागें पृष्ठ ४५ टीप ४ पहा). ५ केश. ६ वरिजेल—हें कर्मणीरूप 'इजे'हा आगम-धातु व भविष्यकाळचा 'ल' प्रत्यय जोडून झालें आहे. कवितेंतील वर्तमानकाळाच्या रूपाला 'ल' प्रत्यय लाविला असतां भविष्यकाळाचें रूप सिद्ध होतें. धरिजेल, होइजेल, वाखाणिजेल, अशीं रूपें कवितेंत मात्र आढळतात. अध्याय १।१०३ मध्यें 'होइजेल' असें रूप आढळतें. 'वरिजेतील' हें अनेकवचनी रूप आहे. ह्या व अशा अनेक प्रयोगांवरून पंतांनीं संस्कृतांतील व्याकरणप्रयोग मराठींत आणण्याचा प्रयत्न केला आहे, असें दिसतें. ७ प्रेतपणातें. ८ कौरवांचे उपाध्याय. ९ खरोखर. परे=मंत्रविशेष. (मागें गीति ६५ पहा). १० नारद. ऋषि=जे सदा सत्य वचन बोलतात, त्यांस ऋषि असें ह्मणतात. हे सप्तविध आहेत:—देवर्षि, ब्रह्मर्षि, राजर्षि, महर्षि, परमर्षि, श्रुतर्षि व कांडर्षि; अशीं नांवें रत्नकोशांत आहेत. ११ हाय! हाय! १२ धृतराष्ट्र. हा कविचाहि (विदुराचा) भाउ लोभीं (लोभामुळें) न तरे—असा अन्वय. 'शुकमुनिचा ही धना न भाउ तरे' असा अन्य पाठ. व्यासजत्वात् धृतराष्ट्रः शुकबन्धुरिति—पंत. (शुक व धृतराष्ट्र हे दोघे व्यासापासून जन्म पावले असल्यामुळें परस्पर बंधु होत). शुकमुनीचा भाऊ (धृतराष्ट्र) ही धना (धनलोभास) न तरे—असा भाव. 'लोभात्पापं प्रवर्तते'—हें प्रसिद्धच आहे. १३ ज्यांना मोठा गर्व झाला आहे असे (कौरव). १४ आकाशांत शिरला, घुसला, वाईनें निघून गेला. १५ राज्यार्पण. १६ ते अधम (कौरव).

शरणागत दुर्योधनभूपाला [१]गुरु म्हणे, 'अगा! राजा! ।
रक्षील कोण [२]त्याला? दव[३]दहनें व्यापिलें [४]अगारा ज्या. ॥ ७७
**पां**डव अवध्य सुर[५]सुत धार्मिक, माझे [६]बहिश्चर [६]असु खरे, ।
तत्त्यागीं [७]महदसुख, प्राणत्यागीं नसे मज अ-सुख रे! ॥ ७८
आलां शरण मज तुम्हीं तुमचा ही उचित होय [८]अ-त्याग, ।
[९]शरणागतारिच्या ही [१०]त्यागें घडतें जनासि [११]अत्याग. ॥ ७९
[१२]मन्निधनार्थ **द्रु**पदें केला उत्पन्न तनय, तो मातें ।
[१३]धृष्टद्युम्न टपतसे ग्रासाया, जेंवि **राहु** [१४]सोमातें. ॥ ८०
[१५]भगिनीप्रियार्थ समरीं होइल **पां**डवसहाय [१६]मद्रिपु रे! ।
[१७]काळापुढें किती मी? [१८]हरिसीं युद्धांत काय [१९]अद्रि पुरे[२०]? ॥ ८१
[२१]त्यासि जयश्री न त्यजि तसि, जसि **ऐ**रावतासि [२२]अभ्रमु रे! ।
[२३]यच्छरपवनें [२४]समराजिरगगनीं [२५]शत्रुकटक [२५]अभ्र [२६]मुरे, ॥ ८२

---

१ द्रोण. २ कोणीही रक्षण करणार नाहीं–हा इत्यर्थ. ३ दव (वणवा)+दहन (अग्नि)=वणव्याच्या आगीनें. ४ गृहास. (मागें पृष्ठ ३५ टीप २६ पहा). ५ देवपुत्र (देवांच्या अंशानें जन्मलेले). ६ माझ्या शरीराबाहेर संचार करणारे प्राण. पांडव हे माझ्या प्राणांइतकेच मला प्रिय आहेत–हा भाव. ७ मोठें (महत्) असुख (दुःख). ८ स्वीकार, त्याग न करणें. ९ शरण आलेल्या शत्रूच्या. १० त्याग केल्यानें. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ११ अति+आग=मोठा अपराध. १२ माझ्या वधासाठीं. १३ एकदां द्रुपदराजानें द्रोणाचार्यांचा अपमान केला होता. त्याबद्दल सूड उगविण्यासाठीं द्रोणाचार्यांनीं द्रुपदराजाशीं युद्ध करून, त्यास पदच्युत केलें. तेव्हां त्यानें आचार्यांचा शिरच्छेद करणारा असा आपणास पुत्र व्हावा ह्या हेतूनें मोठा यज्ञ केला. तेव्हां याज व उपयाज ह्या दोन ऋषींच्या तपोबळानें अग्नीपासून धृष्टद्युम्न नांवाचा पुत्र व वेदीपासून सौंदर्यसंपन्न द्रौपदी अशीं दोन अपत्यें झालीं–अशी कथा आहे. (पृष्ठ ४४ टीप १७ पहा). १४ चंद्रातें. १५ द्रौपदीचें प्रिय करण्यासाठीं. १६ माझा वैरी (धृष्टद्युम्न). १७ त्या धृष्टद्युम्नरूप काळा (यमा) पुढें माझी कथा काय?–असा भाव. येथें '**काव्यार्थापत्ति**' अलंकार आहे. 'असें आहे तर मग असें होईल, हें सांगणें कशाला?' अशा रीतीनें वर्णन असतें, तेथें '**काव्यार्थापत्ति**' अलंकार जाणावा.' [अलंकारप्रकाश]. १८ इंद्राशीं. पूर्वीं पर्वतांस पंख असत. त्यामुळें ते वारंवार वाटेल तिकडे उडून जात व लोकांस फार त्रास देत. म्हणून इंद्रानें आपल्या वज्रानें त्यांचे पंख तोडिले–अशी कथा आहे. 'पर्वतानां भयं वज्रात्' ही कव्युक्ति प्रसिद्धच आहे. १९ पर्वत. २० पुरा पडणार आहे, टिकणार आहे. येथें '**प्रश्ना**'लंकार आहे. २१ धृष्टद्युम्नास. २२ ऐरावताची स्त्री. २३ ज्याच्या (अर्जुनाच्या) बाणरूप वायूनें. २४ रणांगणरूप आकाशांत. २५ शत्रुसैन्यरूप मेघ. हें पंतांचें आवडतें यमक आहे. (वनपर्व–अध्याय १३।७३). २६ वितळून जाई. येथील '**रूपक**' फार बहारीचें आहे.

त्या अर्जुनासवें जें करणें समरांगणीं [1]समागम, तें ।
मरणशताधिक संकट सत्य मज [2]तदीय पितृसमा गमतें. ॥ ८३
तुजकरितां मज [3]आलें चवदाव्या वत्सरीं रणीं [3]मरणें. ।
शाश्वत न, तुम्हीं हि करा सत्वर सर्व हि असेल जें करणें.' ॥ ८४
अंध म्हणे, 'विदुरा ! [4]गुरुवचन खरें, पुत्र वदति तें न खरें, ।
[5]यां दुःसहें धनंजयशस्त्रें, [6]हरिचीं गजां जशीं [7]नखरें. ॥ ८५
त्यांला वनवास न हो, सत्यव्रतरक्षणार्थ अथवा हो, ।
परि [8]पादचार न विहितें, त्यांसि तयांचा सशस्त्र रथ [10]वांहो.' ॥ ८६
गेले वनवासाला जेव्हां ते विष्णुचे सखे [11]दास, ।
संजय असें पुसे त्या अंधास [12]स्वानयें [13]स-खेदास ॥ ८७
'राया ! सुतविजयीं तुज व्हावा आनंद, खेद कां गमला ? ।
धर्म बुडविला, हरिली श्री, [14]चुकलें काय कार्य ? सांग मला.' ॥ ८८
धृतराष्ट्र म्हणे, 'आतां कैंचा आनंद संजया ! मातें ? ।
[15]चिंतारजनीच्या अनुभवितें [16]मच्चित्तकंज [17]यांमातें. ॥ ८९
[18]हृतमणिफणिवैर बरें, बा गा ! साहेल कोण वैरा या ? ।
[19]कळत चि कुकर्म केलें कुरुकुळ [20]काळाननांत [21]वैराया. ॥ ९०

---

१ सामना. त्या अर्जुनासवें समरांगणीं समागम करणें [ हें जें काम ] तें तदीय पितृसमा मज (त्याला त्याच्या पित्यासारखा पूज्य असा जो मी, त्या मला) मरणशताधिक (शेंकडों वेळां मरणापेक्षां जास्त) संकट (दुःखकारक) सत्य गमतें (मला खरोखर वाटतें)–असा अन्वय. २ त्याच्या (अर्जुनाच्या) पित्यासारख्या मला. ३ मरणें आलें=मेलें पाहिजे, मरणें भाग आहे. ४ द्रोणाचें भाषण. ५ या माझ्या मुलांना (कौरवांना). ६ सिंहाचीं. ७ नखें. ८ पायीं चालणें. ९ योग्य. (अध्याय ८० श्लोक ५२). १० वेऊन जावो. पांडव रथांत बसून जावोत–हा भाव. ११ येथें 'पांडव' असें न म्हणतां 'जे विष्णूचे सखे (मित्र) व दास (भक्त) ते' असें वळसा घेऊन म्हटलें आहें, म्हणून येथें **'पर्यायोक्त'** अलंकार झाला आहे. १२ आपल्याच अन्यायामुळें. १३ खेदयुक्त झालेल्या धृतराष्ट्राला. १४ होण्याचें राहिलें. हें संजयाचें भाषण औपरोधिक आहे. १५ चिंतारूप रात्रीच्या. १६ माझें चित्त हेंच कंज (कमल). ह्या गीत्यर्धांत सुरेख **'रूपक'** आहे. कमळ सूर्योदय होतांच फुलतें व सूर्यास्त होतांच मिटतें. त्याप्रमाणें माझें मन आतां मुलांसंबंधीं वाटत असलेल्या काळजीमुळें आनंदित होणें अशक्य आहे, तें आतां दुःखितच राहणार–हा भावार्थ. १७ प्रहरातें. १८ हरण केला आहे मस्तकांतील मणि ज्याचा अशा सर्पाचा द्वेष. सर्पाच्या मस्तकांत एक देदीप्यमान मणि असतो, अशी समजूत आहे. (पंतकृत द्रोणपर्व, अध्याय १०।७८ पहा). १९ कळत असून, जाणून बुजून. पुढील गीतींत वर्णन केलें आहे त्याप्रमाणें. २० काळमुखांत, मृत्यूचे तोंडांत. २१ घालाया. वैरणें=ओइरणें. हा शब्द स्त्रियांच्या भाषणांत येतो. धृतराष्ट्राच्या तोंडीं न शोभणाऱ्या शब्दाची योजना पंतांना केवळ यमकपोषणार्थच करावी लागली, असें दिसतें.

**विदुरोक्त** हित हि, तनुज[1]स्नेहैकपरें न मानिलें कांहीं, ।
केली म्यां चि, न केली अक्षांहीं, बा! न हानि लेंकांहीं.' ॥ ९१

## उपसंहार.

भक्त[2]**मयूर**करें हें श्रीगुरुनें लिहिविलें **सभापर्व,** ।
कीं आर्या[3]नंदांचें रसिकांची नित्य हो[4] सभा पर्व[5]. ॥ ९२

॥ इति श्रीरामनंदनमयूरकविकृतौ महाभारते सभापर्वं समाप्तम् ॥

## ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु. ॥

---

१ पुत्रप्रेमासक्तानें. २ भगवद्भक्त मोरोपंत कवि याच्या हातानें. ३ आर्यांपासून उत्पन्न होणाऱ्या आनंदांचें. ४ होवो. ५ पर्व=पर्वणी, महोत्सव. शके १७२० त लिहिलेल्या पंतकृत सभापर्वाच्या एका पोथींत पुढें दिलेलीं लेखकाचीं दोन पद्यें आढळतात. त्यांवरून पंतांच्या कृतीविषयीं सवाशें वर्षांपूर्वीं देखील केवढी पूज्यबुद्धि जागृत होती, हें दिसून येतें:—

'कृति **मोरे**श्वरकविकृत लिहुनि **सभापर्व** ठेविलें धामीं. ।
वाचावें रसिकांनीं, कीं वाचावें तसेंच बहुधा मीं. ॥ १ ॥
लिहिलें हळूहळू म्यां गोड **सभापर्व** म्हणुनियां दुसरें ।
याच्या श्रवणें रसिकां तुष्टि जशी, तशि सुधेच्छिया न सरें.' ॥ २ ॥

# परिशिष्टें.

## १. अलाहाबाद युनिव्हर्सिटीच्या म्याट्रिक्युलेशन परीक्षेचे निवडक प्रश्न.

### 1908.

I (*a*) In what metre is मोरोपंत's सभापर्व written? Define the metre and verify your definition by quoting and scanning a couplet from your text book.

(*b*) Narrate briefly, in Marathi, the story of जरासंध's birth as given in मोरोपंत's सभापर्व.

II Give the prose-order (अन्वय) of the following extracts, and explain them fully and clearly in Marathi:—

अ० ११।११; २।३; २।३२; ३।५८; ५।३४; ५।८०.

III Translate the following extracts into English, mentioning the speaker of each:—

अ० ४।८५; ४।९३; ५।२४; ७।९१.

---

### 1909.

I (*a*) Why is सभापर्व so called? Name all the Parvas into which the महाभारत is divided.

(*b*) Give, in Marathi, a brief account of मोरोपंत, and mention the main characteristics of his poetry.

II Give the prose-order (अन्वय) of the following extracts, and explain them clearly, in Marathi, with reference to context:—

अ० २।५३; ३।५३; ६।२३; ५।५५; ६।५३; ४।४६.

III (*1*) अध्याय २।१८; (*2*) अ० ५।६६ उत्तरार्ध; (*3*) अ० ४।९१.

(*a*) Explain the words अध्वर्यु, ब्रह्मा, होता and सामग in extract (1).

(*b*) Comment upon the modes of construction (प्रयोग) in extracts (2) and (3).

IV (*1*) अ० ४।८८; (*2*) ४।६६; (*3*) ४।७३; (*4*) ४।७४.

Turn the above extracts into simple prose without using compound words as far as possible.

V Translate into English:—

(*1*) अ० ६।४६; (*2*) ४।४४; (*3*) ६।७७; (*4*) ४।४५.

---

## 1919.

1. Paraphrase:—

अध्याय ६।७९ व ८२; अ० ७।५३ and अ० ११९५.

2. Explain fully with reference to the context and give the mythological allusions in the following:—

अध्याय ४।८१ उत्तरार्ध; ५।५५ पूर्वार्ध; ५।८० उत्तरार्ध; ११।१४ पूर्वार्ध; ३।५७ पूर्वार्ध.

3. Write full grammatical notes on the words underlined:—

(I) कृष्णे ! द्यूतांत तूं धर्मे स्वयें हारविलीस. ।

(II) प्रार्थुनि आज्याला ज्या राज्या माजानिसेवकें उक्ति ।

(III) मग करि भगवदुदित दैत्य विश्वकर्मा तें ।

(IV) तैसें भवान् स्वराष्ट्रीं करुनि, निवारूनि ताप, रमतो कीं ? ।

(V) तीमाजि अप्सराजन नाचे गंधर्ववृंद आलापी ।

(VI) कोव्यब्द तपश्चर्या करितां तनु रात्रिदिवस भागावी ।

4. What traits of character are brought out in the following lines? State how far they are true in respect of persons referred to therein:—

(I) गीष्पतिपुढें मिरवितो साक्षरता दाखवूनि गाबाळ ।

(II) बहुधा गुरुसंकोच ग्रासी तन्नामवर्ति सुसकारा ।

(III) हा न भला बुडवाया शिरला या राजमंदिरीं कवडा ।

(IV) न चुना बहु नासिकेस ज्या श्वित्र ।

5. (*a*) What references do you find in the text to the following:—

फलज्योतिष, करणी, पंचाक्षरी and आयुर्वेद.

(*b*) Discuss the propriety of the epithet "पांचाळीपति" in the verse "पांचाळीपतिस ह्मणे मय कांहीं सांग आपुली सेवा."

6. (*a*) Criticise भीष्म's conduct with reference to his answer to द्रौपदी's question "द्यूतांत मी जिता कीं अजिता."

(*b*) Give the meanings of the following words as used in the text:—

थून, होगलिता, क्षत्ता, हेबाळ, वरव, ढवा.

---

## २. एका शंकेचें निरसन.

यमधर्माच्या सभेंत जे कित्येक राजे होते, त्यांत 'दाशरथि' होता (अध्याय १।२८) असें पंतांनीं वर्णन केलें आहे. तेव्हां हा 'दाशरथि' म्हणजे दशरथराजाचा कोणता मुलगा, व तो त्या सभेंत कां होता, अशी शंका येणें साहजिक आहे. ह्या शंकेचें निराकरण पुढील उताऱ्यावरून होण्यासारखें आहे, म्हणून जिज्ञासु वाचकांच्या सोयीसाठीं तो उतारा पुढें दिला आहेः—

दाशरथी रघुनंदन । तयाजवळी लक्ष्मण ।
धर्मसभे सुप्रसन्न । सुखसंपन्न देखिले. ॥
जमदग्नी भार्गवोत्तम । क्षत्रियान्तक महाभीम ।
चिरंजीविया नित्य निष्काम । धर्मधाम वसवितू. ॥
यमसभेसी रघुनाथ । ऐसें बोले ऋषी भारत ।
हें परिसोनी साशंक चित्त । श्रोतृभक्तीं न करावें. ॥
विश्वव्यापक आत्माराम । अभेदभक्त राजा धर्म ।
भक्तिभावें पुरुषोत्तम । धर्मधाम वसवितू. ॥
बळीचे द्वारीं कमळापती । प्रत्यक्ष पुराणें साक्ष देती ।
धर्मसभेसी केली वसती । तेथें खंती कायसी ? ॥
सूर्यवंशींची आराध्यमूर्ति । सभास्थानीं स्थापिली भक्तीं ।
नारदनयना सत्यप्रचीती । आभासली सद्भावें. ॥
कीं अयोध्या वाहोनी विमानीं । स्वधामा जातां धर्मभुवनीं ।
पूजा घेतां तेच क्षणीं । नारदमुनी पातला. ॥
ते वेळीं कौतुक जें देखिलें । तेंचि धर्माप्रति बोधिलें ।
आतां भजकीं मन आपुलें । स्वस्थ केलें पाहिजे. ॥
नारद म्हणे, 'राया धर्मा ! । धर्मसभेसी उत्तमोत्तमा ।
देखिले ते नामानुक्रमा । असो, किती अनुवादूं ? ॥

[ मुक्तेश्वरकृत सभापर्व, अध्याय ४ ओंव्या ५६—६४ ]

दाशरथिरामाचें वास्तव्य यमसभेंत कसें झालें, याच्या स्पष्टीकरणार्थ **मु**क्तेश्वरानें महाभारतावरील **नी**लकंठकृत टीकेच्या आधारानें वर उद्धृत केलेल्या ओंव्या घातल्या आहेत. **मोरो**पंत देखील **नी**लकंठाच्या टीकेस अनुसरूनच पद्य-रचना करीत असत. ( पृष्ठ ७५ टीप २१ पहा ). पण ही शंका **पं**तांसारख्या चौकस बुद्धीच्या कवीच्या नजरेंतून कशी निसटली नकळे.

---

## ३. अपरिचित शब्दांची सूचि.*

असकीं ५।६
असिकीं ४।७
आतळणें ७।४२
आली ५।५६
उमगणें ६।७६
उलणें ७।३५
कळगे ७।९
किरी ३।२९
गरळा ६।९३
गवसणें १।३२
गाबाळ ५।६२
घटणें ३।३०
चिकसा ५।२६
चार ४।८४
च्यवणें ७।५६
टीर ७।३०
ढवा ७।१४
ढीग ५।११६
तगणें ५।१०३
तोरा. ४।३८
धुवट ५।५५
नई ६।९
पुरणें ७।८१
पुसणें ४।१०३;७।२९
फटकळ ७।९
बभ्रा ४।२
बाढ ३।३०
बुकलणें ७।७
रागेजणें ४।७५
रितें ५।१५;६।९४
वरव ६।४४
विटणें ६।४९,१०२.
वैरणें ७।९०
हेबाळ ५।१८
होकरणें ६।३०
होगलिता ५।७२
होगा ४।४९
सिदोरी ७।३८

---

*ह्या व पुढील परिशिष्टांतील प्रत्येक शब्दापुढचा पहिला अंक अध्याय व दुसरा अंक गीति यांचा दर्शक आहे.

## ४. भाषणसांप्रदायांची सूचि.



---